# मराठी काव्यसमीक्षा

प्राचीन व अर्वाचीन मराठी काव्याचें तात्त्विक व तुलनात्मक समालोचन

—लेखक—

**विठ्ठल अनंत कुलकर्णी**, एम्. ए.

तर्खडकर सुवर्णपदक (१९३५)



महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर.



शके १८६७]   किंमत ८ रुपये   [सन १९४५

★ या ग्रंथांतून उतारे घेणें, याचें भाषांतर करणें, संक्षेप करणें इत्यादि बाबतींतील अधिकार.

लेखकाधीन.



★ पहिल्या व दुसऱ्या आवृत्तींच्या प्रकाशनाचे अधिकार.

प्रकाशकाधीन.



प्रकाशक—गोविंद वामन कुलकर्णी
महाराष्ट्र ग्रंथभांडार— महाद्वार मार्ग
कोल्हापूर.

मुद्रक—के. रा. मोहिते
आर्यभानु मुद्रणालय
कोल्हापूर.



मराठि-कविता असे मधु मनोज्ञ ती मंगला
समीक्षण तिचे प्रबंधि करि या मुदे आजला.
अनंतसुत विठ्ठलें करुनि शारदेला नती,
विदग्ध रसिकांस ही विमल अर्पिली स्वकृती.

## संकल्पित

१ महाराष्ट्र-वाग्विलास

२ श्रीज्ञानेश्वर-काव्य-समालोचन

३ काव्यसंगम

४ शरत्प्रभात (काव्यसंग्रह)

# प्रस्तावना



प्रस्तुत प्रबंधात मराठी काव्याचें एका अभिनव दृष्टीनें सर्वांगीण समालोचन करण्याचा प्रयत्न केला आहे. मराठी कविता जितकी संपन्न तितकीच संमोहनीय असल्यामुळें तिचें सौंदर्य काव्यरसिकांच्या निदर्शनाला आणण्याच्या हेतूने हा ग्रंथ लिहिला आहे. त्याच्यामध्यें प्राचीन-अर्वाचीन काव्याची पदोपदीं तुलना केली आहे. पहिल्या प्रकरणात काव्याची तात्त्विक मीमांसा केली आहे. दुसऱ्या प्रकरणांत मराठी काव्यातील आध्यात्मिक युगाचें विवेचन केले असून तिसऱ्या प्रकरणात मराठी काव्यांतील अभिजात युगाची चर्चा केली आहे. चवथें प्रकरण मराठी काव्यांतील अद्भुतरम्य युगाच्या उहापोहाला वाहिलें आहे. दुसऱ्या, तिसऱ्या व चवथ्या या प्रकरणांतील विवेचनाचें धोरण बव्हंशीं कवि व त्याच्या कृति यांच्या वर्णनाचें ठेविलें आहे. पाचव्या प्रकरणांत मराठी काव्यांतील रसविलास कसा हृदयंगम आहे. याचें सोदाहरण विवेचन करण्याचा प्रयत्न केला आहे सहाव्या प्रकरणांत मराठी काव्याच्या वेषभूषेचें परीक्षण करून सातव्या प्रकरणांत मराठी काव्याच्या रचनावैचित्र्याची छाननी केली आहे आठव्या प्रकरणात मराठी काव्यातील सृष्टिसौंदर्याचें दिग्दर्शन केले आहे. नवव्या प्रकरणांत मराठी काव्याच्या भवितव्याविषयीं विचार केला असून दहाव्या प्रकरणांत मराठी काव्याची ज्यांनीं चिकित्सा केली आहे त्यांचा आढावा घेतला आहे. एकंदरींत, मराठी काव्याला विश्वसाहित्यात देखिल महनीय

व मानास्पद स्थान मिळाल्याखेरीज राहणार नाहीं असा मला दृढ विश्वास वाटतो.

हा प्रबंध लिहीत असतांना साहित्यसम्राट **गु. न. चिं. केळकर** यांच्याशीं वेळोवेळीं विचारविनिमय करण्याची संधि मला मिळाली हे मी माझें महद्भाग्य समजतों. प्रस्तुत ग्रंथ प्रकाशित करण्याला ज्यांचें मला प्रोत्साहन सर्वस्वी कारणीभूत झालें असे माझे माननीय गुरुवर्य श्री. **गं. य. दीक्षित** यांचे मी कृतज्ञतापूर्वक आभार मानतों. ह्या ग्रंथाचीं कच्चीं मुद्रितें तपासणें व तीं तपासतांना वेळोवेळीं उपयुक्त सूचना करणें यांबाबतींत माझे मित्र **श्री. के. रा. कुलकर्णी** यांनीं अविश्रांत परिश्रम घेतले; व त्यांच्या बहुश्रुततेचा आणि मार्मिकतेचा मला फार उपयोग झाला. त्यांनीं हें केवळ मित्रकार्य म्हणून निरपेक्षपणें केलेलें असलें तरी त्यांनीं मला निरंतर ऋणी करून ठेविले आहे. तसेच, गु. **द. ल. कळेकर** यांनींहि मला आत्मीयतेनें सहाय्य केल्याबद्दल मी त्यांचें आभार मानतों. कोल्हापूर येथील राष्ट्रीय वृत्तीचे ध्येयवादी प्रकाशक श्री. **गोविंदराव कुलकर्णी** यांनीं सध्यांच्या प्रतिकूल परिस्थितींतहि हा ग्रंथ प्रकाशित केला याबद्दल मी त्यांचें आभार मानतों. आर्यभानु मुद्रणालयाचे चालक **श्री. के. रा. मोहिते** यांनीं छपाईचें काम सुबकरीतीनें करून दिल्याबद्दल मी त्यांचाहि आभारी आहे. शेवटीं, ज्या ज्या मित्रांचें हा ग्रंथ लिहीत असतां मला सहाय्य झालें आहे त्या सर्वांचें आभार मानणें हें माझें कर्तव्य आहे.

प्रस्तुत ग्रंथांत अनेक दोष राहिले आहेत व त्यांतील विधानें सर्वमान्य होण्याजोगीं नसलीं तरी कुणाचीहि अन्यायमूलक उपेक्षा होऊं

नये याविषयीं शक्य तो खबरदारी घेतली आहे. प्रस्तुत ग्रंथ लिहीत असतां मराठी काव्याच्या चिंतनात पुष्कळ काळ व्यतीत झाला यांतच मला एकप्रकारचे सात्विक समाधान वाटतें. या प्रबंधाच्या अवलोकनानें मराठी कवितेचें वैशिष्ट्य व वैभव वाचकांच्या निदर्शनाला येऊन तिच्या अभ्यासाविषयीं अभिरुचि त्याच्या मनांत विकसित झाली तर माझ्या परिश्रमाचें साफल्य झाले असे मी समजेन. शेवटीं श्रीज्ञानेश्वरांच्या अमृतमधुर शब्दांनीं काव्यरसिकांची प्रार्थना करून ही प्रस्तावना पुरी करितों—

तरी न्यून ते पुरते ।
अधिक ते सरतें ।
करूनि घ्यावें हें तुमते ।
विनवीत असे ॥

कोल्हापूर
१०।९।४५
गणेश-चतुर्थी.

—वि. अ. कुलकर्णी

# प्रकाशकीय निवेदन



श्री. वि. अ. कुलकर्णी यांचा हा ग्रंथ मराठी साहित्यरसिकांच्या पुढे ठेवतांना आम्हांला आनंद होत आहे. प्रस्तुत ग्रंथावरून श्री. कुलकर्णी यांच्या काव्यव्यासंगाचा प्रत्यय वाचकाला सकृद्दर्शनीं सहजगत्या येण्याजोगा आहे. मराठी काव्याचा अभ्यास सर्वांगीण दृष्टीने करण्याकरितां हा ग्रंथ एक चांगले साधन होईल असा विश्वास वाटूनच आम्ही तो महाराष्ट्र वाग्देवीच्या सभामंदिरांत प्रविष्ट करण्याला प्रवृत्त झालो आहो.

ग्रंथाचे वाङ्मयीन मूल्य विद्वान साहित्यवेत्ते आणि चतुर साहित्य रसिकच करूं शकतील. पण ग्रंथाचे द्रव्यरूपांतील मूल्य हे सर्वांना सहन होईल इतके अल्प ठेवण्याची आमची इच्छा असूनहि ते आमच्या दृष्टीने सुध्दां थोडे जास्त झाले आहे हे आम्ही जाणतो आणि याविषयींच वाचकांच्यापुढे थोडे स्पष्टीकरण करूं इच्छितो.

हा ग्रंथ कांहीं निवडक अभ्यासूंच्याच हातीं जाणारा असल्यामुळे त्याच्या प्रती आम्हाला फारच थोड्या काढाव्या लागल्या आणि या प्रतींच्या संख्येच्या मानाने ग्रंथ–प्रसिध्दीचा खर्च आम्हांला जास्त आला. या खर्चांत ग्रंथाच्या अभ्यासू लेखकाला त्यांच्या श्रमाइतके भरपूर पारितोषिक दिल्याचेहि आम्हांला समाधान लाभलेले नाहीं. तरीहि सर्व खर्चाचा विचार करतां कमीत कमी म्हणून उपरिनिर्दिष्ट किंमत आम्हांला ठेवावीच लागली आहे. त्यामुळे आमच्या ग्राहकांनी विपरीत ग्रह करून न घ्यावा अशी आमची प्रार्थना आहे. साहित्याच्या अभ्यासकांना हा ग्रंथ आवडल्यामुळे त्याची दुसरी आवृत्ति काढण्याचा सुयोग जर आम्हांला लाभला तर त्यावेळीं त्याच्या वाङ्मयीन मूल्याच्या व्यस्त प्रमाणांत द्रव्यमूल्य ठेवण्याचा आम्ही अवश्य प्रयत्न करूं.

—प्रकाशक

# अनुक्रमणिका

## प्रकरण १ लें – काव्यविचार



## प्रकरण २ रें – मराठी काव्यांतील आध्यात्मिक युग



## प्रकरण ३ रें – मराठी काव्यांतील अभिजात युग

नाथपरंपरेंतील कवि — जगन्नाथमध्वमुनीश्वर — अमृतराय — चरित्रकार कवि — मोरोपंत — पंताचे दूषक — प्रशंसक — निष्कर्ष — सतराव्या शतकाच्या शेवटी झालेले कवि -- रामजोशी -- अनंतफंदी -- होनाजी बाळ -- प्रभाकर — इतर शाहीर — कीर्तनकार — दोन युगाची तुलना — उपसंहार.

## प्रकरण ४ थें -- मराठी काव्यांतील अद्भुतरम्य युग

प्रास्ताविक — परशुरामपंत तात्या गोडबोले — ( कृष्णशास्त्री ) चिपळूणकर -- तीन शास्त्री कवि -- दोन श्रीमंत कवि -- कुंटे, प्रधान — कीर्तीकर, महाजनी, कानिटकर--करंदीकर, जोशी -- मोगरे — खरे, भिडे वसंत, भाडारे — केशवसुत -- त्याचे वैशिष्टय -- रे. टिळक -- चंद्रशेखर - माधवानुज, कोल्हटकर--विनायक — केळकर, लेले -- Bee -- भिडे, तांबे - गोविंद, दत्त - राधारमण, मुजुमदार - श्रीकृष्ण, अनंततनय - सुमंत, रहाळकर, सावरकर, साधुदास - गोविंदाग्रज, सोनाळकर, तिवारी, रेंदाळकर - बालकवि - इतरकवि - काहीं कवयित्री - आधुनिक कवींवरील आक्षेप - अर्वाचीन काव्यावरील आक्षेप व त्याचें खंडन - उपसंहार.

## प्रकरण ५ वें — मराठी काव्यांतील रसविलास

प्रास्ताविक - रसनिष्पत्ति कशी होतें - रससंख्या - प्रा. चापेकर व कोल्हटकर यांची रसमीमासा - प्रा. जोग व प्रा. केळकर यांची रसमीमांसा - इतर पंडितांची रसमीमांसा - निष्कर्ष - शृंगाररस - महानुभव कवि व ज्ञानेश्वर यांच्या काव्यांतील शृंगार - मुक्तेश्वरांच्या

## प्रकरण ६ वें – मराठी काव्याची वेषभूषा



## प्रकरण ७ वें – मराठी काव्यांतील रचनावैचित्र्य

राष्ट्रीय व ऐतिहासिक गीतें - गूढगुंजनात्मक गीतें - वैज्ञानिक गीतें - व्रजगीतें - स्त्रीगीतें - सुनीतविचार - उद्देशिका - चंपू - गीतिका - सुभाषितें - उपसंहार.

## प्रकरण ८ वें -- मराठी काव्यांतील सृष्टिसौन्दर्य

प्रास्ताविक - महानुभवी काव्यांतील सृष्टिवर्णनें - ज्ञानेश्वर - मुक्तेश्वर - सामराज, रघुनाथ पंडित - पारखी, चिंतामणी, पेटकर - लेंभे, चंद्रशेखर - केशवसुत, टिळक - बालकवि - दत्त, रेंदाळकर, माधवानुज - उपंसहार.

## प्रकरण ९ वें -- मराठी काव्याचें भवितव्य

प्रास्ताविक - मराठी काव्यांतील तत्त्वज्ञान - मराठी काव्यांतील दोष - प्रज्ञा - प्रसाद - प्रतिभा या दृष्टीनें विचार - मराठी काव्याची सद्यःस्थिति - काव्याच्या अवनतीचीं कारणें - मुक्तछंद विचार - निष्कर्ष - उपसंहार.

## प्रकरण १० वें -- मराठी काव्य-मीमांसा

प्रास्ताविक -- काव्यमीमांसकाचे गुण - प्रारंभीचे टीकाकार हंस, चिपळूणकर - भावे, भिडे, पांगारकर, अजगांवकर, राजवाडे - प्राचीन काव्यचिकित्सा - अर्वाचीन काव्यावरील टीकात्मक वाङ्मय - प्रस्तावनेंतील टीकात्मक वाङ्मय - संग्राहक व प्रकाशक - उपसंहार.

---

# संदर्भ-ग्रंथ

१ श्रीज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, दासबोध, तुकारामाची गाथा, मुक्तेश्वरी भारत, आर्याभारत.
२ Mysticism in Maharastra—प्रा. रा. द. रानडे.
३ आधुनिक कविपंचकाचे काव्यसंग्रह.
४ आधुनिक कविपंचक—माडखोलकर.
५ चंद्रशेखर, मोगरे, लेंभे, Bee, साधुदास यांचे काव्यसंग्रह, अभिनव काव्यमाला भाग १-५.
६ पांगारकरांचे इतिहासखंड भाग १-३ व अजगांवकर यांची कवि-चरित्र—माला भाग १-८.
७ वामन पंडितांचे ग्रंथ १-४.
८ समग्र केळकर भा. १० (साहित्य खंड).
९ गीतारहस्य—लो. टिळक.
१० महाराष्ट्र सारस्वत—वा. ल. भावे.
११ काव्यालोचन—प्रा. द. के. केळकर.
१२ काव्यचर्चा—अनंततनय व ना. म. भिडे.
१३ अभिनवकाव्यप्रकाश—प्रा. रा. श्री. जोग.
१४ English Critical Essays. भाग १-२.
१५ सामराज—प्रा. द. सी. पंगु.
१६ छंदोरचना—डॉ. पटवर्धन.
१७ काव्यप्रकाश—मम्मट.
१८ रस-गंगाधर—जगन्नाथ.
१९ कोल्हटकर—लेखसंग्रह—श्री. कृ. कोल्हटकर.
२० निबंधमाला.

याशिवाय अनेक कवींचे काव्यसंग्रह, त्यांच्या प्रस्तावना, निरनिराळ्या मासिकांतील लेख, इंग्रजी, संस्कृत व मराठी या भाषांतील काव्य-मीमांसकांचे ग्रंथ यांचा उपयोग केला आहे.

# महत्त्वाचें शुद्धिपत्र

—०—

| पान | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| १० | भवभूतीनें | भर्तृहरीनें |
| १२ | डिव्हाईन | डिव्हाईन कॉमेडी |
| २२ | कोल्टकर | कोल्हटकर |
| २७ | कुन्देदु | कुन्देन्दु |
| ३६ | शातवाहन | सातवाहन |
| ६४ | फाल्गुन वद्य ३ | फाल्गुन वद्य २ |
| १०२ | कोल्हटकर लेखन संग्रह | अ. ब. कोल्हटकर स्मारक ग्रंथ |
| १०७ | आल्हदप्रद | आल्हादप्रद |
| १४६ | रतरीतवसना | रनरीतवीतवसना |
| २०४ | विश्वनाथ | विठ्ठलनाथ |
| 208 | rhime | rime |
| २५९ | ७ ओळ 'ही आर्या उल्लेखनीय आहे' असे वाचावें. | |
| २७६ | वर्तनात | नर्तनांत |
| २७६ | सागराच्य | सागराच्या |
| २७७ | आंग्लवर्ण | आंग्लद्वेष |

———————

## संक्षिप्तरूपांचें अर्थ



| | |
|---|---|
| र. गं. - रसगंगाधर | अ. पु. - अग्निपुराण |
| सा. द - साहित्यदर्पण | अ. शे - अलंकारशेखर |
| का. द. - काव्यादर्श | व. जी. - वक्रोक्तिजीवित |
| का. प्र. - काव्यप्रकाश. | नि. मा. - निबंधमाला |
| अ का. मा. -अभिनव काव्यमाला | का. सू. - काव्यालंकार सूत्रें |
| अ. का. प्र. - अभिनव काव्यप्रकाश | का. च. -काव्यचर्चा |
| म. उ. - मराठी भाषेचा उद्गम व विकास | वि. सिं. - विवेकसिंधु |
| | म. वा. इ. - मराठी वाङ्मयाचा इतिहास. |
| व. ह - वच्छहरण | सं व. - संत वचनामृत |
| ज्ञा. - ज्ञानेश्वरी | वि. ज्ञा. वि. - विविधज्ञानविस्तार |
| ना. सी. स्व. - नागेशकृत सीतास्वयंवर | लो. शि. - लोकशिक्षण. |
| | म. सा. - महाराष्ट्र सारस्वत. |
| मो. फु - मोगऱ्याचीं फुलें | वि. क. - विनायकाची कविता |
| कृ. वि - कृष्णविजय | ना. शा.—नाट्यशास्त्र |
| हृ. त. - हृदयतरंग | S. J. - Scott - James |

# मराठी काव्य-समीक्षा

## प्रकरण पहिलें



### काव्य-विचार

आतां अभिनव वाग्विलासिनी । जे चातुर्यार्थकलाकामिनी ।
ते शारदा विश्वमोहिनी । नमिली मियां ॥

—श्रीज्ञानेश्वर ( ज्ञानेश्वरी १–२१ )

काव्य हा साहित्याचा सर्वश्रेष्ठ लेखनप्रकार आहे. त्रिविधतापानें त्रस्त झालेल्या मानवीहृदयाला कविता ही निर्मल आनंदाचा लाभ करून देते. ह्मणून काव्याला वाङ्मयविश्वांत अपूर्व महत्त्व प्राप्त झाले आहे. काव्य ही एक ललितकला आहे. पण इतर ललितकलांचीं उपकरणें जड असल्यामुळें त्या केव्हां ना केव्हां तरी नाश पावणाऱ्या आहेत. पण काव्याचें उपकरण अक्षरात्मक असल्यामुळे काव्यकला ही अक्षर व अव्याज-मनोहर आहे. किंबहुना, काव्यकला ही सर्व ललितकलांची सम्राज्ञी आहे असें ह्मटल्यास त्यांत अतिशयोक्ति होणार नाही. काव्यांत सत्य आणि सौंदर्य यांचें मनोज्ञ मिश्रण झालेले असते. ह्मणून कविता ही सत्य व सौंदर्य यांची सुमनवाटिका आहे असे ह्मणतां येईल. अनेक राजवटी व असंख्य संस्कृति जरी कालाच्या उदरांत विनाश पावल्या तरी अभिजात कवींनीं निर्माण केलेली कविता ही अमरत्वाच्या सिंहासनावर विराजमान झाली आहे. आधिभौतिक शास्त्राचा जरी कितीहि अभ्युदय झाला तरी काव्याचें महत्त्व व मनोरमत्व केव्हांहि कमी होणार नाहीं. कारण काव्याचें सौंदर्य हें अलका नगरींतलि सदायौवना ललनेप्रमाणें निरंतर अम्लान आहे. ‘ प्रतिक्षणिं

नवीच दे रुचि' असें सामर्थ्य जर कशांत असेल तर तें काव्यांतच होय. सारांश, कविता ही मानवजातीला समुल्लसित व समुन्नत करणारी एक कल्पलता आहे, असें म्हटल्यास त्यांत अतिशयोक्ति होणार नाहीं.

राजशेखरनें आपल्या 'काव्य मीमांसे'मध्यें 'इह हि वाङ्मयमुभयथा शास्त्रंच काव्यंच' (अ. २) असे म्हटलें आहे. वाङ्मय हें शास्त्ररूप व काव्यरूप असे दोन प्रकारचे आहे. काव्यसौंदर्याच्या अलौकिकतेविषयीं जरी एकमत असलें तरी काव्याच्या व्याख्येसंबंधी अनेक मते आहेत. काव्याची सर्वमान्य व्याख्या करण्याचें श्रेय अजूनपर्यंत कोणत्याहि काव्यमीमांसकाला लाभलेलें नाहीं. दंडीने काव्याविषयी "शरीरं तावदिष्टार्थव्यवच्छिन्ना-पदावली" (का. द. १-१०) असें म्हटलें आहे. काव्यांत कितीहि वाग्वैदग्ध्य असले तरी रस हेच काव्याचे जीवित होय. (वाग्वैदग्ध्य प्रधानेऽपि रस एवात्र जीवितम् - अ. पु. ३३६-३३). भामहानें 'शब्दार्थौ साहितौ काव्यं गद्यं पद्यं च तद्द्विधा' असे म्हटले आहे. भामह असेहि म्हणतो की काव्य हें निर्दोष व सालंकार असावे. हेमचंद्रानें 'अदोषौ सुगुणौ सालंकारौच शब्दार्थौकाव्यम्' (काव्यानुशासन पृ. १६) असें म्हटलें आहे. पंडित विश्वनाथाने—

वाक्यं रसात्मकं काव्यं दोषस्तस्यापकर्षकः ।
उत्कर्ष हेतवः प्रोक्ता गुणालंकार रीतयः ।। (सा. द. १,३)

—रसात्मक वाक्य हेच काव्य होय अशी काव्याची निसंदिग्ध व्याख्या केली आहे. केशवमिश्राने—'काव्यं रसादिमद् वाक्यं श्रुतं सुखविशेषकृत् । हिताय सुकविः कुर्यात् तद्धेतुः प्रतिभादिकम् ।। (अलंकारशेखर १-१)— या कारिकेंत हीच कल्पना मान्य केलेली आहे. अलंकार हे काव्यसौंदर्य वृद्धिंगत करणारे असले तरी रस हाच काव्याचा आत्मा होय.—'अलंकारस्तु शोभायै रस आत्मा परे मनः' (अ. शे. २-२). जगन्नाथ पंडितांनी "रमणीयार्थ प्रतिपादकः शब्दः काव्यं । रमणीयता च लोकोत्तराह्लादजनक ज्ञान

गोचरता । लोकोत्तरत्वं च आह्लादगतः चमत्कारत्वापरपर्यायोऽनुभव साक्षिको जातिविशेषः (र. गं. पृ. ४) – रमणीयार्थप्रतिपादक शब्द ते काव्य होय अशी काव्याची व्याख्या केली आहे. जगन्नाथाच्या व्याख्येंत चमत्कृतीला प्राधान्य मिळाले आहे. चमत्कृतीशिवाय काव्याला चारुता प्राप्त होत नाही. कुंतकानें—

शब्दार्थौ सहितौ वक्र कविव्यापारशालिनी ।
बन्धे व्यवस्थितौ काव्यं तद्विदाह्लादकारिणी ॥ (व. जी.)

असे म्हटले असून त्याने वक्रोक्तीला प्राधान्य दिले आहे. वामनानें रीतीवर भर दिला असून आनंदवर्धनाचार्यांनी ध्वनीचे तत्त्व प्रतिपादन केले आहे. तथापि रीति, वक्रोक्ति, ध्वनि व चमत्कृति या पेक्षां रस हाच काव्याचा आत्मा आहे याविषयी सर्वांचे एकमत आहे. परिमल हा पुष्पाचा त्याप्रमाणे रस हाच काव्याचा आत्मा होय. तात्पर्य, काव्य हें सरस, सगुण व सालंकार असावे असा संस्कृत साहित्यकोविदांच्या मतांचा निष्कर्ष सांगतां येईल.

येथपर्यंत संस्कृतकाव्यशास्त्रज्ञांच्या मताचा उहापोह केल्यानंतर आता आपण आंग्लकाव्य-मीमांसकांच्या काव्यचर्चेकडे वळूं, 'Poetry strictly and artistically speaking so called is the utterance of a passion for truth, beauty and power.' –सत्य, सौंदर्य व सामर्थ्य यांचे अविष्करण म्हणजे काव्य होय अशी ले हंटने काव्याची व्याख्या केली आहे. हॅझलिटने ' Poetry is the language of the imagination and the passion. It comes home to the bosoms and business of men… . it has been the study and delight of mankind in all ages.' — असें म्हटलें आहे. काव्य हें कल्पना व भावना यांचे चित्रीकरण असून सर्व कालांतील मामवजातीच्या अध्ययनाचें व आनंदाचें साधन आहे. वर्ड्सवर्थनें " Poetry is the breath and and finer sprit of all knowledge. " – असें म्हटलें आहे. काव्य हें ज्ञानाचें सौंदर्यसर्वस्व

आहे; इतकेंच नव्हे तर शेलेनें " Poetry is the centre and circumfurance of all knowledge " – काव्य हें सर्व शास्त्रांचें केंद्रीकरण आहे असे म्हटलें आहे. भावनांकित विचार व शब्द म्हणजे काव्य अशी मिल्टनें काव्याची व्याख्या केली आहे. (What is poctry but the thought and word in wh.ch emotion spotaneously embodies itself) परंतु त्या भावनांचे मधुर भाषेत मनोज्ञरीतीने प्रगटीकरण झालें पाहिजे. शेले म्हणतो: " The functions of poetry are two fold; by one it creates new materials of knowledge and power and pleasure; by the other it engenders in the mind a desire to produce and arrange them according to a certain rhythm and order which may be called the beautiful and the good " कालाईलनें मधुर विचार – 'Musical thought' – म्हणजे काव्य अशी काव्याची व्याख्या केली आहे. एकंदरींत, पाश्चात्य काव्यकोविदांनीं काव्याच्या व्याख्येत भावनोल्लास, कल्पनाविलास व विचारविन्यास यांवर अधिक भर दिला आहे.

आतां आपण मराठी ग्रंथकारांनीं केलेल्या काव्य-मीमांसेकडे वळूं. प्राचीन मराठी वाङ्मयांत काव्यमीमांसापर असें ग्रंथ नाहींत. त्यामुळें प्राचीन ग्रंथकारांच्या काव्यांच्या व्याख्या उपलब्ध नाहीत. तथापि श्रीशारदावंन करितांना प्राचीन कवींच्या काव्यकल्पना उत्कृष्टरीतीनें व्यक्त झाल्या आहेत. मुक्तेश्वरानीं काव्याची अधिष्ठात्री देवता जी सरस्वती तिचें स्तवन करितांना–

नवरसांची मंदाकिनी । महिमे वाहे त्रिभुवनीं ।
त्रैलोक्यातें वरदायिनी । देवत्रया पढियंती ॥
तेचि सुवासिनी निर्वाणी । सौभग्यदायिनि शुभकल्याणी ।
अर्थखाणी सकळ सुजाणी । वर सुपाणियाचि जे ॥
वीणापुस्तकधारिणी । दारिद्य–दुःख परिहारिणी ।
जे पांडित्यदानें सुखकारिणी । ते वंदिली शारदा ॥

—आदिपर्व अ. १–३४, ३५, ३७.

-असे उद्गार काढलें आहेत. या ओव्यावरून काव्य हें नवरसात्मक, सौभाग्यदायक, दारिद्र्यदुःखपरिहारक व सुखदायक असावें अशी त्यांची काव्याविषयींची कल्पना दिसून येतें. श्रीशारदा ही वीणापुस्तकधारिणी आहे व या ब्रह्मनंदिनी शारदेच्या वीणेतून जें नादब्रह्म निर्माण झालें त्याने अखिल ब्रह्मांडालाहि मोहिनी घातली आहे. श्रीधरांनी " **जे आनंदसरोवर-मराळिका । जे चातुर्यचंपक-कळिका । जीचे कृपेची करूनि नौका । कविबाळका नेत परतीरा** " असे शारदेचे वर्णन केले आहे. यावरून काव्य हे आनंदपूर्ण असावे अशी त्यांची कल्पना दिसते. या सर्वापेक्षां समर्थांनी 'दासबोधांत' केलेले विवेचन अधिक स्पष्ट व सुसंगत आहे. त्यांनी पहिल्या दशकाच्या सातव्या समासांत कविमहिमा उत्कृष्ट-रीतीने गाइला आहे. प्रारंभीच त्यांनी '**आतां वंदूं कवीश्वर । जे शब्द-सृष्टीचे ईश्वर**' असा कवीश्वरांचा यथोचित गौरव केला आहे. चौदाव्या दशकाच्या सातव्या समासांतहि त्यांनी मार्मिक काव्यविवेचन केले आहे. श्रीसमर्थ म्हणतात:—

**कवित्व असावें निर्मळ । कवित्व असावें सरळ ।**
**कवित्व असावें प्रांजळ । अन्वयाचें ॥ ३६ ॥**
**कवित्व असावें भक्तिबळें । कवित्व असावें अर्थागळें ।**
**कवित्व असावें केवळें । अहंतेसी ॥ ३७ ॥**
**मृदुमंजुळ कोमळ । भव्य अद्भुत विशाळ ।**
**गौल्य माधुर्य रसाळ । भक्तिरसें ॥ ४० ॥**

या ओव्यांवरून काव्य हें निर्मळ, सरळ, भक्तिरसात्मक, अर्थपूर्ण, मृदु मंजुळ व भव्याद्भुत असावे अशी त्यांची काव्याविषयी विचारसरणी दिसून येतें. प्राचीन कवि भगवद्भक्त असल्यामुळें त्यांच्या काव्यकल्पनेंत भक्तिरसाचा अंतर्भाव झाला असल्यास त्यांत नवल नाहीं. आधुनिक ग्रंथकारांत प्रा. वा. ब. पटवर्धन यांनीं 'काव्य आणि काव्योदय' या निबंधांत "प्रस्फुरित, कंपित,

क्षुब्ध केलेल्या हृदयाचें आवेगोद्गार ज्यांत भरले आहेत असा विषय किंवा अर्थ आणि त्या आवेगोद्गारास अनुरूप अशा तालबद्ध समर्पक रसाळ शब्दांची योजना यांच्या संगमानें रमणीय झालेली वाग्रचना म्हणजे कविता किंवा काव्य होय." (पृ. ८१) अशी काव्याची व्याख्या केली आहे. प्रा. पटवर्धन यांनी आपल्या काव्याच्या व्याख्येत भावनोत्कटता व रसाळ शब्दयोजना यांचा प्रामुख्यानें अंतर्भाव केला आहे. श्री. कृ. कोल्हटकर यांनी आपल्या पुणें येथील कविसंमेलनाच्या अध्यक्षीय भाषणांत काव्यांतील वैचित्र्यावर अधिक भर दिला आहे. एकंदरींत, मराठी ग्रंथकारांच्या मतें काव्याच्या व्याख्येत भक्तिरसात्मकता, भावनोत्कटता, वैचित्र्य व आनंदप्रदता यांचा प्रामुख्यानें अंतर्भाव होतो.

येथपर्यंत संस्कृत, इंग्रजी व मराठी ग्रंथकारांच्या दृष्टीनें काव्याच्या व्याख्येसंबंधी थोडक्यांत विवेचन केलें. काव्याची समर्पक व सर्वमान्य व्याख्या करणें अशक्य असल्यामुळें पुष्कळांनी व्याख्या करण्यापेक्षां काव्याचें वर्णनच अधिक केलें आहे. काव्य हें हृदयसंवेद्य असल्यामुळें अभिरुचिभेदानुसार त्यांत मतवैचित्र्य भरपूर आढळतें. तथापि या सर्व विवेचनावरून '**रसपूर्ण व रमणीय वाग्रचना म्हणजे काव्य होय**' अशी काव्याची थोडक्यांत व्याख्या करितां येईल. ही वाग्रचना पद्यात्मक असल्यास काव्याच्या सौंदर्यांत स्पृहणीय भर पडते. म्हणून पद्यात्मक शब्दरचना हें काव्याचें प्रमुख लक्षण होऊन बसलें आहे. सारांश, अखिल मानवजातीला आत्यंतिक आनंदाचा लाभ करून देणाऱ्या या अव्याजमनोहर कवितारतीचें वर्णन—

**अये कवि-मनोभवें, सहजसंभवे स्वामिनी,**
**सुवर्णमय-देहिनी, नवरसात्मके, भामिनी,**
**प्रसादमय-जीविते, अनुविचार–संचारिणी,**
**चमत्कृति-विलासिनी, रसिक–सन्मनोहारिणी.** –चंद्रिका पृ. ११५.

या चंद्रशेखरांच्या मृदुमधुर शब्दांत कुणाला करावेसें वाटणार नाहीं ?

आतां आपण काव्याची उत्पत्ति कोणत्या कारणामुळें होतें याचा विचार करू. दण्डीने—

**नैसर्गिकी च प्रतिभा श्रुतंच बहुनिर्मलम् ।**
**अमन्दश्चाभियोगोस्याः कारणं काव्यसंपदः ॥**

काव्यादर्श १–१०३.

या कारिकेत नैसर्गिक प्रतिभा, निर्मल बहुश्रुतता व निरंतर अभ्यास अशी काव्योत्पत्तीची तीन कारणे सांगितली आहेत. हेमचंद्राने प्रतिभेची '**नवनवोन्मेशालिनी प्रज्ञा**' (काव्यानुशासन पृ. २) अशी व्याख्या केली आहे. प्रतिक्षणी नवीन उन्मेष दाखविणारी प्रज्ञा ती प्रतिभा होय. अभिनवगुप्ताने '**अपूर्व वस्तु निर्माणक्षमा प्रज्ञा प्रतिभा** (लोचना पृ. १९) अशी प्रतिभेची व्याख्या केली आहे. प्रतिभा ही उत्पादक शक्ति असल्यामुळे ती अपूर्व वस्तु निर्माण करण्यांत आनंद मानते. रजनीशिवाय ज्याप्रमाणे नक्षत्र तारकांचे वैभव नभोमंडलांत दृग्गोचर होत नाही त्याप्रमाणे प्रतिभेशिवाय कोणत्याहि कलेतील सौंदर्य निर्माण होत नाही. म्हणून जगन्नाथ प्रतिभा हेच काव्याचे कारण आहे असें म्हणतो (**तस्य च कारणं कवित्गता केवला प्रतिभा**–र. गं. पृ. ८). ही प्रतिभाशक्ति अनुकूल नसतांना केलेली काव्यरचना उज्ज्वल न होतां उलट उपहासास्पद ठरते. म्हणून मम्मट प्रतिभेची व्याख्या अशी करितोः "**शक्तिः कवित्वबीजरूपः संस्कार विशेषः । यां विना काव्य न प्रसरेत्, प्रसृतं वा उपहसनीयं भवेत्**" (का. प्र. उ. ४-१) काव्याच्या क्षेत्रांतच काय पण ज्ञानाच्या इतर कोणत्याहि क्षेत्रांत अभिनव निर्माण करण्याची पात्रता प्रतिभेमुळेंच येते. प्रज्ञा ही संग्राहक तर प्रतिभा ही उत्पादक शक्ति आहे. यामुळे अनुपमेय सौंदर्य निर्माण करणारी ही अत्युज्ज्वल शक्ति अनंत परमात्मतत्त्वाची साक्षात् ज्योत होय असे कांही जणांना वाटते. अनेक कवि-काव्यमीमांसकांनीं प्रतिभेवर

अतिरिक्त स्तुतीची सुमनञ्जालि वाहिल्यामुळें तिचें मूळचें स्वरुप लोपून गेलें आहे. म्हणून प्रा. द. के. केळकर यांनीं 'काव्यालोचनांतील' 'कवि प्रतिभा' या प्रकरणांत सर्व उलटसुलट मुद्यांचा सांगोपांग विचार करून "मानवी मनाच्या इतर शक्तीहून मूलतः भिन्न दैवी, निरुपाधिक असें प्रतिभेंत कांहीं नसून सामान्य माणसांतील कल्पनाशक्तीचें अधिक उज्ज्वल प्रभावी स्वरुप म्हणजे प्रतिभा असावी" (पृ. ४७) असा निष्कर्ष काढला आहे. प्रतिभेच्या भोंवतालचा उसना प्रकाश मालविण्यांत त्यांनी चांगले यश संपादन केलें आहे हें खरें. तथापि प्रतिभा ही विद्युल्लतेप्रमाणें देदीप्यमान शक्ति असून तिच्यावांचून उत्कृष्ठ काव्यानीर्मिती होणार नाही. इतकेंच नव्हे तर सामान्य वस्तूला असामान्य स्वरुप देण्याचें कार्य प्रतिभाच करितें. परिसाच्या स्पर्शानें ज्याप्रमाणें लोहाचे सुवर्ण होतें त्याप्रमाणें प्रतिभेच्या स्पर्शानें क्षुद्र विषयालाहि रम्यत्व प्राप्त होते. म्हणून केशवसुतांनी प्रतिभेला 'अत्युद्भुत गूढ शक्ति' या शब्दांनीं गौरविलें आहे. प्रतिभेच्या दीप्तीनें तळपणारी कविता अरुणरागानें रंजित झालेल्या मेघमालेप्रमाणें मनोहर वाटते. प्रतिभेच्या दिव्योज्ज्वल लावण्यानें कुणाचे अंतःकरण मोहित होणार नाहीं? म्हणून कॉलरिज्, कार्लाइल, श्लेजेल, शॉपेनहॉर, केशवसुत या वागीश्वरांनी प्रतिभादेवतेवर जे वाग्वैभव उधळले आहे तें समर्थनीय वाटते. ज्ञानाच्या सर्व क्षेत्रांत अप्रतिहत प्रभुत्व [illegible] ही प्रतिभाशक्ति कुणाला अतीद्रिय व अलौकिक अशी ईश्वरी शक्ति आहे असें वाटल्यास त्यांत काय आश्चर्य? सारांश व्यास, वाल्मीकि, कालिदास, भवभूति, ज्ञानेश्वर, मुक्तेश्वर, शेक्सपीअर, मिल्टन, होमर, गटे, डांटे या कवीश्वरांची काव्यरचना प्रतिभेच्या दीप्तीने प्रकाशमान असल्यामुळेंच कराल कालानलांतहि निरंतर अम्लान राहिली आहे.

नैसर्गिक प्रतिभेबरोबरच दण्डीने निर्मल बहुश्रुतता हें काव्योत्पत्तीचें दुसरें कारण सांगितलें आहे. 'अनेक ग्रंथाच्या अवलोकनानें प्राप्त होणारी

बहुश्रुतता व तज्जन्य विद्वत्ता ही काव्योत्पत्तीला उपकारक होते. तथापि विद्वत्त्व व कवित्व ही परस्परपोषक आहेत कीं नाहींत याविषयीं फार मतभेद आहे. कांहीं जणांच्या मते विद्वत्त्व हे कवित्वाला विघातक असून त्यामुळे काव्याची हानि होते. पांडित्याच्या प्रभंजनानें कवित्वाचा फुलोरा गळून पडतो. कविता ही ईश्वराची देणगी असून तिच्या विलासाला विद्वत्तेची गरज नाही. इतकेच काय तर विद्वत्त्व व कवित्व यांत अहिनकुल भाव आहे. '**विद्वत्त्वं च नृपत्वं च नैव तुल्यं कदाचन**' या सुभाषिता-प्रमाणेच '**विद्वत्त्वं च कवित्वं च नैवं तुल्यं कदाचन**' असेहि सुभाषित रचतां येईल. जयदेवाने 'प्रसन्नराघव' या नाटकांत नटाच्या तोंडून "**ननु अयं प्रमाणप्रवीणोऽपि श्रूयते । तदिह चंद्रिकाचंडातपयोरिव कविता तार्किकत्वयोरेकाधिकरणतामवलोक्य विस्मितोऽस्मि**" —असे वदविण्यांत विद्वत्त्व व कवित्व यांतील विरोधच सूचित केला नाही काय ? मेकॉलेने आपल्या मिल्टनवरील निबंधांत "As civilization advances poetry declines"—संस्कृतीची प्रगति म्हणजे काव्याची परागति होय असा सिद्धांत मांडला असून विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं 'निबंधमालेत' त्याचाच अनुवाद केला आहे. पुष्कळ वेळां पंडित कवींची कृश व कृत्रिम काव्य-रचना पाहून वसंतसेनेची प्रणयाराधना करणाऱ्या शकाराची आठवण होते. समर्थांनीं अनेक ग्रंथांचे अवलोकन करून काव्यरचना करणाऱ्या कवींना 'धीटपाठ' ही उपहसनीय संज्ञा दिली आहे. विष्णुशास्त्री म्हणतात, "कवित्वास किंवा रसिकतेसहि विद्वत्ता अगदी कारण नाहीं. उलट ती मागें सांगितल्याप्रमाणें स्वभावता विरुद्ध होय असें म्हटलें पाहिजे." [ नि. मा. पृ. ४८ ]. कवित्वाचे मूलतत्त्व भावनोत्कटता हे आहे व विद्वत्तेमुळें बुद्धिप्रकर्ष झाला तरी भावनाप्राधान्य कमी होतें. यामुळें पंडित कवींची कविता प्रज्ञाप्रेरित असली तरी ती भावनाप्रधान नसल्यामुळें हृदयस्पर्शी

**हरिचाच खरा महाप्रसाद । कविता शक्ति गर्भे निसर्गसिद्ध ।**
**दिधली कवित्वशक्ति ही जयाला । हरिनें तो न गणी परिस्थितीला ।।**

—अ. का. मा. भा. १ पृ. २१.

कवित्वशक्ति हा ईश्वरीप्रसाद असून ती निसर्गसिद्ध आहे. म्हणून लक्ष्मीसरस्वतीप्रमाणें विद्वत्त्व व कवित्व यांचा एकत्र अधिवास दुर्मिळ असतो. केवळ 'ट' ला 'ट' जोडून काव्य करणाऱ्या पंडिताला रससिद्ध कवींशी कशी स्पर्धा करितां येईल? कागदीं फुलें कितीही आकर्षक असलीं तरी वेलीवर फुललेल्या फुलांचा टवटवीतपणा त्यांत कोठून आढळणार? भवभूतीनें म्हटलेच आहे:—

**हटादाकृष्टानां कतिपयपदानां रचयिता ।**
**जनः स्पर्धालुश्चेदहह कवितां वश्यवचसा ।।**
**भवेदद्य श्वो वा किमिह बहुधा पाणिनि कवौ ।**
**घटानां निर्मातुस्त्रिभुवन विधातुश्च कलहः ।।**

तथापि विद्वत्त्व व कवित्व यांत विरोध आहे हे मत कुणालाहि मान्य होण्याजोगें नाहीं. विद्वत्तेचा यथोचित उपयोग करून घेतला तर तो काव्योत्कर्षाला कारणीभूत होतो. अनेक शास्त्रांच्या अध्ययनाने बुद्धि विकास पावते व त्याचा उपमादृष्टांताच्या रूपाने काव्यांत रसानुकूल उपयोग करून घेतां येतो. यामुळें कवित्वाला विद्वत्त्व हे मारक नसून उपकारक आहे असें क्षेमेंद्राने पांचव्या संधींत आपलें मत व्यक्त केले आहे. जगन्नाथाने देखील प्रतिभा ही कांहींत दैवताप्रसादजन्य व कांहींत परिशीलनानें उत्पन्न होते असे म्हटले आहे. राजशेखर 'काव्यमीमांसेंतील' पांचव्या अध्यायांत म्हणतो: "**प्रतिभा व्युत्पत्त्योः प्रतिभा श्रेयसी इति आनन्दः व्युत्पत्तिः श्रेयसी इति मंगलः प्रतिभा व्युत्पत्ती मिथः समवेते श्रेयस्यौ इतियायावरीयः.**" राजशेखराच्या मते प्रतिभा व पांडित्य यांचा संगम श्रेष्ठ होय. किंबहुना, कालिदास, बाण, मिल्टन

टेनिसन, मुक्तेश्वर, मोरोपंत, आणि रे. टिळक यांच्या विद्वत्तेमुळे त्यांच्या काव्याला **'सोनियासी जोडलें। सौरभ्य जैसें'** या ज्ञानेश्वरांच्या उक्तीप्रमाणें आल्हादक सौंदर्य प्राप्त झालें आहे. हरिभाऊ आपटे यांनीं म्हटल्या-प्रमाणें " शास्त्रज्ञान वाढत चाललें म्हणजे कवित्वरचनेचा ऱ्हास होतो हें मेकॉलेचे प्रमेय सर्वथा त्याज्य आहे. शास्त्रज्ञान व तत्त्वज्ञान हीं दोन्ही कवित्वाचा उत्कर्ष होण्याला कधीहि विघ्नरूप होणें शक्य नाहीं. ( मोगऱ्याची फुले प्र. भा ३ पृ. ८ ) सारांश कवित्व व विद्वत्व ही परस्पर विघातक नसून परस्परपूरक व परस्परपोषक आहेत.

नैसर्गीक प्रतिभा, निर्मल बहुश्रुतता यांच्या इतकीच निरंतर अभ्यासाची देखील काव्योत्पत्तीला अवश्यकता आहे. कवीला काव्यज्ञांच्या नेतृत्वाखाली काव्यरचना करण्याचा पुनःपुन्हा अभ्यास करावा लागतो. कवि हा कितीहि प्रतिभाशाली असला तरी त्याला निरनिराळीं वृत्ते, शब्दप्रयोग, त्यांचे विशिष्ठ अर्थ वगैरे गोष्टींकडे लक्ष पुरवावे लागतें. हेमचंद्रानें ' काव्यानुशासनांत ' काव्यशास्त्रज्ञांच्याजवळून कोणत्या गोष्टी घ्याव्या याचे सविस्तर विवेचन केलें आहे. कांही जणांच्या मतें कवि हा स्वतःसिद्ध व स्वयंभू असल्यामुळे त्याला अभ्यासाची जरूरी नाहीं. चंद्रशेखर ' कुंजकूजन ' या काव्यांत म्हणतातः—

**काय म्हणूनी शिकवील मला हो तो । आणि शिकवोनी काय कवी होतो।**
**कदा नोहे रससिद्ध कवि जो कीं । स्वयंभू तो अवतरत असे लोकी ।**
**स्वयं काव्यस्फूर्तिस पावणारा । स्वयं नादब्रम्हांत गुंगणारा ।**
**शब्दसृष्टीचा चतुर विधाता तो । जगन्मोहन या खगापरी गातो ।**

—( चंद्रिका पृ. १०७ )

कवि हा शिकवून होत नाहीं. ' A poet is born not made ' या वचनांत हचि कल्पना आहे. हें जरी कांहीं अंशी खरें असले तरी कवीनें अभ्यासाकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं. कवीला आपल्या मनांतील

भावना ओबडधोबडरीतीनें कशातरी व्यक्त करून चालत नाही. त्याला आपल्या कल्पना शब्दांच्या सुभग आभरणांनीं सजवून मनोवेधक पद्धतीनें रसिकांपुढे मांडाव्या लागतात. यामुळे त्याला काव्याच्या बहिरंगाकडे लक्ष पुरविले पाहिजे. भाषाप्रभुत्व, वृत्तवैचित्र्य, अलंकारचातुर्य, रचनासौष्ठव इत्यादि काव्याचे बहिरंग आकर्षक करणाऱ्या गोष्टी अभ्यासाशिवाय साध्य होण्याजोग्या नाहीत. वर्ड्‌सवर्थनें म्हटल्याप्रमाणे काव्य म्हणजे भावनांचा सहजोद्रेक होय. (Poetry is the spontaneous outburs of powertul teelings ) परंतु हा भावनांचा सहजोद्रेक सौंदर्यपूर्ण असल्याखेरीज रसिकाल्हादक होणार नाहीं. म्हणून अविश्रांत परिश्रम करून अखंड अभ्यास चालू ठेवणाऱ्या कवीच्या हातूनच अव्यंग सौष्ठवाने मंडित अशी अभिजात काव्यरचना निर्माण होते.

काव्याच्या उत्पत्तीनंतर आतां आपण काव्याच्या प्रयोजनाकडे वळूं. या जगांत मनुष्याची कोणतीहि कृति प्रयोजनाशिवाय होत नाही. मनांत कांहीतरी प्रयोजन धरून मग कार्याला प्रवृत्त व्हावें असा मनुष्यस्वभावच आहे. त्याचप्रमाणे काव्याचीहि स्थिति आहे. मम्मटांनीं—

**काव्यं यशसेऽर्थकृते, व्यवहारविदे, शिवेतरक्षतये ।**
**सद्य:परानिर्वृतये कान्तासंमिततयोपदेशयुजे ।।** (का. प्र. उ. १)

या आर्येत यश, द्रव्यलाभ, व्यवहारज्ञान, अशुभनिवारण, सद्य:परनिर्वृति व कान्तातुल्य उपदेश असे काव्याचें षड्‌विध प्रयोजन सांगितलें आहे. भामह म्हणतो:—

**धर्मार्थकाममोक्षेषु वैचक्षणं कलासुच ।**
**प्रीतिं करोति कीर्तिंच साधुकाव्यानिबन्धम् ।।** (१–२)

चांगल्या काव्यरचनेनें धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चतुर्वर्ग व इतर चौसष्ट कला यांमध्यें वैचक्षण्य लाभून प्रीति व कीर्ति यांची प्राप्ति होते. वामनानें काव्याचे कीर्ति व प्रीति असें द्विविध प्रयोजन मानलें आहे. काव्यं

**सद्दष्ट्वार्थं प्रीति कीर्ति हेतुत्वात्** [ का. सू. १,१५] हेमचंद्र काव्यानुशासनांत '**काव्यमानन्दाय यशसे कान्तातुल्योपदेशायच**' (पृ. २) असें ह्मणतो. त्यानें आनंद, यश व कान्तातुल्य उपदेश असे काव्यान्चें त्रिविध प्रयोजन मानले आहे. वाग्भटानें काव्यानुशासनांत "**काव्यप्रमोदाय, अनर्थपरिहाराय, व्यवहारज्ञानाय, त्रिवर्गफललाभाय कान्तातुल्यतयोपदेशाय कीर्तये**" असे ह्मटले आहे. कविवर्य चंद्रशेखर यांनी,

**व्याधीच्या गुरुवेदना शमविते आधीस नेते लया ।**
**नाना चित्तकला प्रसन्न करुनी दे दिव्य दीप्ती तया ॥**
**जें जें शुद्ध उदात्त उज्ज्वल असें हेलावतें तें मनीं**
**धन्या ती कविता भवार्तहि जनां जी वृत्ति दे उन्मनी ।**

या श्लोकांत आधिव्याधिनाश, चित्तप्रसन्नता व उन्मनीवृत्तिलाभ असें काव्याचे प्रयोजन सांगितले आहे. होरेसने ह्मटल्याप्रमाणें आनंदप्रद सदुपदेश हे काव्यान्चें साध्य आहे. (Delightful teaching is the end of Poetry.) मॅथ्यू आर्नोल्ड ह्मणतो: "Poetry is serious representation of an excellent action having the object of highest enjoyment" उत्कृष्ट कृतींचे उदात्त आनंद होईल अशा रीतीनें गंभीर प्रगटीकरण करणें हा काव्याचा उद्देश आहे. एकंदरींत संस्कृत, मराठी व इंग्रजी काव्यमीमांसकांनी सांगितलेल्या काव्यप्रयोजनांत बरेच साद्दश्य दिसून येतें.

आतां आपण मम्मटांनीं सांगितलेल्या षड्विध प्रयोजनांचें सविस्तर विवेचन करूं. मम्मटांनीं यश हें काव्याचे पहिले प्रयोजन सांगितलें आहे. प्रत्येकाला आपणाला यश मिळावे, आपले नांव सर्वतोमुखी व्हावें अशी उत्कट इच्छा असते. कीर्तीचा मोह इतका अनिवार आहे की त्या हेतूनें काव्यरचना केल्यास ती क्षम्य मानतां येईल. बाह्यतः कीर्तीविषयी उदासीन असणारे कवि अंतर्यामीं तिच्याविषयी उत्सुक असतात असें दिसून येतें. तथापि यश हें काव्याचें प्रयोजन मानणे युक्त होणार नाही. कारण कांही

कवींना जिवंतपणी कीर्तीचा यत्किंचितहि लाभ झाला नाहीं तरी त्यांनीं अखंड काव्योपासना चालविली होती. उदाहरणार्थ, केशवसुतांना जिवंतपणीं मुळींच कीर्ति मिळाली नाही, उलट आपत्ति व अपमान हींच त्यांच्या वाट्याला आलीं. ते वारल्यानंतर मात्र त्यांच्या कवितेला यशःश्रीचा लाभ झाला. कै. श्री. कृ. कोल्हटकरांनी झटल्याप्रमाणे, "प्रतिभाशाली कवीला कीर्ति-रूपी वधूची प्राप्ति करून घेण्यासाठी मृत्यूसारख्या मध्यस्थाची गरज पडावी हा केवळ दैवदुर्विलास होय [ काव्यचर्चा. पृ. ३० ]. आपणांला कीर्ति मिळाली नाही तरी स्फूर्तिशाली कवि काव्यरचना करण्याचे थांबवीत नाहीं. म्हणून यश हें काव्याचे नित्यप्रयोजन मानणे योग्य दिसत नाही. यशा-प्रमाणेच 'अर्थकृते' हे मम्मटांनी काव्याचे दुसरे प्रयोजन सांगितले आहे. संगीत, चित्र, नाट्य इत्यादि कलाप्रमाणे काव्य हीहि एक अनुकरणात्मक कला आहे. इतर कलेपासून ज्याप्रमाणे द्रव्यलाभ होतो, त्याप्रमाणे काव्या-पासूनहि क्वचित् अर्थप्राप्ति होते. मम्मटांनी हर्षापासून धावकादि लोकांना अर्थप्राप्ति झाल्याचा उल्लेख केला आहे. तसेच 'विक्रमांकदेवचरित्र' व 'नवसाहसांकचरित्र' ही काव्ये अर्थप्राप्तीच्या हेतूनेच लिहिली गेली. रविंद्र-नाथांसारख्या महाकवींना 'नोबेल पारितोषकाच्या' रूपाने अमूप धनलाभ झाला. तथापि काव्यामुळें एकाद्याला जरी द्रव्यप्राप्ति झाली तरी पुष्कळांना आपलें आयुष्य दारिद्र्यांत व दुःखांत कंठावे लागते. 'वाणीचें कविदुर्दशेमधुनिया ते ओघ यावे जसे' या केशवसुतांच्या उक्तीप्रमाणें कवीची वाग्वल्लरी त्याच्या दुर्दशेतच पुष्पित व पल्लवित झालेली प्रत्ययाला येते. शिवाय डांटेला 'डिव्हाईन' (Divine Comedy) व मिल्टनला 'पॅराडाइज लॉस्ट' (Paradise Lost) हीं महाकाव्यें लिहून कितीसा द्रव्यलाभ झाला? 'नलदमयंती स्वयंवरासारखें' नितांतमनोहर काव्य लिहिणाऱ्या रघुनाथ-पंडिताला म्हातारपणीं दारिद्र्याबद्दल दुःखोद्गार कां काढावें लागले असते? त्याच्या ठिकाणीं कविता, कीर्ति व कमला यांचा त्रिवेणीसंगम झाला आहे

असा भाग्यशाली कवि विरळा! म्हणून ‘ अर्थकृते ’ हे काव्यप्रयोजन मानणें युक्त नाही. याप्रमाणेंच ‘ शिवेतरक्षतये ’ या प्रयोजनासंबंधीही हेंच म्हणतां येईल. काव्यामुळे अशुभनिवारण झाल्याची कांही उदाहरणें उपलब्ध आहेत. काव्यामुळें मयूराचे कुष्ट बरे झालें, जगन्नाथ पावन झाला आणि बिल्हणाचा जीव वाचला हे खरे. तथापि काव्यामुळे क्वचित प्रसंगी अशुभनिवारण होण्याऐवजी अशुभ निर्माण होऊन कारागृहवास भोगावा लागल्याचे व भारी पगाराच्या नोकरीला मुकल्याचीहि उदाहरणे आढळून येतात. सारांश यशप्राप्ति, धनलाभ व अशुभनिवारण यांना काव्यांचे नित्यप्रयोजन मानणे सर्वस्वी समर्पक वाटत नाही.

व्यवहारविज्ञान हे काव्याचे चवथे प्रयोजन आहे. काव्याचा मुख्य विषय ‘मानवी जीवित’ हा होय. मॅथ्यू अर्नोल्डने ‘Poetry is The criticism of life’—काव्य ही जीवनावरील टीका आहे असे म्हटले आहे. महाभारत, रामायण व शेक्सपीअरची नाटके या ग्रंथांत मानवी जीविताचे सर्वांगीण आविष्करण झालें आहे. अशा काव्यांच्या वाचनानें व्यवहार-ज्ञान हा लाभ होऊं शकेल हे निर्विवाद. पण प्रा. जोग यांनीं म्हटल्याप्रमाणे “कवि हा व्यवहाराकडे काव्याचा विषय या दृष्टीने पाहणार व्यवहारज्ञानाचा फायदा कवि हा केव्हांच घेत नाहीं” (अ.का.पृ.२५). पुष्कळ वेळां कवि हा कल्पनासृष्टीत विहार करीत असल्यामुळें तो व्यवहार-विन्मुख असल्याचेहि दिसून येते. म्हणून ‘व्यवहारविज्ञान’ हे काव्याचें प्रयोजन नसून तो त्याचा एक परिणाम आहे. मम्मटाचे पांचवें ‘ **सद्यः परिनिर्वृति** ’ हें प्रयोजन मात्र सर्वमान्य होण्याजोगे आहे. काव्य लिहिणा-ऱ्याला व वाचणाऱ्यालाहि एकप्रकारचा विशुद्ध आनंद होत असतो. हा काव्यानंद स्वार्थनिरपेक्ष असल्यामुळे जगांतील इतर कोणत्याहि आनंदा-पेक्षां अधिक उच्च दर्जाचा आहे. या आनंदाचे पंडित विश्वनाथांनीं ‘**सत्वोद्रेकस्य खण्डस्य प्रकाशानन्दाचिन्मयः**’ असें सुंदर वर्णन केलें आहे

या काव्यानंदाला साहित्यदर्पणकारांनी ‘**ब्रह्मानंदास्वादसहोदर**’ असें म्हटले आहे ते यामुळेंच. अशा या अलौकिक व अनिर्वचनीय काव्यानंदाचे जितकें वर्णन करावें तितकें अपुरेंच ठरेल. अशाप्रकारच्या निर्मल आनंदाची प्राप्ति करून देणें हे काव्याचे कार्य आहे. मधुकराला कमलांतून ज्याप्रमाणे मकरंद सेवन करावयाला मिळतो त्याप्रमाणें रसिकाला काव्यांतून आनंद आस्वादावयाला मिळतो. मम्मटांनी काव्याचे सहावे प्रयोजन ‘**कांतातुल्य उपदेश**’ हे सांगितले आहे. उपदेश तीन प्रकारचा असतो. वेदस्मृतींचा उपदेश हा जबरदस्तीचा असतो. इतिहास पुराणादिकांचा उपदेश हा बंधनकारक नसला तरी प्रत्ययोत्पादक असतोच असें नाहीं. पण काव्यांत केलेला उपदेश अप्रत्यक्ष असून अत्यंत परिणामकारक असतो. नीतितत्त्वांचा उपदेश प्रवचनापेक्षां रसात्मक पद्धतीने केला तर अधिक रुचतो. म्हणून काव्यांतील उपदेशाची कांतेच्या उपदेशाशी तुलना केली आहे. कांता ही अधिकारवाणीनें उपदेश करीत नाही. तर ती आपल्या मधुर भाषणाने, मोहक कटाक्षाने व मनोज्ञ अभिनयाने आपलें म्हणणे पटवून देते. वडील माणसांच्या अधिकारवाणीपेक्षां कांतेच्या मृदुमिष्ट उपदेशाचा मनावर अधिक परिणाम होतो. पुष्कळ काव्ये उपदेश प्रधान असली तरी सर्वच काव्यांतून उपदेश असतोच असे नाही. मेघदूतासारख्या प्रणयरम्य काव्यांतून कोणता उपदेश मिळण्याजोगा आहे? यामुळें कान्तातुल्य उपदेश हे काव्याचे नित्य प्रयोजन मानणें कितपत समुचित ठरेल?

मम्मटांनी सांगितलेल्या षड्विध प्रयोजनांतून ‘**सद्यःपरनिर्वृति**’ म्हणजे आल्हाद हेच प्रयोजन सर्वमान्य होण्याजोगे आहे. या काव्यानंदाला पाश्चात्य लेखकांनी अनेक नांवें दिली आहेत. अरिस्टॉटलने काव्यानंदाला नुसते ‘Pleasure’ —आनंद असे म्हटले आहे. कॉलरिजने या आनंदाला ‘Complancency’ असें म्हटलें आहे. शिलर म्हणतो सर्व कला आनंदाला वाहिलेल्या आहेत. जी उच्चप्रकारच्या आनंदाचा उपभोग

देते तीच कला होय. ("All art is dedicated to joy. The right art is that alone which creates the highest enjoyment.") ड्रायडनच्या-मतें काव्याचा प्रमुख उद्देश संतोष (Delight) हा आहे. लॉंजिनसनें या काव्यानंदाला आत्यंतिक समुल्लास (Ecstasy) असें म्हटले आहे. काव्यानंदाला निरनिराळी कितीहि नांवें दिली तरी निरपेक्ष व निर्मल आल्हाद हेंच काव्याचें नित्य प्रयोजन आहे. आनंदनिर्मितीप्रमाणेच आत्माविष्कृति हाहि काव्याचा उद्देश आहे. कवीच काय पण कोणताहि कलावंत आपल्या कलेच्या द्वारें आत्माविष्कृति करीत असतो. कोलरीजनें म्हटल्याप्रमाणें निर्माणक शक्तीचे समाधान करणें हा काव्याचा हेतु नाही. तो आपल्या काव्यांच्या द्वारे हृदयाचें आविष्करण करीत असतो. ("So art for Coleridge does not exist to satisfy the creative impulse of the artist but to communicate his state of mind to others S. J.") म्हणून कोणताहि कवि आपल्या काव्यांत आपलें व्यक्तिमत्व कमनीयतेनें व्यक्त करण्याचा प्रयत्न करितो. म्हणून **कलात्मक आत्माविष्कृति** हें काव्याचे दुसरें प्रयोजन मानतां येईल. सौंदर्यनिर्मिती हे काव्याचे तिसरें प्रयोजन होय. कवि हा सौंदर्योपासक असतो. या दुःखपूर्ण जगतांतील कुटिलता व कटुता अवलोकन करून त्याचें मन विषण्ण होतें. म्हणून तो कल्पकतेच्या सहाय्याने सौंदर्यपूर्ण व सौख्यप्रद काव्यसृष्टि निर्माण करण्याचा प्रयत्न करितो. कवीची काव्यसृष्टि ही सौंदर्याच्या दृष्टीने नंदनवनालाहि लाजविणारी असते. Bee कवींनीं म्हटलें आहे:

**केवळ सौंदर्याचीं स्फुरणें प्रस्फुरणें दिव्य**
**जिव्हार हेंची आनंदाचें सौंदर्यचि काव्य.**

—फुलांची ओंजळ पृ. ७.

**सौंदर्य हा कलेचा सहचर आहे.** (Beauty is the companion of art) चकोराला चंद्रिकेची, मधुकराला मकरंदाची त्याप्रमाणें सत्कवीला सौंदर्याची

स्पृहा असते. क्रोचे (Croce) म्हणतो : "The whole business of art is to communicate something and that something will be *beautiful*. सत्यसृष्टीतील अपूर्णता भरून काढून सौंदर्यमय कल्पित सृष्टि उत्पन्न करणें हें कवीचें कार्य आहे. सारांश, आनंदप्राप्ति, आत्माविष्कृति व सौंदर्यनिर्मिती असें काव्याचे त्रिविध प्रयोजन मानतां येईल.

काव्याचें सौंदर्यनिर्मिती हे एक प्रयोजन मानल्यास काव्याची वेषभूषा ही सुंदर असली पाहिजे हें ओघानेंच प्राप्त होतें. काव्याचे अंतरंग ज्याप्रमाणें सरस त्याप्रमाणें बहिरंगहि सालंकार असलें पाहिजे. अलंकाराचें कार्य काव्याचें सौंदर्य वृद्धिंगत करणें हें होय. (**काव्यशोभाकरान्धर्मान् अलंकारान् प्रचक्षते** । दण्डि.) श्री. न. चिं. केळकरांनीं म्हटल्याप्रमाणें 'अलंकारांवांचून रसपरिपोष चांगल्याप्रकारें होऊं शकत नाही' तथापि वर्डस्वर्थनें अलंकारिक भाषेविरुद्ध बंड उभारून साध्या भाषेचे व स्वभावोक्तीचें अवडंबर माजविलें. पण तें अयशस्वी ठरलें. आपल्या मनांतील विचार जसेच्या तसे काव्यांत मांडणे अयोग्य होय. स्वभावोक्ति ही विचार एकाच पद्धतीनें मांडू शकते पण वक्रोक्ति ही तोच विचार अनेक प्रकारांनीं मांडूं शकते. भामह म्हणतो:—

**सैषा सर्वैव वक्रोक्तिरनयार्थो विभाव्यते ।**
**यत्नोऽस्यां कविनां कार्यः कोऽलंकारोऽनया विना ॥**

—भा. लं. २–८५

'सर्व अलंकारांत दिसून येणारी ही वक्रोक्तीच होय. हिच्या योगानें अर्थाला शोभा येते. कवीनें हिच्याविषयीं यत्न करावा. हिच्याशिवाय असूं शकेल असा कोणता अलंकार आहे?' म्हणून कवीनें आपली भाषाशैली परिश्रमपूर्वक विविध अलंकारांनीं सजविली पाहिजे. डांटे म्हणतो: 'The poetry and the language Proper for it is an elaborate and painful toil' काव्य व त्याला अनुरूप अशी भाषा योजणें हें परिश्रमाचें काम आहे. ही

भाषाशैली काव्याचें बहिरंगच आहे असें न समजतां 'Style is the man' या तत्त्वाप्रमाणें कवीच्या व्यक्तिमत्वाची निदर्शक असते असें मानलें पाहिजे. स्कॉटजेम्सनें म्हटलें आहे: "Style though always external is not to be thought merely external. It should be as Diquincy said an incarnation of thought as Ben Johnson said 'In all speech word and sense are as the body and the soul.'" कविता ही रमणीयतेची अधिदेवता असल्यामुळें तिची वेषभूषा अलंकारांच्या वैभवानें विनटलेली असल्यास त्यांत काय नवल? आजपर्यंत जे प्रतिभाशाली वागीश्वर होऊन गेले त्यांची भाषाशैली शकुंतलेप्रमाणें प्रियमंडना होती असे प्रत्ययाला येते. तथापि, ही अलंकारांची योजना औचित्यपूर्ण असली पाहिजे. औचित्यतत्त्वाचें परिपालन न करितां योजलेली अलंकारिक भाषा आल्हादकारक होत नाही. क्षेमेंद्र "औचित्यविचारचर्चेत" लिहितो:–

काव्यास्यालं अलंकारैः किं मिथ्या गणितैः गुणैः ।
यस्य जीवितमौचित्यं विचिन्त्यापि न चिंत्यते ॥ ४ ॥

म्हणून प्रा. केळकर यांनीं म्हटल्याप्रमाणें "चातुर्यानें व औचित्य दृष्टीनें योजलेली अलंकारिक भाषा ही रसविघ्नकारिणी नव्हे; तर उलट रसाच्या परिपोषाला उपकारक किंबहुना अवश्य होय (काव्यलोचन पृ. १२०)." काव्याच्या भाषाशैलींत शब्दमाधुर्य व अर्थसौंदर्य यांचा मोहक मिलाफ झाला पाहिजे. प्रा. लागू म्हणतात, "साखर आणि साखरेची गोडी, फूल आणि फुलाचा वास ही जशी एकजीव असतात, तसाच अर्थ आणि भाषा यांचा उत्तम काव्यांत एकजीव झालेला असतो (साहित्य सुवर्ण पृ. ३)." तात्पर्य, काव्याची वेषभूषा ही अंतरंगाप्रमाणेंच हृदयंगम व रमणीय असली पाहिजे.

काव्याच्या वेषभूषेचा विचार केल्यानंतर आतां आपण काव्याचें विषय कोणते असावेत याचा विचार करूं. संस्कृत भाषेंत समुद्र, पर्वत,

चंद्र, सूर्य यांची वर्णनें, उद्यानक्रीडा, जलक्रीडा इत्यादि गोष्टी महाकाव्याचे विषय होतात असें 'काव्यादर्शात' दंडीनें म्हटलें आहे. संस्कृत भाषेंत सामान्य विषयांवर कांहीं स्फुट सुभाषितात्मक रचना असली तरी ललितोदात्त गोष्टीच काव्याचे विषय होत, अशी समजूत आहे. मॅथ्यू अर्नॉल्ड ह्मणतो: What are the eternal objects of poetry among all nations and at all times. They are actions, human actions., possesing an interest in themselves and which are communicated in an interesting manner." [ English Critical Essays Part II Page 359 ] कवीच्या कलेनें मनोरंजक केलेली मानवी कृति हाच सर्व कालांतील व सर्व देशांतील काव्याचा विषय आहे. डेनिसनें म्हटल्याप्रमाणें That passion is the chief thing in Poetry and that all passion is either ordinary passion or enthusiasm (English Critical Essaays I page 38.) मानवी भावना हाच काव्याचा प्रमुख विषय आहे. पाश्चात्य टीकाकारांनी मानवी भावना व कृति यांना काव्याच्या विषयांत प्राधान्य दिलें आहे. प्राचीन मराठी कवि परम भगवद्भक्त असल्यामुळें त्यांनी ईश्वरभक्ति हा काव्याचा प्रमुख विषय मानला आहे. परमेश्वराचें स्तवन व संकीर्तन ज्यांत नाही तें काव्य हीन दर्जाचें होय. एकनाथांच्या **'सगुण चरित्रें परम पवित्रें सादर वर्णावीं । सज्जनवृंदें मनोभावें आधीं वंदावीं ॥'** या पदावरून प्राचीन कवींना कोणते विषय प्रिय असावेत याची कल्पना येते. अखंड नामस्मरण, गोविंदगुणसंकीर्तन, सज्जनसमागम व भक्तिज्ञानविवेचन या विषयांत काव्यदेवतेनें विहार केला पाहिजे अशी त्यांची समजूत होती. आधुनिक मराठी कवींनी पाश्चात्य काव्याच्या परिचयामुळें कोणताहि विषय काव्यानुकूल आहे ही कल्पना दृढमूल केली आहे. चंडोलापासून तो चुलीपर्यंत, तारकेपासून तो तुतारीपर्यंत आणि कमलिनीपासून तो काजव्यापर्यंत सर्व रम्य व क्षुद्र विषयांवर काव्यरचना झालेली आहे. **'साध्याही विषयांत आशय कधीं मोठा किती आढळे'** ही केशव-

सुतांची उक्ति सर्वपरिचित आहे. तथापि श्री. न. चिं. केळकरांनीं म्हटल्या प्रमाणे "कवीचे खरे काम उत्कर्षाला पोचलेल्या त्रिगुणात्मक मनुष्यस्वभावाचे चमत्कृतिजनक व रसपूर्ण वर्णन करणे हेच मुख्यतः असून, त्यांतच त्याचा कलाविलास असतो (काव्यचर्चा पृ. ६६)." म्हणून मानवी भावना हा काव्याचा मुख्य विषय आहे. मानवी भावना वैचित्र्यपूर्ण असल्यामुळे त्या विविध विषयांचा पुरवठा करतात. मानवी भावनेप्रमाणेच निसर्ग हाहि एक काव्याचा नित्य विषय आहे. निसर्गाचे सौंदर्य नितांतमनोहर व नवनवोन्मेषशाली असून तें काव्याला निरंतर प्रेरणा देणारे आहे. मानवी जीवन जितकें चमत्कृतिप्रचुर तितकाच निसर्ग हा चारुतापूर्ण आहे. तसेच काव्याचा विषय अगदीच क्षुद्र असू नये. कारण जगांत आजपर्यंत जी काव्यें रसिकमान्य झालेली आहेत त्यांचे विषय अद्भुत, भव्य, उदात्त किंवा ललित आहेत असे आढळून येते. सारांश, मानवी भावना व निसर्ग हे काव्याचे चिरंतन विषय आहेत हे कुणालाहि कबूल करावें लागेल.

आतां काव्याचे ध्येय कोणते असावे याचा विचार करूं. काव्याचे ध्येय कोणते असावे याबद्दल अनेक मतभेद आहेत. कांहीजणांच्या मतें काव्याचें ध्येय नैतिक आहे. कवीनें आपल्या काव्यांत नीतितत्त्वांचा सदुपदेश करून समाजाला चांगले वळण लावलें पाहिजे. रस्किन कवीविषयी म्हणतो " He is a teacher, a pre-eminently moral man. His function is to make men better " कवि हा शिक्षक आहे. तो मुख्यतः नीतिमान असतो. काव्यच काय पण सर्वच कला उपदेशप्रधान असून त्यांनीं नीतितत्त्वांचे शिक्षण दिलें पाहिजे. परंतु हें मत एकांतिक होय. कवि हा उपदेशक नाहीं व तो उपदेशकाची भूमिका स्वीकारून जर सदा नीतितत्त्वांचा उपदेश करूं लागला तर काव्याचे काव्यत्वच नष्ट होईल. म्हणून सर्व ललितकला उपदेशप्रधान असाव्यात हेंच त्यांचे अंतिम ध्येय आहे हें मत सर्वमान्य होण्याजोगें नाहीं. दुसऱ्या कांहीजणांच्या मतें

समाजसुधारणा हें काव्याचें ध्येय असावें. कवीनें समाजांतील अन्याय व अनाचार यांचें वर्णन करून समाजसुधारणेला हातभार लाविला पाहिजे. कवि हा समाजाचा एक घटक असल्यामुळें त्याची सुधारणा करणें हें त्यानें आपलें ध्येय कां मानूं नये? तथापि हें मतहि अनुचित होय. कारण, कवि हा जसा केवळ उपदेशक नाही तसा सुधारकहि नाहीं; तर तो सौंदर्योपासक आहे. म्हणून त्यानें सुधारणेची कर्णकर्कश तुतारी वाजविली तरच त्याच्या काव्यसौंदर्याची परमावधी झाली असे समजणें सदोष आहे. तसेच ईश्वरभक्ति हे काव्याचे ध्येय असून त्याने समाजांत आस्तिक्यबुद्धि निर्माण केली पाहिजे असेंहि कांहीजणांचे मत आहे. अबुद्धिगम्य परमात्म्याची अद्‌भुतरम्य लीला अवलोकन करून कुणाचे अंतःकरण आश्चर्यमुग्ध होणार नाही? म्हणून त्या परममंगल परमेश्वराच्या ललित लीलांचें वर्णन करणें हें काव्यानें आपलें ध्येय मानले पाहिजे. ईश्वरभक्ति हा कितीहि उदात्त विषय असला तरी तोच एकमेव काव्याचें ध्येय असावें असे मानणें आग्रहमूलक होय. ईश्वरभक्तिप्रमाणेंच देशभक्तीचीहि गोष्ट आहे. देशभक्तीची भावना प्रसृत करण्याला काव्याचा उपयोग होऊं शकेल हें खरें. म्हणून देशभक्ति हेंच काव्य–ध्येय मानणें समुचित नाहीं. श्री. कृ. कोल्हटकर म्हणतात, "या काव्यसृष्टीची सम्राज्ञी जी कवितादेवी ती आनंदाची अधिदेवता व सच्चिदानंद परमात्म्याची अर्धांगी आहे. कवितादेवीचा आश्रय करून तिच्या तंत्रानें आपणांस राजकीय, सामाजिक इत्यादि सर्व बाबतींत आपलें कल्याण करून घेतां येईल. पण तिला एकाच विषयांत दासी म्हणून राबवूं पाहणें म्हणजे परमात्म्याचा अपमान करण्याचे महापातक करण्यासारखें आहे (काव्यचर्चा पृ. ५७).' म्हणून आनंद हें काव्याचें ध्येय मानलें पाहिजे. या आनंदालाच '**सकलप्रयोजनमौलिभूत**' असें विशेषण काव्यप्रकाशकारांनीं जोडलें आहे. —**सकलप्रयोजनमौलिभूतं समनन्तरमेव रसास्वादनसमुद्‌भूतं विगलितवेद्यान्तरमानन्दम्**॥ तात्पर्य,

सौंदर्यनिर्मिति करून रसिकांना सात्विक समुल्लासाची प्राप्ति करून देणें हेंच काव्याचें अंतिम ध्येय असलें पाहिजे.

आनंद हें काव्याचे ध्येय मानल्यानंतर तो काव्यानंद कां होतो याची तात्त्विक मीमांसा करणें क्रमप्राप्त आहे. हा काव्यानंद जगांतील इतर कोणत्याहि आनंदापेक्षां ललितोदात्त व लोकोत्तर आहे यांत शंका नाहीं. जगन्नाथपंडित म्हणतातः **इत्थं नानाजातीयाभिःशे मुषीभिः नानारूपतया वासितोऽपि मनीषीभिः परमाह्लादविनाभावितया प्रतीयमानः प्रपंचेऽस्मिन् रसो रमणीयतामावहतीति निर्विवादम्.** या काव्यनंदाची अभिनव उपपत्ति श्री. न. चिं. केळकरांनी बडोदे येथील साहित्यसंमेलनाच्या आपल्या अध्यक्षीय भाषणांत सुचविली आहे. काव्यानंदाची ही अभिनव उपपत्ति त्यांच्या उज्ज्वल प्रतिभेची निदर्शक आहे. त्यांच्या मते काव्यानंदाचे कारण 'एका जीवाचें अनेक जीवाशीं एकसमयावच्छेदेकरून होणारें तादात्म्य' हें होय. आपली भूमिका न सोडतां वाङ्मयांतील कल्पित पात्रांशी आपण समरस होऊं शकतो व अशारीतीने एकाच वेळी व एकाच स्थळीं आपण अनेक व्यक्तींचें व अनेक स्थळांचें अनुभव घेऊं शकतो आणि म्हणून आपणांस काव्यानंद होतो" असे केळकरांचे मत आहे. या तादात्म्याला त्यांनी 'सविकल्प समाधि' असें नांव दिलें आहे. जीवाला स्वतःच्या व बुद्धीच्या समर्यादपणाची जाणीव असूनहि बुद्धीच्या व कल्पनाशक्तीच्या जोरावर बाह्यसृष्टि किंवा अंतःसृष्टींतील मनोभावना यांच्यांत अधिकाधिक सूक्ष्म रीतीने संक्रमण–संचार करणें व तद्द्वारां त्यांचे शक्य तितक्या रीतीनें एकसमयावच्छेदेंकरून आकलन किंवा आक्रमण करण्याचा आनंद उपभोगणें हेच काव्यानंदाचें बीज होय व ह्याच व्यापक अर्थ तादात्म्य दर्शवितो (काव्यचर्चा पृ. १४)." श्री. कृ. कोल्हटकरांनीं या उपपत्तीला आपली मान्यता दर्शविली आहे. परंतु प्रा. वा. म. जोशी म्हणतातः "काव्यानंद होण्याला एकप्रकारचें अंशात्मक समरसत्व अवश्यक

असेल पण श्री. केळकरांना वाटतें त्याप्रमाणें आनंदाचें हेंच कारण नव्हे किंवा हे प्रधान कारणहि नव्हे. एकंदर देखावा पाहून त्यांत जो आपणांला चमत्कार दिसतो व तो पाहतांना आपली जी मनाची एक वृत्ति (attitude) बनते त्यांत आनंददायित्व आहे. सारांश, केळकर म्हणतात त्याप्रमाणे तादात्म्य हेंच एकटे काव्यानदाचे कारण नसून, आत्मसमाधान, अपेक्षापूर्ति कवीचे शक्तिमत्व इत्यादि काव्यानंदाची दुसरी कारणे आहेत (का. च. पृ. १३)". प्रा. द. के. केळकरांनी म्हटल्याप्रमाणे, "रसास्वादांतील या अलौकिकत्वाचें खरें उत्तर म्हणजे [illegible] तादात्म्य हे स्वायत्त म्हणजे हुकमी असते हें होय.' म्हणून त्यांच्या मते 'स्वायत्त तादात्म्य' हे काव्यानंदाचें कारण आहे. परंतु श्री. न. चि. केळकरांनी 'काव्यलोचन' या ग्रंथाचे परीक्षण करतांना 'सविकल्प समाधि व स्वायत्त तादात्म्य हे काव्यानंदाचे कारण आहे' असा समन्वय केला आहे. याबरोबरच सौंदर्यानुभूति हेंहि काव्यानंदाचें एक कारण आहे. रम्य वस्तु किंवा दृश्य पाहून आनंद कां होतो याची उपपत्ति लावतांना कँट हा आत्मा व परमात्मा किंवा जीव व शिव यांचें समरसत्व होणे शक्य आहे अशी जाणीव रम्य वस्तु पाहतांना होतो म्हणून आपणांस आनंद होतो असें म्हणतो. या वादांत न शिरतां असे म्हणतां येईल की सौंदर्यांत इतकी विलक्षण मोहिनी आहे कीं त्याच्या दर्शनानें आपणांला अनिर्वचनीय आनंद होतो व सौंदर्य हें काव्याचें मूलतत्त्व असल्यानें सौंदर्यानुभूति होहि काव्यानंदाचें एक कारण मानतां येईल. एकंदरीत, सविकल्पसमाधि, स्वायत्ततादात्म्य आणि सौंदर्यानुभूति ही तिन्हींहि काव्यानंदाचीं कारणें आहेत असे म्हटल्यास तें चुकीचें ठरणार नाहीं.

आतां आपण काव्य व तत्त्वज्ञान यांचा तुलनात्मक विचार करूं. काव्य व तत्त्वज्ञान ही परस्परविरोधी असावींत अशी आपली समजूत होते. परंतु सूक्ष्मदृष्टीने विचार केला असतां काव्य व तत्त्वज्ञान ही परस्परविरोधी नसून त्यांचा एकमेकांशीं संबंध आहे असें दिसून येईल. काव्य व

तत्त्वज्ञान हें जीव, जगत् व जगदीश्वर यांचा विचार करण्याचा प्रयत्न करतें. तत्त्वज्ञान हें तार्किक पद्धतीनें यांचा विचार करतें व काव्य हें रसात्मक पद्धतीनें विचार करतें. म्हणून पुष्कळवेळां कवि हा तत्त्वज्ञानी असतो व तत्त्वज्ञानी हा कवि असतो असे दिसून येते. हेगेलने म्हटलें आहे:– " Poetry aims to present in forms for the imagination features of the ultimate ideal of the harmonized universe " ॲरिस्टॉटलने म्हटल्याप्रमाणें काव्य हे सर्व लेखनापेक्षां अधिक तत्त्वज्ञानात्मक असून सत्य हा त्याचा हेतु आहे. ( Poetry is the most philosophic of all writing and its object is truth ) तत्वज्ञ हा हें सत्यसंशोधन चिकित्सक दृष्टीने करतो व कवि भावनारम्य पद्धतीनें करतो. म्हणून कॉलरिजने म्हटल्यामाणें अजूनपर्यंत कोणताहि मोठा कवि तत्त्वज्ञानी झाल्याशिवाय राहिलेला नाहीं. —No man was ever yet a great poet without being at the same time a great philosopher. उच्च प्रकारच्या काव्यांत तत्त्वज्ञानान्चें हास्य दृग्गोचर होतें तर उदात्त तत्त्वज्ञामांत कवितेन्चें लास्य आढळून येतें. रवींद्रनाथांच्या 'गीतांजलि' या विश्वमोहक काव्यकलापांत काव्य व तत्त्वज्ञान यांचें मधुर मीलन झाले आहे. काव्याच्या कल्पवनांत तत्त्वज्ञानाचें ताटवे पाहून आपले हृदय जितके प्रमुदित होतें तितकेंच तत्त्वज्ञानाच्या तपोवनांत काव्याचे कुंज पाहून आपलें अन्तःकरण प्रफुल्लित होतें. म्हणून डॉ. राधाकृष्णन् म्हणतात: " Our conclusion is that a poet is nothing if he is not a philosopher. A true poet will be a philosopher and true philosopher a poet " ( Philosophy of Rabindranath Tagore Page 165.) सारांश, सत्यसंशोधन हें तत्त्वज्ञानाचें ध्येय असून सौंदर्याविष्करण हे काव्याचें ध्येय आहे. कीट्सनें म्हटलें आहे: Beauty is truth, truth beauty सौंदर्य हेंच सत्य आहे व सत्य हेच सौंदर्य आहे. म्हणून तत्त्वज्ञान व काव्य ही परस्परांना प्रतिकूल नसून परस्परांना पोषक आहेत. सारांश, तत्त्वज्ञान हें सत्याचें निकेतन असून

काव्य हें सौंदर्याचें नंदनवन आहे असें म्हटल्यास तें चुकीचें ठरणार नाहीं.

येथपर्यंत आपण काव्याची जी तात्त्विक मीमांसा केली तीवरून त्याच्या सौंदर्याची कल्पना वाचकांना झाल्यावांचून राहणार नाही. मानव-जातीला उपलब्ध झालेली काव्य ही सर्वांत ज्येष्ठ व श्रेष्ठ कला आहे. कोण-त्याहि राष्ट्राचें सांस्कृतिक वैभव त्याच्या काव्यांत प्रतिबिंबित झालेलें असतें. इतकेंच नव्हे तर, काव्यांत '**सत्यं शिवं सुंदरं**' यांचा हृदयंगम त्रिवेणी संगम झालेला असतो. मेघमंडलांत सौदामिनी, सुमनसृष्टींत कमलिनी त्याप्रमाणें वाङ्मयांत कविताकामिनी होय. म्हणून भावनांच्या मौक्तिकमुकु-लांनीं व कल्पनांच्या कमलकुलांनी प्रफुल्लित झालेल्या या काव्य-पुष्करिणीत विहार करण्यांत कुणाला आनंद वाटणार नाही ? इतकेंच नव्हे तर बर्क, फॉक्स व ग्लॅडस्टन यांच्यासारखे राजकारणविशारद मुत्सद्दीहि काव्यानंदांत सदैव रममाण झालेले आढळून येतात. काव्य हें मंदाकिनीप्रमाणे मनोहर अमृताप्रमाणे मधुर व चंद्रिकेप्रमाणे मोहक आहे. या जगांतील क्षणभंगुर सौंदर्याला शाश्वत स्वरूप देऊन संतप्त हृदयाला संतुष्ट करण्याचें स्पृहणीय कार्य जर कोण करीत असेल तर ते काव्यच होय. श्री. कृ. कोल्हटकरांनीं म्हटल्याप्रमाणे "वाङ्मयांत कार्य करणाऱ्यांमध्ये कवीची गणना अत्यंत समर्थांपैकी असून त्याची निर्मिति इतरांच्या निर्मितीच्या मानानें अत्यंत श्रेष्ठ असते. कवि हा जसा सर्व बुद्धिमानांत मान्य तशी कविता ही सर्व रचनांत मान्य असते (काव्यचर्चा पृ. ६१)". काव्याच्या कमनीय विलासामुळेच या मानवीसंसाराला '**पंडितः संसारः**' अशी अभिनंदनीय स्थिति प्राप्त झालेली आहे. मुक्तेश्वरांनी—

**कनकलतिका सौदामिनी । कीं चंद्रकला तनुधारिणी ।।**
**सुवर्णकेतकी पत्रवर्णी । सुवर्णखाणी हरिणाक्षी ।।** आदिपर्व १५-९८

हें जें शकुंतलेचें बहारदार वर्णन केलें आहे तेंच कवितारतीलाहि पूर्णपणें

लागूं पडेल. शेवटीं, काव्याची अधिष्ठात्री देवता जी सरस्वती तिचें भक्तिपुरस्सर स्तवन करून हें पहिलें प्रकरण पुरें करितो.

या कुन्देंदुतुषारहारधवला या शुभ्रवस्त्रावृता ।
या वीणावरदन्डमण्डितकरा या श्वेतपद्मासना ।
या ब्रह्माच्युतशंकरप्रभृतिभिर्देवैः सदा वन्दिता ।
सा मां पातु सरस्वती भगवती निःशेषजाड्यापहा ॥



# परिशिष्ट

## प्रकरण पहिलें

## काव्यमीमांसकांच्या काव्यविषयक कल्पना

### संस्कृत

(१) 'इष्टार्थव्यवच्छिन्ना पदावली ॥ ६ काव्यं स्फुरदलंकारं गुणवद् दोषवर्जितम् ।...७...वाग्वैदग्ध्यप्रधानेऽपि रस एवात्र जीवितम् । ...३३'

—**अग्निपुराण** ३३७;

(२) "शब्दार्थौ सहितौ काव्यं गद्यं पद्यं च तद् द्विधा ।"

—**भामह** १–१६;

(३) "तैः शरीरंच काव्यानामलंकाराश्च दर्शिताः ।
शरीरं तावदिष्टार्थव्यवच्छिन्ना पदावली ॥
गद्यं पद्यं च मिश्रं च तत् त्रिधैव व्यवस्थितम्"

—**दण्डिन** १–१०, ११;

(४) 'काव्यशब्दोऽयं गुणालंकारसंस्कृतयोः शब्दार्थयोर्वर्तते । भक्त्या तु शब्दार्थमात्रवचनोऽत्र गृह्यते' —**वामनाची वृत्ति** का. सू. १-१-१;

'रीतिरात्मा काव्यस्य । विशिष्टापदरचना रीतिः ।
विशेषो गुणात्मा ।' —**वामन** –का. सू. १-२-६-८;

(५) ‘ननु शब्दार्थौ काव्यं शब्दस्तत्रार्थवाननेकविधः। –रुद्रट २-१;

(६) ‘काव्यस्यात्मा ध्वनिरिति बुधैर्यः समाम्नातपूर्वः’।

“अर्थ सहृदयश्लाघ्यः काव्यात्मा यो व्यवस्थितः।

वाच्यप्रतीयमानाख्यौ तस्य भेदावुभौ स्मृतौ ॥”

—आनन्दवर्धन १-१ व २;

(७) ‘शब्दार्थौ ते शरीरम्। ... रस आत्मा। ... अनुप्रासोपमादयश्च त्वामलंकुर्वन्ति।’ —राजशेखर, काव्यमीमांसा पृ. ६.

(८) ‘शब्दार्थौ सहितौ वक्रकविव्यापारशालिनि।

बन्धे व्यवस्थितौ काव्यं तद्विदाल्हादकारिणि ॥’

—कुन्तक, वक्रोक्तिजीवित;

(९) ‘काव्यस्यात्मनि संगिनि (...संज्ञिनि) रसादिरूपे न कस्यचिद् विमतिः ॥’ —राजानकमहिमभट्ट, व्यक्तिविवेक पृ. २२;

(१०) ‘निर्दोषं गुणवत्काव्यमलंकारैरलंकृतम्।

रसान्वितं कविः कुर्वन् ...... ॥’ —भोज १-२;

(११) ’साधुशब्दार्थसंदर्भं गुणालंकारभूषितम्।

स्फुटरीतिरसोपेतं काव्यं कुर्वीत कीर्तये ॥’

—वाग्भटालंकार १-२;

(१२) ‘अदोषौ सगुणौ सालंकारौ च शब्दार्थौ काव्यम्।’

—हेमचन्द्र, पृ. १६;

(१३) निर्दोषा लक्षणवती सरीतिर्गुणभूषिता।

सालंकाररसानेक–वृत्तिर्वाक् काव्यनामभाक् ॥

अंगीकरोति यः काव्यं शब्दार्थावनलंकृती।

असौ न मन्यते कस्मादनुष्णमनलं कृती ॥’

—जयदेव, चंद्रालोक १–७–८;

(१४) 'शब्दार्थौ वपुरस्य तस्य विबुधैरात्माभ्यधायि ध्वनि–
श्चार्वाकैरिव कैश्चिदस्य न पुनः सत्तापि संभाव्यते ।
कर्तुं लक्षणमक्षमैरयमनिर्वाच्यः परैरुच्यते
भाक्तोन्यैः समुदीर्यतेऽस्य हि ततो ब्रूमः स्वरूपं वयम् ॥'

—**विद्याधर**, एकावली १–१३;

(१५) 'गुणालंकारसहितौ शब्दार्थौ दोषवर्जितौ ।
गद्यपद्योभयमयं काव्यं काव्यविदो विदुः ॥

—**विद्यानाथ**, प्रतापरुद्रयशोभूषण पृ. ४२;

(१६) 'शब्दार्थौ निर्दोषौ सगुणौ प्रायःसालंकारौ काव्यम् ।'

—**वाग्भट**, काव्यानुशासन पृ. १४;

(१७) 'वाक्यं रसात्मकं काव्यं दोषास्तस्यापकर्षकाः ।
उत्कर्षहेतवः प्रोक्तागुणालंकाररीतयः ॥' —**विश्वनाथ**, १–३;

(१८) 'काव्यं रसादिमद् वाक्यं श्रुतं सुखविशेषकृत् ।
हिताय सुकविः कुर्यात् तद्धेतुः प्रतिभादिकम् ॥'

—**केशवमिश्र**, अलंकारशेखर १–१;

'अलंकारस्तु शोभायै रस आत्मा परे मनः ।'

अलंकारशेखर २–२;

(१९) 'रमणीयार्थप्रतिपादकः शब्दः काव्यम् । रमणीयता च लोकोत्तराह्लादजनकज्ञानगोचरता । लोकोत्तरत्वं च आह्लादगतः चमत्कारत्वापरपर्यायोऽनुभवसाक्षिको जातिविशेषः ।'

—**जगन्नाथ**, पृ. ४;

(२०) 'तददोषौ शब्दार्थौ सगुणावनलंकृती पुनः क्वापि ।'

—**मम्मट**, काव्यप्रकाश १–४.

या व्याख्या प्रो. गजेंद्रगडकर यांनीं सटीप प्रकाशित केलेल्या 'काव्यप्रकाश' या ग्रंथांतून घेतल्या आहेत.

———o———

## इंग्रजी

(1) Poetry is a creative art imitating nature.
—**Aristotle**

(2) Absolute poetry is the concrete and artistic expression of the human mind in emotional and rhythmical language
—**Theodore Watts**

(3) Poetry is the attempt which man makes to render his existence harmonious. —**Carlyle**

(4) Poetry is, the record of the best and the happiest moments of the happiest and best minds.
—**Shelley** ( Defence of Poetry )

(5) Poetry is the breath and finer sprit of all knowledge- it is the impassioned expression which is the contenance of all science.
—**Wordsworth** (Preface to the Lyrical Ballads )

(6) Poetry uses the rainbow tints for special effects, but always keeps its essential objects in the purest white light of truth. —**O. W. Holms.**

(7) Poetry is the word-painting. —**J. R. Turnbull**

(8) Poetry is the eloquence of truth.
—**T. Campbell**

(9 Poetry is a lie to realise reality —**Van Nophen**

(10) Poetry is the art of lying beautifully-
—**Hammerton**

(11) Poetry is the mixture of a lie that does ever add pleasure. —**Sir Francis Bacon**

(12) Poetry is the morning dream of great minds.
—**Lamartine**

(13) Poetry is the expression of the beautiful by words.
—**J. Brown**

(14) Poetry is the frolic of invention, the dance of words and the harmony of sounds —**F. Reynolds**

(15) The essence of poetry is invention such invention as by producing, something unexpected surprises and delights.

—**Samuel Johnson** ( lives of the Poets )

(16) Poetry is the rhythmical creation of beauty to elevate the soul. —**E. A. Poe**

(17) The true poem is the poet's mind. The finest poetry was first experience - it does not need that a poem should be long, every word was once a poem. For it is not metres but a metre-making arguments that makes a poem.

—**Emerson**

(18) The best words in the best order —**Coleridge**

(19) Poetry is the expression of imagination

—**Shelley**

(20) Poetry is the critism of life. —**Matthew Arnold**

(21) Poetry is life purified. Not purified indeed of sorrow or even of shame, but purified of insignificance.

—**John Drink-water** ( English Poetry )

(22) Poetry is primarily an immutably concerned with the emotions that do not change in changing world.

—**John Drinkwater** ( English poetry )

(23) Poetry is something profoundly and emotionally humanised. —**J. C. Powys** ( Meaning of Culture )

(24) Poetry is the supreme form of emotive language.

—**I. A. Richards** ( Principles of Literary Critism. p 273 )

(25) Poetry comes into being at the direct call of three powers-inspiration, beauty and delight and brings them to us and us to them by the magic charm of the inspired rhythmic word. —**Arbindo Ghosh**

( The Future Poetry)

---

## मराठी

[१] जे वाचल्यानें किंवा ऐकल्यानें मनाच्या वृत्ति प्रसन्न होऊन तो रस अंतःकरणांत सहज बिंबून जातो त्यास काव्य म्हणावें.

—वि. कृ. चिपळुणकर. (निबंधमाला पृ. २८)

[२] काव्य म्हणजे कल्पनानिर्मित रसोत्पादी व रमणीय अशा अर्थाचा प्रतिपादक वाक्यसमुच्चय. —ह. ना. आपटे. (विदग्ध-वाङ्मय. पृ. २७)

[३] हृदयसंवेद्य अर्थ पाहिजे आणि रसाळ तालबद्ध व समर्पक शब्द-योजना पाहिजे. ही दोन्ही जेथें आहेत तें काव्य.

—प्रा. वा. ब. पटवर्धन. (निबंधरत्नमाला पृ. २८१)

[४] उत्तम प्रकारचें काव्य म्हणजे निरंतर वाहणारा आनंदाचा झराच होय, आणि अशाप्रकारचें काव्य वाचून होणारा आनंद सर्वांना सारखाच अनुभवितां येतो. —प्रा. रा. कृ. लागू. (साहित्यसुवर्ण पृ. १)

[५] रस हा काव्याचा आत्मा असेल पण अलंकृत भाषा हा त्या रसरूपी आत्म्याचा निदान देह होय. आणि देहाव्यतिरिक्त आत्मा जसा सहसा पहावयास मिळत नाही तसा अलंकृत भाषेव्यतिरिक्त रसहि फारसा पहा-वयास मिळत नाही. —न. चिं. केळकर. (स. के. साहित्यखंड पृ. ६५)

[६] काव्य हे वृत्तबद्धरचनेत नाही, ते प्रासांत किंवा पदलालित्यांत नाही; किंवा ते यमकांतहि पण नाही. ते सृष्टीच्या जीवनांत अंतर्भूत झालेले आहे. तेव्हां काव्य म्हणजे केवळ करमणुकीचा खेळ नसून त्यावर मानवी जीवनाची सुस्थिति अवलंबून असते.

—रा. ना. ब्रह्मनाळकर. (विविधज्ञानविस्तार)

[७] ईश्वरी प्रसाद व स्फूर्ति हे काव्याचें पहिलें अधिष्ठान आहे.

—प्रा. शि. म. परांजपे.

[८] उज्ज्वल काव्य हे प्रतिभा आणि तपस्या यांच्या अखंड प्रेमपूर्ण साहचर्याचे अपत्य होय. —**प्रा. द. के. केळकर.** (काव्यालोचन पृ. ५०)

[९] काव्य ही एक कला आहे व तिचे शिल्प, चित्रलेखन, नर्तन इत्यादि कलांबरोबर साधर्म्य आहे. या साऱ्या कलांचे अस्तित्व त्यांतलि सौंदर्यदर्शनावर अवलंबून आहे.

—**प्रा. रा. श्री. जोग.** (अभिनव काव्यप्रकाश पृ. ६)

[१०] कवितेंत कानाला तोषविण्यासाठी, मनाला प्रसन्न ठेवण्यासाठीं कल्पनेला चकित करण्यासाठी व विचारशक्तीला संतुष्ट करण्यासाठी योग्य शद्बालंकार उपमादि अर्थालंकार, उज्ज्वल कल्पना व अर्थपूर्णत्व ही अवश्य असावीत. —**बा. अ. भिडे** (सरस्वती-मंदिर)

[११] काव्य हें प्रतिभेचें नर्तन आहे.

—**ग. त्र्यं. माडखोलकर** ( वाङ्मयविलास )

[१२] काव्याचा आत्मा वैचित्र्य, चमत्कृति अथवा अपूर्वता आहे.

—**श्री. कृ. कोल्हटकर** ( कोल्हटकर लेखसंग्रह पृ. ७६६)

[१३] व्यापकरीतीने विचार केला तर काव्याचें अथवा कोणत्याहि काव्यप्रकाराचें तत्त्वतः लक्षण असें एकच असते. तें म्हटलें म्हणजे रम्यता हें होय. —**प्रा. श्री. नी. चाफेकर** ( काव्यचर्चा पृ. १३६ )

[१४] मनुष्याच्या मनोवृत्ति उद्दीपित करणें व आनंद देणें हें काव्याचें मुख्य कार्य असून बुद्धीला प्रेरणा देण्याचें नाहीं हें प्रथम लक्षांत ठेविलें पाहिजे. —**प्रा. पां. वा. काणे.** (सं. सा. इ. पृ. २८३ )

[१५] प्रचीति, प्रक्षोभ, प्रसाद, प्रतिभा व प्रयत्न हे काव्याचें विशेषें-करून भावकाव्याचें पंचप्राण होत. —**पु. मं. लाड** ( मधुपर्क पृ. ७९ )

———o———

# प्रकरण दुसरें



## मराठी काव्यांतील आध्यात्मिक युग

सरस्वतीविभ्रमदर्पणानां सूक्तामृतक्षीरमहोदधीनाम् ।
सन्मानसोल्लाससुधाकराणां कवीश्वराणां जयति प्रकर्षः ॥
—क्षेमेंद्रकृत बृहत्कथामंजरी प्रथम तरंग श्लोक २.

पहिल्या प्रकरणांत काव्याची तात्त्विक मीमांसा करून त्याच्या सौंदर्याचें सविस्तर विवेचन केलें. प्रस्तुत प्रकरणांत महाराष्ट्र–काव्यतरंगिणीचा प्रवाह कसकसा वाहत चालला याचें विहंगमावलोकन करावयाचें आहे. तत्पूर्वी महाराष्ट्र–देशाची व्याप्ति किती आहे याचा आपण प्रारंभीं विचार करूं. ज्याला आपण महाराष्ट्रदेश म्हणतों त्याचा आकार कांहींसा त्रिकोणासारखा आहे. नैसर्गिक दृष्ट्या महाराष्ट्राचें कोकण, मावळ व देश असे तीन विभाग पडतात. त्याप्रमाणें ब्रिटिश अमदानींत महाराष्ट्राचें तीन भाग आहेत. मुंबई इलाख्यांतील महाराष्ट्र, वऱ्हाड व मध्यप्रांत यांतील महाराष्ट्र, निजामाच्या राज्यांत असणारा महाराष्ट्र असे महाराष्ट्राचें तीन खंड पाडलेले आहेत. महाराष्ट्राचें पौराणिककालीन दंडकारण्य अथवा दक्षिणापथ असें नांव होतें. महाभारत–रामायण या महाकाव्यांतील ज्या भागांत महाराष्ट्रासंबंधीं उल्लेख येतात त्यांचा काळ ठरविण्यास साधन नाहीं; म्हणून आर्यांचा दक्षिणेकडे केव्हां प्रवेश झाला हें सांगतां येत नाहीं. डॉ. भांडारकर यांच्या मतें पाणिनीय कालीं नर्मदेच्या दक्षिणेस आर्यांची वसति नव्हती. परंतु कात्यायनीच्या पूर्वी ती झाली. म्हणजे ख्रिस्तपूर्व ८०० ते ख्रिस्तपूर्व ५०० च्या दरम्यान केव्हांतरी आर्य दंडकारण्यांत वसाहत करूं लागले असें दिसतें. देशवाचक महाराष्ट्र शब्द वराहमिहिराच्या (इ. स. ५०५) ग्रंथांत प्रथम येतो असें डॉ. ग्रियर्सन

यांनीं लिहिलें आहे. त्यानंतर इ. स. ६११ सालांतील सत्याश्रय पुलकेशी याच्या बदामीच्या शिलालेखांत महाराष्ट्राचा उल्लेख आढळून येतो. महाराष्ट्र या शब्दाची उत्पत्ति निरनिराळ्या प्रकारें सांगण्यांत येते. या प्रदेशांत पूर्वी 'रट्ट' नांवाचे राजे राज्य करीत होते. या 'रट्ट' शब्दाचें संस्कृत रूपांतर राष्ट्र असे झालें. आणि त्यांच्या प्रांताला 'महारट्ट' ऊर्फ महाराष्ट्र हें नांव प्राप्त झालें. 'महाराष्ट्र हें सर्व राष्ट्रांस साजे' या मुक्तेश्वरांच्या उक्तीप्रमाणें महा म्हणजे मोठें राष्ट्र ज्याठिकाणीं नांदत होतें, त्यावरून महाराष्ट्र हा शब्द प्रचारांत आला असे कांहीं समजतात; व हीच महाराष्ट्र शब्दाची उत्पत्ति समंजस व समर्पक वाटतें.

मराठी भाषेच्या उत्पत्ति कालासंबंधी विविध मतें प्रचलित आहेत. आर्यलोक ज्यावेळी महाराष्ट्रांत येऊन स्थायिक झाले त्यावेळीं त्यांची भाषा मराठी नव्हती. ते कोणतीतरी प्राकृत भाषा बोलत असतील. प्रामुख्यानें ते महाराष्ट्र भाषा बोलत असावेत. प्राचीन महाराष्ट्रांतील वाङ्मयाचे फार थोडे अवशेष शिल्लक आहेत. हालाची 'सप्तशती' प्रवरसेन कृत 'सेतुबंध' हीं काव्यें महाराष्ट्रींत लिहिलीं आहेत. महाराष्ट्रांतील लोकांनी या कालांत प्राकृत व संस्कृत भाषेतील वाङ्मयांत स्पृहणीय भर घातली. इतिहासाचार्य राजवाडे यांच्या मताप्रमाणे मराठी भाषा शके ४०० च्या सुमारास सुरू झाली. तथापि प्रा. कृ. पां कुलकर्णी यांनी मराठी भाषेच्या उत्पत्तीकाला संबंधीं पुढील निष्कर्ष काढला आहे:—(१) मराठी भाषा कोणत्याहि एका प्राकृतापासून निघालेली नसून सर्व प्राकृत भाषांच्या मिश्रणापासून निघाली आहे. त्यांतल्या त्यांत महाराष्ट्री व अपभ्रंश या दोन भाषांचे अवशेष मराठींत पुष्कळ सांपडतात. (२) नारदस्मृतींत उल्लेखिलेल्या देशभाषेपैकीं एक भाषा जर मराठी धरली तर तिची उत्पत्ति इ. सनाच्या पांचव्या शतकांत होऊन सातव्या शतकापर्यंत ती हळूहळू उत्क्रांत होत गेली. (३) मराठी वळणाचे शब्दविशेष शके ६०५ (इ. ६८३) पासूनच्या

शिलालेखांत व ताम्रपटांत सांपडण्यास सुरवात होते. (४) मराठी शिक्क्याचें पहिलें वाक्य श्रवणबेळगोळच्या शके ९०५ मधील शिलालेखांत सांपडतें. (५) उत्तम दर्जाचें मराठी वाङ्मय बाराव्या शतकांत सुरू झालें. (६) मराठी भाषेस इ. स. ७०० च्या सुमारास बोलभाषा म्हणून पूर्णत्व आलें असलं पाहिजे. ( म. उ. वि. १५१ )

येथपर्यंत आपण मराठी भाषेच्या उत्पत्तीसंबंधी उहापोह केला. आतां आपण महाराष्ट्राच्या राजकीय इतिहासासंबंधी विचार करूं. इसवी-सनाच्या पूर्वी महाराष्ट्रांत कुणाची सत्ता होती हे नक्की सांगतां येत नाहीं. महाराष्ट्रावर पहिली सत्ता मौर्यांची होती असा शिलालेखाचा पुरावा मिळतो. सम्राट अशोकाने हिंसेपासून प्रजेचें मन वळविण्यासाठीं त्या त्या भाषेत शिलालेख खोदविले. अशोकानंतर बिदुसार राजाने जरी कांहीं आक्रमण केलें नाही तरी त्यानंतर पुढच्या काळांत चंद्रगुप्त मौर्याची सत्ता महाराष्ट्रावर होती. मौर्यसत्ता खिस्तपूर्व ३२१ पासून ३८४ पर्यंत होती. मौर्यांच्या नंतर खिस्तपूर्व पहिल्या किंवा दुसऱ्या शतकापासून खिस्तोत्तर दुसऱ्या शतकापर्यंत शातवाहन अथवा आंध्रभृत्य या राजांचा अंमल महाराष्ट्रावर होता. कै. राजवाडे यांना हिंदुधर्माचे कट्टे अभिमानी समजतात. कांहीं काळानें शातवाहनाचा पराभव माळव्याच्या रुद्रदामन या क्षत्रप राजानें केला. महाराष्ट्रावर राज्य करणारे महाराष्ट्रीय घराणें हे पहिलेंच होय. शातवाहना-नंतर महाराष्ट्राच्या पश्चिम भागावर त्रैकूटक नांवाचे राजे खिस्तोत्तर तिसऱ्या शतकाच्या मध्यापासूनच राज्य करीत असल्याचा दाखला कान्हेरी येथील शिलालेखावरून मिळतो. त्रैकूटकांचा शक इ. स. २४९ पासून सुरू होतो. त्रैकूटकानंतर महाराष्ट्रावर वैरवाटक राजांनी सार्वभौमत्व गाजविलें त्यांच्याच अमलांत उत्तरेकडील सम्राट समुद्रगुप्त यानें दाक्षिणेंत स्वारी केली. समुद्रगुप्ताच्या स्वारीच्या शिलालेखांत एरंडपल्लीचा दमन आणि देवराष्ट्राचा कुबेर या दोन राजांचा पराभव केल्याचा उल्लेख

आहे. पण महाराष्ट्रांतील वाखाटकांना समुद्रगुप्ताने त्रास दिला नाहीं. वाखाटकानंतर कलचूरी घराणे महाराष्ट्रावर राज्य करूं लागले. मंगलीश नांवाच्या चालुक्यानें कलचूरींचा पराभव करून चालुक्याची सत्ता महाराष्ट्रांत प्रस्थापित केली. चालुक्याची भरभराट खिस्तोत्तर ७५३ पर्यंत चालली होती. मध्यंतरी कांहीं काळ चालुक्यावर संकट येऊन त्याचा राष्ट्रकूटाकडून पराभव झाला. शेवटी सेउणचंद्रानें चालुक्यसत्ता कायम केली. पुढें सोमेश्वर मरण पावल्यानंतर त्याचे मांडलिक आपआपसांतील कलहामुळें प्रबल होऊन मध्यवर्ती चालुक्यसत्तेचा विनाश झाला. चालुक्यानंतर यादवांची कारकीर्द सुरूं झाली. यादवांच्या राजवटीचा मुख्य संस्थापक भिल्लम नांवाचा राजा होता. यादवांची ही कारकीर्द मराठी भाषेच्या दृष्टीने अत्यंत वैभवशाली झाली. यादवांच्या या स्वातंत्र्य–संपन्नतेच्या भाग्यशाली कारकीर्दींत श्रीज्ञानेश्वरीसारखा चिरंतनमनोहर ग्रंथ निर्माण झाला.

महाराष्ट्राच्या राजकीय इतिहासानंतर आतां धार्मिक इतिहासाचा विचार करणे क्रमप्राप्त आहे. प्राचीन आर्य आपला वैदिकधर्म घेऊन दक्षिणेत उतरले. आर्यांच्या प्रसाराबरोबर वैदिक धर्माचाहि प्रसार होऊं लागला. यामुळेंच महाराष्ट्राच्या दक्षिणेस असलेल्या द्राविड लोकांना वैदिकधर्माची दीक्षा मिळाली. वैदिकधर्माप्रमाणेच बौद्ध व जैन या धर्मांचे अनुयायी दक्षिणेत उतरले. परंतु हिंदुस्थानांतून बौद्धधर्माचे उच्चाटन झाल्यामुळें तो महाराष्ट्रांत दृढमूल झाला नाही. शंकराचार्यांच्या कालानंतर बौद्ध धर्माचे अनुयायी महाराष्ट्रांत आले असावे. बौद्धधर्माप्रमाणेच जैनधर्महि जुना आहे. वैदिक धर्माविरुद्ध प्रारंभी बंड करणारे हे दोन धर्म होत असे म्हणण्यास हरकत नाहीं. हे दोन्ही धर्म अहिंसाप्रधान व वेदविरोधी आहेत. जैनपंडितांना राजसत्तेला खूष ठेवण्याची कला साधली होती. म्हणून त्यांना हिंदुराजांनी इनामे करून दिल्याचे ताम्रपट पुष्कळ सांपडतात. चालुक्य व राष्ट्रकूट यांच्या कारकीर्दींत जैनधर्म सुखानें

महाराष्ट्रांत नांदूं लागला. अनेक स्मृति व पुराणें यांमुळें हिंदुसमाजांत एकसूत्रीपणा राहिला नाहीं. म्हणून विद्वान पंडितांनीं स्थल व काल यांचे भेद लक्षांत घेऊन स्मृतिवचनांची एकवाक्यता करणारे निबंधग्रंथ लिहिले. सायणाचार्यांनी जुन्या वेदविद्येचा अभ्यास सुलभ करण्याच्या हेतूनें श्रुतिग्रंथांवर भाष्यें लिहिलीं. हेमाद्रीनें 'चतुर्वर्गचिंतामणी' हा ग्रंथ लिहून सनातनधर्माविषयी आस्था उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला. श्रीज्ञानेश्वरांच्यापूर्वी महाराष्ट्रांत बौद्ध, जैन व हिंदू या तीन प्रमुख धर्मांची अशा-प्रकारें स्थित्यंतरें होत गेलीं. यांखेरीज त्यावेळीं कांहीं धर्मपंथ उत्पन्न झाले. त्यांपैकीं कांहीं बौद्धधर्माभिनी होते व कांही अवैदिक होते. यांपैकी लिंगायत व महानुभाव हे दुसऱ्या प्रकारचे पंथ होत. या दोन्ही पंथांना चातुर्वर्ण्य व चतुराश्रम मान्य नाहीत. लिंगायत पंथाचे अनुयायी कर्नाटकांत विशेष असून त्यांचे बरेच वाङ्मय कानडी व संस्कृत या भाषेत आहे. महानुभाव हा पंथ संन्यासप्रधान असून त्यांत स्पृश्यास्पृश्याचा विधिनिषेध नाही. तथापि महाराष्ट्रांत या पंथाला मान्यता लाभली नाही असें दिसते. याखेरीज अनेक संप्रदाय आढळतात. ज्या पंथाचे ज्ञानेश्वर अनुयायी होते तो नाथपंथ ज्ञानेश्वरापूर्वी सुमारें २००-३०० वर्षे होता. मत्स्येंद्रनाथ व गोरखनाथ हे पुरुष या पंथांत होऊन गेले. नाथपंथाप्रमाणे वारकरी संप्रदायहि महाराष्ट्रांत पूर्वीपासून रूढ आहे. या पंथाचें पंढरपूर हें मुख्य क्षेत्र असून त्याचे उपास्यदैवत विठ्ठल हे आहे. हा पंथ भक्तिप्रधान व भेदभावातीत आहे. तसेंच श्रीज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम यांच्या सारखे महापुरुष या संप्रदायाचें अनुयायी असल्यामुळें त्याला अत्यंत वंदनीय स्वरूप प्राप्त झालें. हा केवळ टाळकुटे संताळयांचा नसून कर्तृत्वसंपन्न राष्ट्रपुरुषांचा प्रभावशाली संप्रदाय आहे. इतर कोणत्याहि संप्रदायापेक्षां हाच अधिक लोकप्रिय आहे व पुष्कळ पाश्चात्यविद्याविभूषित पंडितदेखील स्वतःला या पंथाचे अनुयायी मानण्यांत भूषण मानतात. येथपर्यंत मराठी भाषा,

महाराष्ट्राचा राजकीय व धार्मिक इतिहास यांचें संक्षिप्त विवेचन केल्यानंतर आतां मराठी काव्यसरित्प्रवाहाचे अवलोकन करूं.

मुकुंदराज हे मराठी भाषेतील आदिकवि आहेत. मराठी काव्याच्या आध्यात्मिक युगाला प्रारंभ मुकुंदराजांनींच केला असें म्हणतां येईल. मुकुंदराजांचा जन्म शके १०५० च्या सुमारास झाला असावा व त्यांचें आयुर्मान १०५० ते ११२० पर्यंत मानण्यास हरकत नाही. मुकुंदराजांनीं आपल्या गुरुपरंपरेची माहिती 'विवेकसिंधूच्या' शेवटीं अशी दिली आहे: "**आदिगुरु श्रीआदिनाथ । तेथुनि श्रीहरिनाथ । तयाचा शिष्य श्रीरघुनाथ । जो गुणसिंधु ॥** श्रीरघुनाथाची समाधि मध्यप्रांतांतील छिंदवाड्यांत आहे व मुकुंदराजांची समाधीहि बैतुलजवळ 'खेडले' गांवी जुन्या पडक्या किल्ल्यांत आहे. मुकुंदराजांच्या नांवावर 'अद्वैतज्ञान-सर्वस्व,' 'अष्टावक्रगीताभाष्य,' 'आत्मबोध,' 'पंचीकरण,' 'विवेक-सारसिधु,' 'विवेकसिंधु' अथवा 'वेदार्थविवेचन महाभाष्य' व परमामृत हे सात ग्रंथ आढळतात. यांपैकी 'विवेकसिंधु' व 'परमामृत' हे दोनच ग्रंथ मुकुंदराजांचे आहेत. बाकीचे पांच ग्रंथ मुकुंद, मुकुंदस्वामी व मुकुंददीन इत्यादि पांचसहा कवि झाले त्यांचे असावेत. 'विवेकसिंधु' हा ग्रंथ जयतपाळ राजासाठीं लिहिला हे '**नृसिंहाचा बल्लाळ । तयाचा कुमार जयंतपाळ । तयानें करविला गदारोळ । वेदांताचा**' या ओवीवरून सिद्ध होतें. मुकुंदराजांनीं 'विवेकसिधु' हा ग्रंथ श्रीशंकराचार्यांच्या अद्वैत-सिद्धांताच्या अनुरोधानें लिहिला आहे. '**शंकरोक्तींवरी । मी बोलिलों मराठी वैखरी । म्हणूनि निर्धारावी चतुरीं । शास्त्रबुद्धी** ( वि. सिं. ७-४७) श्रीशंकराचार्यांच्या अद्वैतमताचा मराठीत प्रसार करण्याचा बहुमान मुकुंदराजाकडे जातो. त्यांचे 'विवेकसिंधु' व 'परमामृत' हे दोन्ही ग्रंथ ओवीबद्ध आहेत. महाराष्ट्रशारदा ही प्रारंभापासूनच अध्यात्माचें शुभ्र वस्त्र परिधान करून ओवीच्या चतुर्दलात्मक कमलावर विराजमान झाली आहे.

'विवेकसिंधूचे पूवार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग आहेत. पूर्वार्धाची सात प्रकरणे असून त्याची ओवीसंख्या ७७७ आहे. उत्तरार्धाची अकरा प्रकरणें असून त्यांतील ओवीसंख्या ८९४ आहे. प्रस्तुत ग्रंथाचें 'उपनिषदाचें निर्मित' काढूनि केला हा ग्रंथ असें त्यांनीच वर्णन केलें आहे. श्रोत्यांनीं 'रोकडें ब्रह्मसुख' भोगावे यासाठी मुकुंदराजांनीं ग्रंथरचना केली आहे. सारांश उपनिषदांतील ब्रह्मविद्या सर्वांनां सुलभ करण्यासाठी मुकुंदराजांनी हा ग्रंथ लिहिला आहे. विवेकसिंधु हा ग्रंथ आध्यात्मिक असला तरी त्यांतील प्रसादामुळें आकर्षक झाला आहे. 'विवेकसिधूंत' जे विषय विस्ताराने आले आहेत तेच 'परमामृत' या ग्रंथांत संक्षिप्तरीतीने विवेचिले आहेत. पांगारकरांनी म्हटल्याप्रमाणे : हा ग्रंथ अत्यंत लहान पण सरस आहे. (म. वा. इ. भा. १ पृ. ४०१) परमामृताची एकंदर १४ प्रकरणें असून त्यांत ३०३ ओव्या आहेत. या ग्रंथांत वेदांत, राजयोग, सगुणोपासना, या विषयांचा उहापोह केला आहे. सर्व शास्त्रांपेक्षां वेदान्तशास्त्र श्रेष्ठ होय. व वेदान्ताचा अनुभव तोच राजयोग होय. मुकुंदराजांनीं उपनिषदे, सांख्य, योग, गीता, भागवत यांचें आधार आपल्या ग्रंथांत घेतले आहेत. तात्पर्य मुकुंदराजांच्या ग्रंथांत महाराष्ट्रसाहित्याच्या आध्यात्मिक युगाची उष:प्रभा दृष्टोत्पत्तीला येते यांत शंका नाहीं.

मुकुंदराज व ज्ञानेश्वर यांच्या मध्यकाळी महानुभाव संप्रदायाचे संस्थापक चक्रधर हे उदयाला आले. ज्ञानेश्वरांच्या पूर्वी १०-२० वर्षें महानुभावपंथ उत्कर्ष पावत होता. व त्यांतील ग्रंथकारांनीं ग्रंथरचनेला प्रारंभहि केला होता. प्रा. रा. द. रानडे म्हणतात: " The Mahanubhavic conceits are like the conceits of the early Elizabathan writers and we may say that Dnanadeva stands to the mahanubhavas just in the same relation in which Shakespeare stood to the early Elizabathans. (Mysticism in Maharashtra p. 27.) हें प्रा. रानडे यांचें म्हणणें अगदीं खरे आहे. महानुभाव पंथाचे मूळ पुरुष गोविंदप्रभु

गंडमप्रभु ऊर्फ गुंडोबा हे कण्वशाखीय ब्राह्मण वऱ्हाडांत ऋद्धिपूर येथें रहात असत. हे मोठे तपस्वी व कृष्णभक्त असत. हे या पंथाचे आद्य पुरुष असून यांना प्रसाद चक्रधरावर झाल्यामुळें चक्रधर हे या पंथाचे संस्थापक झाले. चक्रधर हे भरवस ऊर्फ भडोच येथील मल्लदेव राजाचे प्रधान कोणी विशालदेव नामक सामवेदी नागर ब्राह्मण होते. मल्लदेव निपुत्रिक असल्या-मुळें त्याने आपले राज्य मृत्युसमयीं विशालदेवास दिले. विशालदेवाचा पुत्र हरिपाल हाच चक्रधर होय. हरिपालला ऐहिक ऐश्वर्याचा वीट येऊन तो रामटेक येथील यात्रेस निघाला. ऋद्धिपूर येथे त्याचा मुक्काम पडला. तेथे गोविंदप्रभुची त्याच्यावर पूर्ण कृपा होऊन त्यांचे सांप्रदायिक नांव चक्रधर असे ठेविले. चक्रधराचा जन्म शके १०७३ त झाला असे म्हणतात. शके ११८५ मध्यें त्यास पैठण येथे दत्ताचा साक्षात्कार होऊन त्याने संन्यास दीक्षा घेतली; व परत ऋद्धिपुरास येऊन त्याने आपल्या संप्रदायाचे निशाण रोविलें. या पंथांत कृष्ण व दत्त या प्रमुख देवता असून त्यांत संन्यास-धर्माला प्राधान्य आहे. इतकेच नव्हे तर स्त्रियानांहि संन्यास देण्याचा त्यांनी उपक्रम केला. हा पथ स्थापन झाल्यापासून तो आतांपर्यंत त्याला १ महानुभाव पंथ, २ महात्मा पंथ, ३ अच्युत पंथ, ४ जयकृष्णी पंथ, ५ भटमार्ग व ६ परमार्ग अशीं सहा निरनिराळीं नांवे मिळाल्याचे दिसून येते. प्रा. कोलते यांनीं वर दिलेल्या सहा नांवांची सांगोपांग चर्चा करून त्यांनी महानुभाव पंथाच्या धर्माला 'परधर्म' व शास्त्राला 'परशास्त्र' असें म्हणतात, तसेंच त्यांच्या पंथाला ऊर्फ मार्गाला 'परमार्ग' म्हणतात, व तेंच या पंथाचे मूळ नांव असावे असा निष्कर्ष काढला आहे. ( लोक-शिक्षण १९३६–३७ पृ. ३८१ ). तात्पर्य गोविंदप्रभु हे या पंथाचे आदिपुरुष, चक्रधर संस्थापक व नागदेव हे प्रचारक होते. या पंथाचे लोक भागवत व भगवद्गीता हे ग्रंथ प्रमुख मानतात. कै. पांगारकरांनीं म्हटल्या-प्रमाणें 'बौद्ध किंवा जैन मतासारखा महानुभाव हा पंथ वेदबाह्य तर

नाहींच पण भागवतधर्माचा हा एक पंथ आहे, असें या पंथाचें वाङ्मय पाहिलें असतां निभ्रांत वाटतें' (म. वा. इ. भा. १ पृ. ४८०). एकंदरीत, महानुभाव पंथाचा महाराष्ट्रांत कितीहि अधिक्षेप झाला असला तरी त्या पंथांतील कवींची काव्यनिर्मिती आदरणीय आहे.

महानुभाव पंथांत सात ग्रंथ पूज्य असून ते या पंथाच्या स्थापनेपासून पहिल्या १०० वर्षांतच लिहिले गेले आहेत. 'शिशुपाल वध' हा ग्रंथ् कवीश्वर भास्करभट बोरीकर याने ११९५ त लिहिला. कवीश्वर हा नागदेवाचार्यांचा प्रमुख शिष्य असून त्याचा जन्म मोंगलाईत कासारबोरी येथें झाला व त्याचें शिक्षण पैठण येथें झालें. भास्कराच्या ठिकाणीं कवित्व, विद्वत्व व कृष्णभक्ति यांचा त्रिवेणीसंगम झाला होता. 'शिशुपाल वध' हा ग्रंथ नांवावरून वीररसात्मक असा भासत असला तरी त्यांत शृंगाररसाचेच तुषार अधिक आढळतात. कवीश्वराच्या ठिकाणीं आपल्या प्रतिभेविषयी किती आत्मविश्वास होता हे "**फुन वाचा रसाळा: गर्वू सांडवीन कोकिळा: कळहंसा अवकळा: करीन मी**" (शिशुपालवध– २७). या ओवीवरून दिसून येते. कल्पनाचारुता, कथनकौशल्य, भाषासौंदर्य व भक्तिप्रवणता या गुणांनीं हें काव्य मंडित झाले आहे. हा ग्रंथ लिहून झाल्यावर भास्कराने तो आपला गुरुबंधु भावे व्यास यांना वाचून दाखविला तेव्हां व्यास यांनीं "अहो हा ग्रंथ निका झाला असे: परि निवृत्तिजोगा नव्हेचि: हा शृंगारिया प्रवृत्तिजोगा जाला असे" असे यथार्थ उद्गार काढले. यानंतर भास्करानें भागवताच्या एकादशस्कंधावर 'उत्तरगीता' नामक टीका लिहिली. शिशुपालवधाच्या तुलनेनें हा ग्रंथ नीरस उतरलेला आहे. महाराष्ट्राच्या अभिजात कवींत महनीय स्थान लाभण्याइतके मनोज्ञ वाग्वैभव भास्कराच्या काव्यांत प्रत्ययाला येतें. नागदेवाचार्यांची चुलत बहीण महदंबा ही महानुभावीय ग्रंथकारांत प्रख्यात कवयित्री होऊन गेली. हिचें 'धवळें' प्रसन्न व प्रेमळ आहेत. हिचे आजे–

गुरु गोविंदप्रभु यांनीं एकदां श्रीकृष्णविवाहोत्सव साजरा केला. तेव्हां महदंबेस कृष्णाची करवली म्हणून गाणी म्हणण्यास सांगितले. त्यावेळीं तिनें जीं गाणीं म्हटलीं त्यास 'धवळें' असें म्हणतात. या धवळ्यांतील प्रत्येक कडवें चार चरणांचें असून पूर्वार्धांत ८७ व उत्तरार्धांत ६४ अशीं एकंदर १५१ कडवी आहेत. श्रीकृष्ण विवाहाच्या रमणीय कथानकावर पुढें विपुल काव्यरचना झालेली असली तरी त्यावर पहिलें गीतकात्मक काव्य लिहिण्याचा बहुमान महदंबेकडेच जातो. व हीच महाराष्ट्राची आद्य कवयित्री आहे. 'केशवराज सूरी' यांचे 'मूर्तिप्रकाश' व 'सिद्धांत सूत्रें' हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. दामोदर पंडितांनी 'वच्छहरण' हें काव्य भागवती कथानकावर लिहिलें आहे. दामोदर पंडित हा 'साहित्य–संगीत–कला–विशारद' असा रसिक कवि होता. 'वच्छहरण' हें काव्य अतीव मनोहर असून त्यांत कवीची निसर्गरति दृग्गोचर होते. काव्याच्या प्रस्तावनेंत दामोदर लिहितो, "**असंख्यातु कवि बैकार: वाणितातीं निरंतर: परि नित्यनूतन मधुर: श्रीभागवती कथा**" प्रा. पंगु यांनीं म्हटल्याप्रमाणें 'काव्यदृष्ट्या वच्छहरणाचें स्वरूप अत्यंत मनोहर आहे.' (व. ह. पृ. १०). नरेंद्राचें 'रुक्मिणी स्वयंवर' व विश्वनाथ बाळापुरकर यांचें 'ज्ञानप्रबोध' ही काव्येंहि उल्लेखनीय आहेत. सारांश, महानुभाव पंथांतील कवीनी केलेली ही काव्यनिर्मिती जितकी अभिमानास्पद तितकीच आल्हादप्रद आहे.

महानुभाव पंथांतील ग्रंथकारांची काव्यरचना निर्माण होत असतां महाराष्ट्रांत एक महान् विभूति जन्माला आली. त्या विभूतीचें नांव श्रीज्ञानेश्वर हे होय. श्रीज्ञानेश्वर हे कवि, संत, विद्वान् व तत्त्वज्ञ या चतुर्विध नात्यानें अलौकिक आहेत. ज्ञानेश्वरकालीं मुसलमानांची स्वारी महाराष्ट्रावर झाली नव्हती. व तेथें '**यदुवंशविलास। तो सकळकलानिवास न्यायातें पोषी क्षितीश। श्रीरामचंद्र**'– अशा रामदेवराजाचें राज्य चालू

होतें. अशाप्रकारच्या वैभवशाली कालांत श्रीज्ञानेश्वरासारखे देदीप्यमान कविरत्न उदयाला आलें. त्यांचे वडील विठ्ठलपंत यांना निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान व मुक्ताबाई अशी चार मुलें आपेगांव येथे झालीं. निवृत्तिनाथांचा जन्म शके ११९५ मध्यें झाला व त्यानंतर अनुक्रमें दोन वर्षांनीं म्हणजे ज्ञानेश्वरांचा जन्म शके ११९७, सोपानाचा शके ११९९ व मुक्ताबाईचा शके १२०१ मध्यें झाला. ही सर्व भांवडे संन्याशाची असल्यामुळे तत्कालीन समाजाकडून त्यांचा अतोनात छळ झाला. श्रीज्ञानेश्वर हे कर्णाप्रमाणें जन्मताच ज्ञानाची कवचकुंडलें धारण करून उदयाला आले. ज्या परमार्थ संप्रदायामध्ये ज्ञानेश्वर निर्माण झाले तो नाथसंप्रदाय होय. ज्ञानेश्वर हे दोन आहेत असे मत प्रतिपादन करून पूर्वी कै. भारदे यांनीं महाराष्ट्रांत खळबळ उडवून दिली होती. पण हरिभक्तपरायण कै. भिंगारकरांनी ज्ञानेश्वर दोन नसून एकच आहेत असे सप्रमाण सिद्ध केले. भिंगारकरांच्या मताला न्यायमूर्ति रानडे, लोकमान्य टिळक व डॉ. भांडारकर यांची संमति मिळाल्यामुळे ज्ञानेश्वरांची शकलें झाली नाहींत. कै. भिंगारकरांच्या या बहुमोल कामगिरीबद्दल त्यांना कोणीहि मनःपूर्वक धन्यवाद दिल्याखेरीज राहाणार नाही.

श्रीज्ञानेश्वरांनी ‘ ज्ञानेश्वरी ’ हा आपला अलौकिक ग्रंथ शके १२१२ मध्ये लिहिला. ज्ञानेश्वरी हा ग्रंथ अव्यंग सौंदर्य, अव्याज माधुर्य व अतुल मार्दव यांनी अलंकृत असल्यामुळे तो महाराष्ट्रशारदेचे सौभाग्यव्यंजक मौलिरत्न झाला आहे. हा ग्रंथ म्हणजे श्रीमद्‌भगवत्‌गीतेवरील टीका असून त्यांत ज्ञानेश्वरांचें प्रभावशाली विभूतिमत्व सुंदररीतीनें प्रगट झालें आहे. ‘ ज्ञानेश्वरीसारखे ’ रम्योदात्त महाकाव्य मराठी भाषेतच काय पण जगांतील कोणत्याहि भाषेत क्वचितच आढळेल. हरीभाऊ आपटे यांनीं म्हटल्याप्रमाणें “ या विभूतीनें केलेली भगवद्गीता टीकात्मक ज्ञानेश्वरी ग्रंथ कालाच्या दृष्टीनें मराठी भाषेतील आद्य ग्रंथ असो वा नसो. पण

अंतस्थ गुणांच्या योगानें, भाषासौदर्यानें, शब्दलालित्यानें, दृष्टांतरमणीयतेनें, अलंकारशोभेनें व सगळ्यांत विशेष स्फूर्तिप्रेरित कवितापरिपाकाने हा ग्रंथ मराठी वाणीचें शिरोभूषण झाला आहे यांत शंका नाही. ( मराठी भाषेचा अभ्यास पृ. १८ ) श्रीज्ञानेश्वरींतील गीतार्थ साहित्यगुणांनीं मंडित झाला असल्यामुळे सर्वांना सुगम व सुसेव्य झाला आहे. लो. टिळकांनी म्हट-ल्याप्रमाणे "गीतेचा अर्थ अनेक उपमादृष्टांतांनी फुलवून सांगण्याची ज्ञानेश्वरांची शैली अलौकिक असून श्रीशंकराचार्यापेक्षां विशेषतः भक्ति-मार्गाचें व कांही अंशी निष्कामकर्माचेंहि त्यांनी समर्थन केलें असल्यामुळें श्रीज्ञानेश्वरी हा गीतेवरील एक स्वतंत्र ग्रंथ मानला पाहिजे" [ गीता-रहस्य पृ. १८ ] वसंतऋतु प्राप्त झाला म्हणजे वनांत पुष्पपल्लवांची संपदा दृग्गोचर होऊं लागते त्याप्रमाणें कोणत्याहि विषयाला ज्ञानेश्वरांच्या प्रतिभेने स्पर्श केला कीं तो उपमोत्प्रेक्षादि अलंकारांनी विभूषित होतो. ज्ञाने-श्वरांनी तत्त्वज्ञानाचें अमृत साहित्याच्या सुवर्णपात्रांतून वाचकांना अर्पण केले आहे, ' प्रतिक्षणे यन्नवतामुपैति, हे सौंदर्याचे लक्षण ज्ञानेश्वरीला पूर्णपणे लागू पडते. प्रा. हुपरीकर यांनीं म्हटल्याप्रमाणे ' ज्ञानेश्वरी ' हें तत्त्वज्ञान व काव्य या दोन भिन्न रंगाच्या आडव्या उभ्या धाग्यांनी विण-लेले व दोन भिन्न रंगांची मधून मधून झाक दाखविणारें भरजरी वस्त्र आहे. ( श्री-ज्ञानेश्वर दर्शन भा. १ पृ. २१६) ज्ञानेश्वरीचें कोणतेंहि पान उघडा तें सौंदर्यानें बहरलेलें आढळेल. ज्ञानेश्वरींत काव्याचें वासंतिक पुष्प-सौंदर्य व तत्त्वज्ञानाची शारदीय फलसंपदा ही एकत्रित झाली आहेत. भागवतधर्माच्या या आद्य ग्रंथाला महाराष्ट्रानें ' माउली ' असें मानून तिला सदैव हृदयांत धारण केली आहे. ज्ञानेश्वर हेच साहित्यचक्रवर्ति असून ' ज्ञानेश्वरी ' ही मराठी भाषेतील सर्व ग्रंथांची सम्राज्ञी आहे. ज्ञानेश्वरीत जितके शब्दसौंदर्य तितकेंच अर्थगांभीर्यहि आहे. विशेषतः, थोड्या शब्दांत विपुल अर्थ सांगण्याची त्यांची शैली निरुपम आहे. प्रतिभाविलास

व प्रज्ञाप्रकर्ष यांनीं विभूषित असलेल्या या ललितोदात्त महाकाव्याला जोत्स्नाविलसित व तारकावलयित गगन:श्रीचीच उपमा शोभेल. उत्कृष्ट काव्याचें " A great poem is a fountain forever flowing with the waters of wisdom and delight " उत्कृष्ट काव्य हा ज्ञान व आनंद यांचा अखंड वाहणारा निर्झर आहे असे जें शेलेने वर्णन केलें आहे तें ज्ञानेश्वरीला पूर्णपणे लागूं पडतें. ज्ञानेश्वरी हें तत्त्वज्ञानात्मक महाकाव्य (Epic) ज्ञान व आनंद यांचा लाभ करून देणारें सौंदर्याचें अक्षय्य सुवर्णभांडार आहे. म्हणून ज्ञानेश्वरी वाचल्यानंतर शेक्सपीअरच्या—

Full many a lady
I have eyed with best regard and many a time
The harmony of their tongues hath unto bondage
Drawn my too deligent years
—But you! oh! you
So perfect and peerless, are created of—
every creatures best

या ओळी कोणत्या रसिकाच्या मुखांतून बाहेर पडणार नाहींत? किंबहुना ज्ञानेश्वरांच्या प्रज्ञेतील तत्त्वज्ञानरूपी विश्वामित्र व त्यांच्या प्रतिभेतील काव्यरूपी मेनका यांच्या मधुरमीलनांतून ज्ञानेश्वरीरूपी शकुंतलेचा जन्म झाला अशी जर कल्पना केली तर ती चुकीची ठरणार नाहीं. सारांश, ज्ञानेश्वरी हा ग्रंथ श्रीज्ञानेश्वरांची ' **वाङ्मयी-मूर्ति** 'असून तिच्या अवलोकनाने कुणाचेहि अंत:करण उत्फुल्ल झाल्यांचून राहणार नाहीं, असा आम्हांला दृढविश्वास वाटतो.

ज्ञानेश्वरी हा ग्रंथ लिहिल्यानंतर ज्ञानेश्वरांनीं ' अमृतानुभव ' हा ग्रंथ लिहिला. प्रा. वा. व. पटवर्धन यांनी ' अमृतानुभव ' हा अगोदरचा ग्रंथ असून ज्ञानेश्वरी ही त्यानंतर लिहिली असावी असें मत व्यक्त केलें आहे. तथापि प्रा. रा. द. रानडे यांनीं म्हटल्याप्रमाणें एकंदरींत

पाहतां, अमृतानुभवामध्यें "**वैकुंठीचें सुजाणें। ज्ञानाशीं सत्वगुणें। बांधिजे हें बोलणें। बहु केलें** (अ. ३–१७)" अशी जी ओवी आहे तिचा संदर्भ भगवद्गीता (१४–६) '**सुखसंगेन बध्नाति ज्ञानसंगेन चानघ**' या श्लोकावर जी ज्ञानेश्वरांची ओवी आहे तिच्याशीं लागत असल्यानें व तीत सत्वगुणानें मनुष्य कसा बांधला जातो याची चर्चा बरीच केली असल्यानें 'अमृतानुभव' ग्रंथ ज्ञानेश्वरीनंतर लिहिला असावा असें म्हणण्यास आधार येतो ( संत–वचनामृत भा. १ पृ. ८). 'अमृतानुभव' हा ग्रंथ गहन असून ज्ञानेश्वरीइतका रसरम्य नाहीं. श्री. भावे यांनीं म्हटल्याप्रमाणें "अमृतानुभव ग्रंथ म्हणजे शुद्ध रसायन आहे; त्यांत शर्करा नाहीं व त्यास अनुपानहि नाहीं." तथापि कोणत्याहि सिद्धांताचे रत्न दृष्टान्ताच्या कोंदणांत बसविण्याची ज्ञानेश्वरींतील निरुपम शैली अमृतानुभवांतहि दिसून येते. ज्ञानेश्वरांनीं 'चांगदेव–पासष्टी' हा ग्रंथ चांगदेवाला बोध करण्यासाठी लिहिला आहे. चांगदेवपासष्टी हा ग्रंथ चिमुकला असला तरी चंद्रकलेप्रमाणे चारुतर व चित्ताल्हादक आहे. या शिवाय त्यांनी पुष्कळ अभंग रचना केली आहे. एकंदरींत, ज्ञानेश्वरांनी, मुकुंदराजांनी सुरू केलेली अध्यात्माची परंपरा अव्याहत रीतीनें चालू ठेविली. इतकेंच नव्हे तर "**तैसी अध्यात्मशास्त्रीं इये। अंतरंगची अधिकारिये। परी लोक वाक्चातुर्यें। होईल सुखिया**" असें आपल्या ग्रंथरचनेचें धोरण ठेवलें. ज्ञानेश्वरांनीं कर्मठांचें बंड नाहींसें करून ज्ञानयुक्त भक्तीचा मार्ग समाजाला दाखविला व महाराष्ट्राच्या सांस्कृतिक उन्नतीला स्पृहणीय हातभार लावला. मराठी भाषेचें सौंदर्य, सामर्थ्य व सौष्ठव किती अनुपमेय आहे हें सर्वांच्या प्रचीतीला आणून दिलें व '**माझा मराठाचि बोल कौतुकें। परी अमृतातेंही पैजा जिंके। ऐशीं अक्षरें रसिकें। मेळवीन**' ही प्रतिज्ञा खरी करून दाखविली. सारांश ज्ञानेश्वर हे महाकवि असून प्रतिभा, प्रज्ञा व प्रसाद यांचा मनोज्ञ विलास त्यांच्या ग्रंथांत दृग्गोचर होतो. म्हणून

महाराष्ट्राच्या सत्कविवैजयंतींतील ज्ञानेश्वर हे कौस्तुभरत्न आहेत यांत मुळींच संशय नाहीं.

श्रीज्ञानेश्वरांचे गुरु व वडील बंधु श्रीनिवृत्तिनाथ यांचा हरिपाठ प्रसिद्ध असून त्यांनीं 'निवृत्तिसार' हा ग्रंथ लिहिला असावा अशी समजून आहे. त्यांच्या निवृत्तीदेवी अथवा निवृत्तेश्वरी या नांवाच्या जुन्या पोथ्या उपलब्ध असून त्यांची अभंगरचनाहि विपुल आहे. सोपानदेवांची पंचीकरण, हरिपाठ नमन, सोपानदेवी इतकी ग्रंथरचना केली आहे. मुक्ताबाईची पदें, अभंग कल्याण-पत्रिका व हरिपाठ अशी रचना प्रसिद्ध आहे. निवृत्तिनाथांनी समाधि शके १२१९ मध्ये नाशिकजवळ त्र्यंबकेश्वर येथे घेतली. श्रीज्ञानेश्वरांनी निवृत्ति-नांथाच्या एक वर्ष अगोदर म्हणजे आळंदी येथें शके १२१८ मध्यें घेलली. सोपानदेवांनीं समाधि शके १२१८ मध्यें घेतली व मुक्ताबाईनीं शके १२१९ मध्ये एदलाबाद येथे घेतली. या चार अलौकिक भावंडांनी महाराष्ट्रावर व मराठी भाषेवर अपरीमित उपकार केले आहेत. हीं चारी भावंडें सामान्य व्यक्ति नसून विभूतिमत्त्वाच्या सिंहासनावर विराजमान झालेले महापुरुष होते. त्यांनी सर्वांना ब्रह्मविद्येचे भांडार खुलें करून मराठी वाङ्मयाला अभिजात वाङ्मयाचें महत्त्व प्राप्त करून दिले. त्याचप्रमाणें त्यांनीं भक्तिमार्गाचा प्रसार करून सर्वांना मोक्षाचा सुलभ उपाय दाखविला. भागवतधर्माच्या भव्य प्रासादाचा पाया घालून महाराष्ट्रांत समतेचें साम्राज्य प्रस्थापित केले. आपल्या आयुष्याच्या अल्प कालांत इतकी असामान्य कामगिरी केल्याबद्दल या अवतारी महापुरुषांबद्दल प्रत्येक महाराष्ट्रीयाला आदर व अभिमान वाटला तर त्यांत काय आश्चर्य ? सारांश, श्रीज्ञानेश्वर, निवृत्तिनाथ, सोपानदेव व मुक्ताबाई यांना त्यांच्या अतुल कामगिरीबद्दल गौरवाचा करभार कोण देणार नाही ? कारण, ज्ञानेश्वरांनीं म्हटल्या-प्रमाणें "**तैसा वाग्विलास विस्तारूं । गीतार्थेसीं विश्व भरूं । आनंदाचा आवारूं । मांडू जगा ।।** हें आपलें म्हणणें त्यांनीं पूर्णपणें खरें करून दाखविलें.

श्रीज्ञानेश्वरांचे समकालीन असून जणूं कांहीं भक्तीचा मूर्तिमंत अवतार असणारे असे एक महान् भगवद्भक्त विख्यात होते. त्यांचें नांव नामदेव हें होय. नामदेवांचे पूर्वज यदुशेट हे शिंपी जातीतील असून त्यांचा धंदा कापड विकण्याचा व कपडे शिवण्याचा होता. यदुशेट यांच्या घराण्यांत पंढरीच्या विठ्ठलाची उपासना चालू होती व त्यांचें घराणें वारकऱ्यांत मोडत असे. यदुशेटाच्या घराण्यांतील पांचवा पुरुष जो दामाशेट त्याचा नामदेव हा मुलगा होय. नामदेवांचा जन्म शके ११९२ मध्यें कार्तिक शुद्ध ११ रविवारीं झाला असे त्यानीच सांगितलेल्या माहितीवरून दिसून येते. नामदेव हे मूळचेच परमभक्त होते व सांसारिक आपत्तीमुळे त्यांचें मन ईश्वरभक्तीकडे अधिकच दृढ झाले. विसोबा खेचर हे नामदेवांचें गुरु होते. नामदेवांनी पंढरी–संप्रदाय अधिक वाढविला व कीर्तनसंस्थेचा प्रचार केला. पंढरी–संप्रदायाचा उगम केव्हां झाला व त्या संप्रदायाचा आद्यमुनी जो पुंडलीक हा केव्हां होऊन गेला हें निश्चित सांगतां येण्याजोगे नाही. पुंडलीक हा कानडी भक्त असावा असें दिसतें. विठ्ठलभक्ति ही ज्ञानेश्वरांच्या अगोदरच आळंदीपर्यंत पसरली होती. तथापि विठ्ठलभक्तीचा बहुजनसमाजांत दीर्घकाल प्रसार करण्याचें श्रेय नामदेवांनाच दिले पाहिजे. प्रा. रा. द. रानडे यांनी म्हटल्याप्रमाणें "नामदेवासारखा भक्त झाला नसतां तर पंढरीचे महात्म्यहि वाढले नसतें." मुकुंदराज–ज्ञानेश्वराप्रमाणें नामदेवांनी प्रौढ व पांडित्यप्रचुर ग्रंथरचना केली नाहीं. त्यांनी भगवद्भक्तीनें उत्स्फूर्त झालेल्या भावनोत्कट अभंगांची रचना केली. नामदेवांच्या या भावनापूर्ण अभंगांना 'उत्कट भावनांचा सहजोद्रेक म्हणजे काव्य' ही वर्डस्वर्थन्नी काव्याची व्याख्या पूर्णपणें लागू पडते. नामदेवांच्या घरांतील सर्वच मंडळींनीं अभंगरचना केली आहे. नामदेवांची पत्नी राजाई, नामदेवांचे चौघे मुलगे आणि चौघांच्या बायका हीं सर्वजण अभंग रचीत. नामदेवांच्या घरची दासी जनाबाई हिची

अभंगरचना अत्यंत रसमधुर आहे. नामदेवांनीं भक्तिपर भावगीतें (Devotional Lyrics) लिहून पंढरीच्या संप्रदायांत लोकशाहीचें तत्त्व प्रस्थापित केले. व ईश्वरभक्तींत जातिभेदाचें निष्कारणत्व प्रत्ययाला आणलें. एकंदरीत नामदेवांनीं आपल्या प्रेमळ अभंगरचनेनें मराठी काव्याच्या आध्यात्मिक युगांत भावगीतात्मक काव्यनिर्मितीला अधिक प्राधान्य दिले.

वसंतऋतु प्राप्त झाला म्हणजे असंख्य तरुलता पल्लवित व पुष्पित होतात त्याप्रमाणे एखादा महापुरुष उदयाला आला म्हणजे त्याच्या स्फूर्तीनें अनेक लहानमोठे लोक निर्माण होतात. असाच प्रकार मराठी वाङ्मयांत झालेला आढळून येतो. श्रीज्ञानेश्वर–नामदेवांनीं जो ज्ञान-भक्तीचा संप्रदाय स्थापन केला त्यांत पुष्कळ लहानमोठ्या अधिकाराचे संत उत्पन्न झाले. तेराव्या शतकांत नामदेवांचा समकालीन त्यांचा गुरु जो विसोबा खेचर याचा प्रारंभीं उल्लेख केला पाहिजे. विसोबा खेचर हा मूळ पैठणाजवळील भुंगी येथील राहणारा असून तो धंद्यानें व्यापारी होता. विसोबा खेचराचा गुरु सोपानदेव होय हे याच्या सोपनदेवावरील आरती-वरून दिसून येतें. विसोबाने सोपानदेवाची आरती, हरिश्चंद्राख्यानं, कांहीं अभंग व पदें इतकी ग्रंथरचना केली आहे. हा साधुपुरुष ज्ञानेश्वर-नामदेव यांच्या तीर्थयात्रेंत होता. हा शके १२३१ मध्यें श्रावण शुद्ध ११ स बार्शी येथें समाधिस्थ झाला. नामदेव समकालीन दुसरे संत गोरा कुंभार हे होत. ह्यांचा जन्म शके ११८९ तला असून हे सर्वांत वडील असल्यामुळें त्यांना सर्वजण काका असे म्हणत. ते तेरढोकी येथें रहात असत व कीर्त-नांत तल्लीन झाल्यामुळें त्यांनी आपलें मूलहि तुडविलें होतें असें म्हणतात. गोरोबाप्रमाणेंच कुंभारमंडळींत राका नांवाचा भगवद्भक्त प्रसिद्ध होता. गोरा व राका या दोघांनींहि अभंगरचना केलेली आहे. कुंभारांत जसा गोरोबा व राकोबा तसें इतर जातींतहि पुष्कळ संत होऊन गेले. त्यांपैकीं सावंतामाळी हा पंढरपुरनजीक अरणगांव येथें रहात असे. सावंतामाळ्याची

बाग व विहीर अद्यापिहि तेथें दाखविली जातात. हाहि ज्ञानदेव–नामदेव यांच्या तीर्थयात्रेंत होता. यानें शके १२१७ मध्यें आश्विन वद्य १४ स समाधि घेतली. नरहरी सोनार हा पंढरपुरचा राहणारा. नरहरी सोनार हा निस्सीम शिवभक्त असून तो विठ्ठलाचें दर्शनहि घेत नसे. परंतु पुढे संतांच्या सहवासाने शिव व विष्णु यांमधील अद्वैत पटल्यामुळें तो विठ्ठलभक्त बनला. " **सोनार नरहरी न देखे द्वैत। अवघा मूर्तिमंत एकरूप** " अशी त्याची स्थिति झाली. नरहरी सोनार हा शके १२३५ त प्रमादी संवत्सरीं माघ कृष्ण १ स समाधिस्थ झाला. याच्यामागें याच्या कुटुंबांतहि अनेक भक्त होऊन गेले. कुंभार, सोनार, माळी या जातीप्रमाणेंच महार या अस्पृश्य जातींतहि चोखा महार हा प्रसिद्ध संत होऊन गेला. हाहि ज्ञानदेव–नामदेव यांच्या तीर्थयात्रेंत होता. प्रा- रानडे यांनीं म्हटल्याप्रमाणे " मंगळवेढें येथें राहणारा चोखा हा वर्तनानें चोख होता व त्यास शोभेशी त्याची बहीणहि निर्मळा होती." ( सं. व. भा. २ पृ. १९ ) प्रपंचांतील विपत्तींनीं त्याचें हृदय निर्विण्ण व निराश झाले व मनाला शांतता मिळण्यासाठीं त्यानें अनेक तीर्थयात्रा केल्या. पण त्यांच्या मनाचें समाधान झालें नाहीं. पण ' **चोखा म्हणे पाहतां पंढरी भूवैकुंठ। मनाचे हे कष्ट दूर झाले** ' पंढरी पाहिल्यावर त्याचें संतप्त मन समुल्लसित झालें. आणि तेथील ब्रह्मानंदाचा अनुभव घेतल्यानंतर त्याला आपण व्यर्थ संसारांत गुंतून राहिल्याचा पश्चाताप झाला; व तो मोक्षाचा मार्ग चोखाळूं लागला. चोखामेळ्याप्रमाणेंच त्याचा मेहुणा बाका हा परमविष्णुभक्त होऊन गेला. चोखामेळा हा वैशाख वद्य ५ शके १२६० मध्यें मृत्यु पावला. चोखामेळ्यानंतर थोड्याच दिवसांत त्याची बायको व त्याचा मेहुणा हीं दोघेहि मृत्यु पावलीं असें सांगतात. सेना हा बेदर बादशहाचा न्हावी होता. ईश्वरभक्तीमुळें हा पिसा झाला होता व लोकांसहि तो पिसें लावी. आरशांतल्याप्रमाणें

आत्मरूप दाखविण्याचा त्याचा धंदा होता, श्रावण वद्य १२ दिवशीं सेना मृत्यु पावला. कान्होपात्रा ही मंगळवेढें येथील शामा या दासीची मुलगी होती. ती जरी गणिका होती तरी ती चंद्रिकेप्रमाणे अकलंक असून लावण्यगुणकलावती होती. बेदरच्या बादशहाने तिला आपल्या राजगृहांत सक्तीनें बोलाविले असतां त्याजकडे जाण्यापेक्षां मृत्यु स्वीकारलेला बरा असे वाटून पंढरपुरास विठ्ठलासमोरच शके १३९० मध्ये तिनें देह ठेवला. याशिवाय इतरहि पुष्कळ साधु या कालांत होऊन गेले. विठ्ठलभक्ति ही सर्व जातीत मुरलेली असल्यामुळे अगदी हीन जातींतहि श्रेष्ठ संत होऊन गेले. भक्तीच्या साम्राज्यांत सर्वत्र समता नांदत असते; व तेथे उच्चनीच भेद नाही. श्रीज्ञानेश्वरांनी म्हटले आहे; " **म्हणोनि कुळजातिवर्ण। हे आघवेचि गा अकारण। एथ अर्जुना माझेंपण। सार्थक एक॥ जैसें तंवची वहाळ ओहळ। जंव न पावती गंगाजळ। मग होवोनि ठाकती केवळ। गंगारूप ॥ यालागीं पापयोनीहि अर्जुना। कां वैश्य शूद्र अंगना। मातें भजतां सदना। माझिया येती** " (ज्ञा.९) म्हणून ईश्वरभक्तींत जातिभेदाचे निष्कारणत्व या सर्व संतांनी उत्तम रीतीनें सिद्ध केलें आहे व त्यांच्या भक्तिपूर्ण अभंगांत पराकाष्ठेची अकृत्रिम सहजता आढळते. या नामदेवकालीन संतांच्या अभंगांवर नामदेवाच्या अभंगरचनेची छाप पडली असली तरी या असंख्य संतांनी मराठी भाषेच्या अभंग-भांडारांत बहुमोल भर घातली आहे.

येथपर्यंत तेराव्या शतकांतील संतांचा उल्लेख केला. आतां चौदाव्या शतकांत मराठी भाषेची कशी स्थिति होती याचा विचार करूं. व्यक्तीचा काय किंवा राष्ट्राचा काय सतत उत्कर्ष किंवा सतत अपकर्ष अशी स्थिति केव्हांहि नसते. अभ्युदयानंतर अवनति व अवनतीनंतर अभ्युदय असा चक्रनेमिक्रम अनादिकालापासून चालू आहे. तसाच प्रकार वाङ्मयाच्या इतिहासांतहि आढळून येतो. एकाद्या शतकांत सारखा उत्कर्ष तर

दुसऱ्या शतकांत अपकर्ष होतो. हाच प्रकार मराठी भाषेच्या इतिहासांत चौदाव्या शतकांत झालेला दिसून येतो. चौदावें शतक हें महाराष्ट्रांत विशेष घडामोडीचें झालें. महाराष्ट्राच्या समाजव्यवस्थेत, पेहरावांत, ग्रामव्यवस्थेत, राहणींत प्रायः बहुतेक सर्व बाबतींत विलक्षण स्थित्यंतर घडून आलें. या स्थित्यंतराची, भयंकर दुष्काळ, परकीय सत्तेचा अंमल व समाजसंस्थेचें उन्मूलन ही प्रमुख कारणें आहेत. चौदाव्या शतकांत पूर्वी कधींहि न आलेली अशी संकटपरंपरा महाराष्ट्रावर कोसळली. स्वकीयांच्या सत्तेचें उन्मूलन झालें व परकीयांच्या सत्तेची प्रतिष्ठापना झाली. स्वराज्य नष्ट झालें की स्वदेश, स्वधर्म व स्वभाषा यांनाहि उतरती कळा येत असते. स्वसंस्कृतीवरील आत्मीयता कमी होऊन जेत्यांची संस्कृति आत्मसात करण्याची वृत्ति बळावूं लागते. हाच अनुभव जाधवांचे राज्य नाहींसें झाल्यावर महाराष्ट्रांत येऊं लागला. इतकेंच नव्हे तर यावेळी दैवी प्रकोपानेंहि उचल खाल्ली. तेराव्या शतकांत स्वराज्याचा विनाश झाला व चौदाव्या शतकाच्या पूर्वार्धात महाराष्ट्रांत भयंकर दुष्काळ पडला. हा दुष्काळ एकसारखा बारा वर्षें टिकला. दुष्काळाचें हें उग्र स्वरूप पाहून तेथील लोक वाट फुटेल तिकडे गेले. कांहीं कुटुंबें कोंकणात, पंजाबांत व मथुरेकडे अशीं निरनिराळ्या ठिकाणीं जाऊन राहिलीं. महाराष्ट्रांतील या दुर्गादेवीच्या दुष्काळांतून जे लोक महाराष्ट्राच्या बाहेरील प्रांतांत गेले तेथली बोली त्यांनी उचलली. याचा परिणाम असा झाला कीं मराठी भाषेत पंजाबी, तेलगू इत्यादि अनेक भाषांचें मिश्रण झालें. इतकेंच नव्हें तर व्रजभाषेंतील राधाकृष्णाची गानें व विविध प्रकारचे छंदहि तिकडून आलेल्या लोकांनीं आणिले. या दुष्काळापेक्षांहि फार मोठा आघात म्हणजे चौदाव्या शतकापासून या देशांवर मुसलमानांच्या स्वाऱ्या होऊं लागल्या हा होय. अनेक राज्यें, प्रांत व संस्थानें त्यावेळेपासून मुसलमानांच्या ताब्यांत जाण्याला सुरवात झाली. मुसलमानी सत्ता झाल्या-

बरोबर आपली भाषा, धर्म व रीतीरीवाज ते सक्तीने इकडे बसवूं लागले. त्यांनी अनेक ग्रंथांचा विनाश केला, असंख्य देवालयांचा विध्वंस केला व अगणित देहांचा विच्छेद केला. राजसत्ता मुसलमानी असल्यामुळें सरकार दरबारांत फारशी भाषा सुरूं झाली व हळूहळूं सरकारासंबंधीं कागद-पत्र फारशींत राहूं लागले. यामुळें आमच्या संस्कृतीवर व भाषेवर मुसलमानी संस्कृतीचा व भाषेचा परिणाम होऊं लागला. त्याचप्रमाणें त्यावेळीं रूढ असलेल्या माध्व, लिगायत व नाथ या पंथांचाहि मराठी भाषेवर परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. यावेळी कान्हो त्रिमळदास ‘ एल्हण ’ प्रभृति कांहीं कवींनीं रामकृष्णचरित्रपर काव्यरचना केली. तसेच बहिरा जातवेद यानें भागवताच्या दशमस्कंधावर केलेली टीका उपलब्ध आहे. याच वेळीं नामा पाठक हा कवि होऊन गेला. यानें नामरत्नमाला, भरतभेट इत्यादि लहान प्रकरणांखेरीज ‘ अश्वमेध ’ हा मोठा ग्रंथ लिहिला. याच सुमाराला चोंभा या नांवाचा आणखी एक कवि प्रसिद्ध आहे. याचें ‘ उखाहरण ’ हें काव्य उपलब्ध आहे. सारांश चवदाच्या शतकांत मराठी भाषेच्या वाङ्मयवाटिकेंत हेमंताची कळा आली होती असे म्हणावयास हरकत नाही.

पंधराव्या शतकाच्या शेवटल्या पदांत नरसिह सरस्वती व जनार्दन स्वामी हे प्रसिद्ध पुरुष होऊन गेले. नृसिंह सरस्वतींची ग्रंथरचना जरी उपलब्ध नसली तरी त्यांचा शिष्य जो सरस्वती गंगाधर यांनीं रचिलेला ‘ गुरुचरित्र ’ हा ग्रंथ सर्वपरिचित आहे. हा ग्रंथ काव्यदृष्टीनें जरी फारसा सरस नसला तरी त्याच्या वाचनाने असंख्य भाविक लोकांच्या मनाला आराम मिळाला आहे. नृसिंह सरस्वतीप्रमाणेंच जनार्दनस्वामी हेहि त्याकाळचे फार थोर पुरुष होत. हे निस्सीम दत्तोपासक होते. यांचा जन्म चाळीसगांव येथें शके १४२६ मध्यें रक्ताक्षी संवत्सरीं झाला. जनार्दनस्वामी यांनी आपल्या सद्गुणसंपन्नतेनें सरकार व सर्वेश्वर या दोन्ही धन्यांस वश

करून घेतलें. त्यांचें कांहीं अभंग व कांहीं पदे उपलब्ध आहेत. त्यांनीं दत्तस्तुतिपर एक ग्रंथ लिहिला अशी आख्यायिका आहे; पण तो आतां उपलब्ध नाहीं. जनार्दनस्वामी शके १४९७ चे सुमारास समाधिस्थ झाले. जनार्दनस्वामी आपल्या ग्रंथरचनेपेक्षां त्यांचा शिष्य जो एकनाथ यांच्यामुळें अधिक परिचित आहेत.

ज्ञानेश्वरांच्या नंतर एकनाथ हेच महाराष्ट्रांत अलौकिक महापुरुष होऊन गेले. एकनाथांचा जन्म शके १४७० मध्यें पैठणास महान् भगवद्भक्त भानुदास यांच्या कुलांत झाला. याच भानुदासांनी कृष्णरायांनी पंढरपूरची मूर्ति जी आपल्या राजधानींत नेली होती ती महत्प्रयासानें परत पंढरपुरास आणली. "शुद्ध बीजा पोटीं। फळे रसाळ गोमटीं" या न्यायानें अशा परम वैराग्यसंपन्न पुरुषांच्या कुळातं एकनाथासारख्या विभूतीचा जन्म झाल्यास त्यांत काय आश्चर्य? भानुदासाचा मुलगा चक्रपाणी, चक्रपाणीचा सूर्यनारायण सूर्यनारायणांचा एकनाथ अशी एकनाथांची पितृपरंपरा आहे. त्यांच्या आईचें नांव रुक्मिणी. एकनाथांच्या जन्मानंतर लवकरच त्यांचे आईबाप निवर्तले. रीतिप्रमाणे बालपणीचे अध्ययन पूर्ण झाल्यावर जनार्दन-स्वामींचा अनुग्रह घ्यावा असा त्यांना दृष्टांत झाला. व जनार्दनस्वामीकडे जाऊन त्यांनी अनुग्रह घेतला. तसेंच 'ज्ञानेश्वरी' व 'अमृतानुभव' या ग्रंथांचें अध्ययनहि त्यांच्यापाशी केले. मराठी भाषेत ग्रंथरचना करण्याची बुद्धि त्यांना ज्ञानेश्वरांच्या उदाहरणाने झाली असावी हें उघड आहे. एक-नाथांनी आपला पहिला ग्रंथ 'एकनाथी भागवत' हा लिहिला. हा ग्रंथ त्यांनी महाकर्णिकेच्या महातीरी वाराणसीसारख्या पवित्र क्षेत्रांत पंचमुद्रा पीठीमध्ये, शके १४९५ मध्ये कार्तिक शुद्ध पौर्णिमेस सोमवारी पुरा केला. एकनाथांचा हा ग्रंथ श्रीमद्भागवताच्या एकादशस्कंधावर आहे. या असामान्य ग्रंथाचें ३१ अध्याय असून त्याची ओवीसंख्या सुमारें वीस हजार आहे. या ग्रंथांत एकनाथांनीं आपल्या सुबोध वाणीनें भागवत धर्माचीं तत्त्वें सर्वांना

पटवून दिलीं आहेत. ज्ञानेश्वरीनंतर 'एकनाथी भागवत' हा अलौकिक ग्रंथ मराठी भाषेत निर्माण झाला. 'ज्ञानेश्वरी' हा ग्रंथ प्रतिभा व प्रज्ञा यांचें निधान आहे तर 'एकनाथी भागवत' हा ग्रंथ प्रसाद व प्रेमळपणा यांचें निवासस्थान आहे. श्री. भावे यांनीं म्हटल्याप्रमाणें, "कोठें कोठें मात्र या ग्रंथांच्या ओघांत विषयाचे विवरण करितांना नाथांची वाणी रसाळ, प्रसंगविशेषी प्रासादिक कवित्वाने स्फुरलेली, समर्पक दृष्टांतांनीं खुललेली, सद्भावानें आर्द्र झालेली, 'प्राकृत' जनांसहि गुंगवून सात्त्विक-वृत्तिप्रवण करणारी, वक्तृत्वाची व निरूपणकुसरीची साक्ष पटविणारी व विवेचक अशी स्पष्ट दिसून येते. (महाराष्ट्र–सारस्वत भा. १ पृ. २२९). भागवत लिहिल्यानंतर एकनाथांनी 'रुक्मिणीस्वयंवर' हा ग्रंथ लिहिला. याचें १८ अध्याय असून ओवीसंख्या सुमारें दोन हजार आहे. त्यानंतर एकनाथांची महत्त्वाची कामगिरी म्हणजे ज्ञानेश्वरीच्या संशोधनाची होय. एकदां त्यांना असा दृष्टांत झाला की, ज्ञानेश्वरांचें समाधीपाशी अजानवृक्ष आहे. त्याची मुळी समाधीमधील ज्ञानेश्वरांच्या गळ्याला गुरफटली आहे. तेथें जाऊन ती काढावी व दूर करावी. या दृष्टांताप्रमाणें एकनाथ आळंदीला गेले व तेथें त्यांनीं समाधि खणून, वाढलेलीं मुळें काढून समाधि दुरुस्त केली. याचवेळी त्यांना 'ज्ञानेश्वरी' या ग्रंथाचा जीर्णोद्धार करण्याची प्रेरणा झाली. एकनाथांनीं ज्ञानेश्वरांच्या समाधीचा जीर्णोद्धार शके १५०५ मध्यें ज्येष्ठांत केला व नंतर वर्ष सव्वावर्षानें म्हणजे शके १५०६ च्या च्या भाद्रपदांत ज्ञानेश्वरीचा जीर्णोद्धार केला. यामुळें संशोधक या नात्यानेंहि त्यांची कामगिरी अपूर्व आहे. एकनाथ हे श्रेष्ठ संत होते व त्यांची वृत्ति इतकी समतेची व सहिष्णुतेची होती कीं मोरोपंतानीं केलेलें 'शांतिजलधि' हें त्यांचें वर्णन कुणालाहि समर्पक वाटेल. प्रपंच व परमार्थ यांची सांगड घालून आपल्या उज्ज्वल चरित्राच्या द्वारें त्यांनीं भागवत धर्माचा भव्य आदर्श महाराष्ट्रापुढें ठेवला. एकनाथांनीं 'भावार्थरामायण'

पदें, भारुडें, अभंग अशी विपुल काव्यरचना केली आहे. 'एकनाथी भागवत' हा ग्रंथ लिहून त्यांनी आध्यात्मिक साहित्य जितकें सुशोभित केलें तितकेंच 'रुक्मिणीस्वयंवर' हें काव्य लिहून ललितसाहित्य सालंकृत केलें. पदें, अभंग व भारुडें हा त्यांच्या वैणिक प्रतिभेचा विलास आहे. सारांश, एकनाथ हे संत, सत्कवि व संशोधक या त्रिविध नात्यानें आदरणीय महापुरुष असल्यामुळे त्यांच्या अकलंक विभूतिमत्त्वाची व अभिजात वाङ्मयाची अलौकिक मोहिनी मोरोपंतापासून तो न्या. माधवराव रानडे यांच्यापर्यंत अव्याहतपणें पडलेली दिसून येते.

एकनाथांच्या निकट सहवासांतले पुढील चार ग्रंथकार प्रसिद्ध आहेत. १. विठा रेणुकानंदन, २. जनी जनार्दन, ३. रामा जनार्दन, ४. दासोपंत. हे चार व एकनाथ यांना मिळून 'एकनाथपंचक' असें म्हणण्याचा प्रघात आहे. विठा रेणुकानंदन हा देवी उपासक असून त्यास विठा रेणुकानंदन गोलटगांवकर असे म्हणतात. यानें म्हातारपणी आपल्या गांवांत रेणुकादेवीचें देऊळ बांधलें. त्याची रामचरित्रावरहि भक्ति असून त्यानें सीतास्वयंवर व कांहीं रामचरित्रपर पदें लिहिलीं आहेत. एकनाथपंचकांतील दुसरा साधु जो जनीजनार्दन त्याची कांहीं पदें व अभंग उपलब्ध आहेत. जनीजनार्दनानें 'महावाक्यविवरण' व 'सीतास्वयंवर' हे ग्रंथ लिहिले आहेत. जनीजनार्दन हा शके १५२३ मध्यें श्रावण वद्य ७ स समाधिस्थ झाला. रामा जनार्दनाविषयीं फारशी माहिती उपलब्ध नाहीं. यानें अनंतभुज व ज्ञानेश्वर यांच्यावर रचलेल्या दोन आरत्या प्रसिद्ध आहेत. विशेषतः ज्ञानेश्वरांची आरती सर्वपरिचित व सुंदर आहे. एकनाथपंचकांतील सर्वांत प्रसिद्ध पुरुष म्हणजे दासोपंत हे होत. यांचा जन्म शके १४७३ भाद्रपद वद्य अष्टमीस झाला. यांच्या आईचें नांव पार्वतीबाई व बापाचें दिगंबरपंत. दासोपंत हे नारायणपेठचे देशपांडे होते. एका वर्षी दुष्काळांत बादशहाच्या रसदीची सर्व व्यवस्था परमेश्वरानें लावून त्यांच्यावरील संकट

दूर केलें अशी आख्यायिका आहे. हे विरक्त वृत्तीनें आंबेजोगाई अथवा मोमिनाबाद येथें रहात असत. दासोपंत हे मराठी भाषेंत विपुल ग्रंथरचना करणारे कवि होऊंन गेले. त्यांनीं नुसत्या गीतेवर पांचसहा टीका लिहिल्या आहेत. त्यांपैकीं ‘गीतार्थ–बोध–चंद्रिकेची’ संख्या सुमारें वीस हजार आहे. यापेक्षां ‘गीतार्णव’ ही दासोपंतांची प्रचंड गीता–टीका प्रसिद्ध आहे. या ग्रंथाची ओवीसंख्या सव्वालक्ष आहे. दासोपंतांच्या ठिकाणीं मराठी भाषेविषयी उत्कट अभिमान होता. दासोपंत हे दत्तोपासक व नाथसंप्रदायी होते. हे साधुपुरुष शके १५३७ मध्यें माघ वद्य षष्ठीस समाधिस्थ झाले. एकनाथपंचकांतील या चारहि कवींवर एकनाथांची दाट छाया पडली आहे. हे सगळे एकमतानुयायी असून चातुर्वर्ण्यपद्धति सांभाळून सनातन हिंदुधर्माची जोपासना करावी हें त्यांचें ध्येय होतें.

आतां आपण एकनाथकालीन इतर कांहीं कवींचा विचार करूं. धर्म व अध्यात्म यांखेरीज इतरहि विषयांवर यावेळी ग्रंथरचना होत होती. प्रेमदास, महालिंगदास, इत्यादि ग्रंथकारांनीं निर्माण केलेली इतर विषयांवरील ग्रंथरचना उपलब्ध आहे. प्रेमदासाचा शिवपार्वती संवादरूपानें सांगितलेला ‘मूलस्तंभ’ या नांवाचा गद्यपद्यात्मक ग्रंथ प्रसिद्ध आहे. तसेच महालिंगदास यानें ‘पंचोपाख्यान’ व ‘चाणाक्यनीति’ हे ग्रंथ लिहिले आहेत. यावरून या काळीं मराठी भाषेंत वेदांताखेरीज इतरहि विषयांवर ग्रंथरचना होत होती असें दिसून येतें. त्याचप्रमाणें परमेश्वरप्राप्तीचा जो योगमार्ग त्याचें विवरण करणारे ग्रंथ त्याकाळीं महाराष्ट्रांत रचले जात होते. हा योगमार्ग सर्वांना सुलभ करण्यासाठीं पंधराव्या शतकाच्या शेवटीं त्र्यंबकानें एक ग्रंथ लिहिला आहे. त्यानें ‘बालबोध’ अथवा ‘बालावबोध’ हा तीन खंडात्मक ग्रंथ वेदांताचें विशद विवेचन करण्याच्या हेतूनें लिहिला. त्र्यंबकाला आपल्या ग्रंथाविषयीं योग्य अभिमान असून आपल्या ग्रंथांतील ज्ञान अमोल आहे असें

त्यानें म्हटलें आहे. ‘ **वेदशास्त्र द्रुमवल्ली । तेथिची पुष्पें यें गुंफिलीं । जै अमोदगुणें आथिलीं । मकरंद–बोधें** ’ असा त्यानें आपला आत्मविश्वास व्यक्त केला आहे. त्र्यंबक हा वेदांताप्रमाणेंच वैद्यकींतहि निष्णात असावा असें त्याच्या ग्रंथावरून दिसते. सिद्धपाल केसरी यानें ‘ मल्हारी महात्म्य ’ हा ग्रंथ लिहिला. हा सिद्धपाल केसरी स्वतःस मार्तंड भैरवाचा दास म्हणवितो. याच काळीं कृष्णदास कवीनें रामायणांतील युद्धकांडावर देशीकार लेणें चढविण्याला सुरवात केली व एकनाथांच्या कृपेनें त्याचा ग्रंथ पुरा झाल्यावर तो लगेच मृत्यु पावला. कृष्णदास मुद्गलाच्या युद्धकांडाचे ७८ प्रसंग असून त्याची ओवीसंख्या सुमारें दहा हजार आहे. कृष्णदासाची भाषाशैली उपमोत्प्रेक्षादि अलंकारांनी विभूषित असल्यानें हा ग्रंथ मनोरम वाटतो. ‘ **नाना संस्कृत हें चंद्रमंडळ । महाराष्ट्रचंद्रिका केवळ । संस्कृत स्वातीचें जळ । मराठी मुक्ताफळें** ’—असा त्यानें आपला मराठी भाषेविषयीं अभिमान प्रगट केला आहे. याच वेळीं कृष्ण-याज्ञवल्क्की याने ‘ कथाकल्पतरू ’ हा ग्रंथ लिहिला. रंगनाथ यानें ‘ चित्सदानंदलहरी ’ ‘ योगवासिष्ठ ’ व ‘ पंचरत्न ’ हे ग्रंथ लिहिले. भगवद्गीतेवरील टीकेप्रमाणेंच मेरू कवीनें ‘ अवधूतटीका ’ १५३५ चें सुमारास लिहिली व ‘ गणेशगीता ’ १५५४ मध्ये निरंजन नांवाच्या साधु पुरुषानें लिहिली. निरंजनापूर्वी विठ्ठल कवीनें लिहिलेली एक श्लोकबद्ध रासक्रीडा उपलब्ध आहे. मृत्युंजय स्वामींनीं ‘ अनुभवसार, ’ ‘ गुरुलीला, ’ ‘ अद्वैत प्रकाश ’ व ‘ पंचीकरण ’ इत्यादि ग्रंथ लिहिले. तात्पर्य एकनाथकालीन कवींच्या या काव्यरचनेंत वैपुल्य असलें तरी फारसें वैशिष्ठ्य आहे असें म्हणवत नाहीं.

अशाप्रकारें आध्यात्मिक काव्यरचना वृद्धिंगत होत असतां ललित काव्यनिर्मिति करणारे एक प्रतिभाशाली कविरत्न महाराष्ट्रांत उदयाला आलें. ते कवि म्हणजे मुक्तेश्वर हे होत. मुक्तेश्वरांनीं वेदांतपर काव्यरचना न करितां

रसात्मक काव्यरचनेला प्रारंभ केला. मुक्तेश्वर हे एकनाथाचे नातू असून त्यांचा जन्म पैठण येथें शके १५३१ मध्ये झाला. मुक्तेश्वर हे प्रारंभीं मुके होते व एकनाथांच्या कृपेनें त्यांना वाचा आली अशी आख्यायिका आहे. मुक्तेश्वरांच्या आईचें नांव गोदावरी की गंगाबाई हें निश्चित नाहीं. राजवाडे व पांगारकर यांच्या मते मुक्तेश्वरांच्या आईचे माहेरचें नांव गोदूबाई व सासरचें नांव गंगाबाई आहे. एकनाथ तिला कौतुकानें 'लीला' असें म्हणत असत. 'लीला-विश्वंभर' या नांवाचा उल्लेख मुक्तेश्वरांनी ठिकठिकाणीं केला आहे. लीला या शब्दानें आपल्या आईचा उल्लेख केलेला असावा पण 'लीला-विश्वंभर' हे त्यांच्या गुरूचें नांव असावें असा कै. बा. अ. भिडे यांचा तर्क आहे. मुक्तेश्वर हे जितके चतुर व चतुरस्त्र तितकेच प्रतिभाशाली व पंडित महाकवि होते. राजवाडे यांनीं म्हटल्याप्रमाणें "मुक्तेश्वरानें भरतखंडभर प्रवास केला होता, सुप्रसिद्ध कवींच्या भेटी घेतल्या होत्या व निरनिराळ्या प्रकारचे लोक व त्यांच्या चालीरीति यांची माहिती करून घेतली होती व त्यांच्या ग्रंथांत इंग्रज, पोर्तुगीज व बर्बर वगैरे परदेशस्थ लोकांचें जें वर्णन आलें आहे तें त्यांच्या प्रवासाचेंच फळ आहे." (राजवाडे-लेखसंग्रह पृ. ४२). मुक्तेश्वर हे वेद-वेदांत-वाङ्मय यांत परम निष्णात होते. मराठी भाषेंतील वागीश्वरांत ज्ञानेश्वरांच्या खालोखाल मुक्तेश्वरांनाच स्थान दिलें पाहिजे. त्यांनीं प्रारंभीं 'रामायण' हें श्लोकबद्ध काव्य लिहिलें. या काव्याची श्लोकसंख्या १७२५ असून त्याला 'संक्षेप रामायण' असें नांव दिलें आहे. या काव्यावर प्रसन्नराघव, भर्तृहरीचीं शतकें, कुमारसंभव, भामिनीविलास इत्यादि काव्यांची दाट छाया दिसून येते. परंतु या काव्यांत मुक्तेश्वरांच्या प्रतिभेचा रम्योज्ज्वल विलास फारसा प्रत्ययाला येत नाहीं. तथापि मुक्तेश्वरांची महाभारतावरील पर्वे हा मराठी भाषेचा अविनाशी व अनर्घ्य अलंकार आहे. त्यांची आदि, विराट, वन, सभा व सौप्तिक हीं पांच पर्वे

उपलब्ध आहेत. त्यांपैकीं आदिपर्व हें अतीव सुंदर आहे. मुक्तेश्वरांच्या-योग्यतेसंबंधीं प्राचीन व अर्वाचीन रसिकांचें एकमत आहे. भर्तृहरीनें म्हटलेंच आहे: "**जयन्ति ते सुकृतिनः रससिद्धाः कविश्वराः । नास्ति तेषां यशःकाये जरामरणजं भयम्.**" हरिभाऊ आपटे यांनीं म्हटल्या-प्रमाणें, "निसर्गमनोहर अशा युवतीच्या दर्शनाने जो आनंद होतो तो मुक्तेश्वरांच्या काव्यापासून होतो." मुक्तेश्वरांचे काव्य वाचत असतां आपण प्रसन्न प्रभातकाळी एकाद्या सुंदर उपवनांत सलील विहार करीत आहों असा सुखद संभ्रम होतो. सारांश, मुक्तेश्वरांची कविता नवरसरुचिर, नितांत-सुंदर व निर्व्याजमनोहर असल्यामुळें त्यांची कीर्ति-कमलिनी कराल काला-नलांतहि निरंतर उत्फुल्ल राहिली आहे. म्हणून मोरोपंतांनीं त्यांना उद्देशून लिहिलेली "**श्रीमुक्तेश्वर कविवर यातें कोण न शुभेच्छु वंदील । बंदी लक्ष जयाचें ज्याचें यश भव्य जोंवि मंदील**" ही सन्मणिमालेंतील आर्या कुणाला समर्पक वाटणार नाहीं ?

सोळाव्या शतकांत जे कवि उदयाला आले त्यांचा आतां आपण विचार करूं. रमावल्लभदास यांनीं भागवताच्या कांहीं भागावर टीका लिहिली आहे. त्यांचा जन्म शके १५३२ मध्यें झाला. रमावल्लभदासांचा प्रसिद्ध ग्रंथ म्हटला म्हणजे त्यांनी 'श्रीशंकराचार्यांच्या 'बृहद्वाक्यवृत्ति' ग्रंथावर केलेली 'वाक्यवृत्ति' या नांवाची विस्तृत टीका हा होय. याशिवाय त्यांनीं 'चमत्कारी' या नांवाची गीतेवर टीका लिहिली आहे. तसेंच त्यांनीं 'वैष्णवगीता' व कांहीं पदें, अभंग इतकी ग्रंथरचना केली आहे. रमावल्लभदासांची परंपरा हल्लीं गोमांतकाकडे विशेष आहे. यांच्यापेक्षां शिवकल्याणांनीं लिहिलेली भागवताच्या दशमस्कंधावरील टीका विस्तृत आहे. या ग्रंथांत शिवकल्याणांनीं श्रीकृष्णचरित्राचें रहस्य सर्वांना विशद केलें आहे. शिवकल्याणांनी रासक्रीडा इत्यादि भागवती कथानकावर रूपकें बसविण्याचें प्रशंसनीय चातुर्य व्यक्त केलें आहे. त्यांनीं श्रीज्ञानेश्वरांच्या

‘ अमृतानुभवावर ’ ‘ नित्यानंददीपिका ’ ही सुंदर टीका लिहिली आहे. ज्ञानेश्वरांच्या ग्रंथांचा त्यांनीं सूक्ष्म अभ्यास केलेला असल्यामुळें शिवकल्याणांच्या काव्यावर ज्ञानेश्वरांची छाप पडली आहे. शिवकल्याणांच्या समकालीन असलेला ‘ लोलिंबराज ’ हा कवि रसिक व रंगेल होता. याचें उपनांव जोशी असून हा जुन्नर येथें राहणारा. यानें भागवताच्या दशमस्कंधावर टीका लिहिली असून त्याशिवाय कांहीं पदें रचिलीं आहेत. त्याचें ‘ रत्नकलाचरित ’ हें काव्य श्रृंगारसपरिप्लुत आहे. याच वेळीं शामाराध्य या नांवाचा एक विद्वान कवि होऊन गेला. भारत, भागवत व रामायण या ग्रंथांवर त्यानें ओवीबद्ध काव्यरचना केली आहे आणि अश्वलायन प्रश्नमाला, नित्यानित्यविचार, ज्ञानोदयसिंधु वगैरे वेदांतपर ग्रंथ लिहिले आहेत. गीतेवरील टीकेप्रमाणेंच उपनिषदांवरहि त्यानें कांहीं टीकात्मक ग्रंथ लिहिले असावेत. कै. भावे यांनीं म्हटल्याप्रमाणे “ या शामाराध्याची भाषा किंवा रचनाशैली मात्र असावी तशी सुंदर नाहीं. पण आपल्या अवाढव्य रचनेमुळें हा कवि हा आदरास पात्र आहे. ( महाराष्ट्र सारस्वत भा. १ पृ. ३१८ )

मुक्तेश्वरानंतर महाराष्ट्रांत भक्तशिरोमणी श्रीतुकाराम हे श्रेष्ठ कवि उदयाला आले. बहुतेक प्राचीन कवींप्रमणेंच तुकारामांच्या संबंधानेंहि अनेक मतमतांतरें आढळून येतात. तुकाराम महाराजांच्या जन्मकाळासंबंधीं तीन मतें आढळतात:(१) रा. राजवाडे यांनीं वाईकडील एका वारकऱ्याच्या घरांतील तुकारामाच्या वंशावळीवरून तुकाराममहाराजांचा जन्म शके १४९० सालीं झाला असें ठरविलें आहे (२) रा. भारदे यांनीं देहू व पंढरपूर येथील तुकारामाच्या वंशावळींवरून तुकाराममहाराजांचा जन्म शके १५२० हा ठरविला आहे. (३) श्री. पांगारकर यांनीं तुकारामाचा जन्मकाळ महीपतीच्या ग्रंथाधारें शके १५३० हा ठरविला आहे. प्रा. रानडे यांनीं पांगारकरांच्या म्हणण्याला संमति दिली आहे. तथापि शके १५२० अगर १५३० ही

दोनच सालें तुकारामाच्या जन्मासंबंधीं विचारणीय आहेत. तुकाराममहाराजांच्या जन्माप्रमाणेंच त्यांना गुरूपदेश केव्हां झाला यासंबंधींहि एकमत नाहीं. श्री. भारदे यांच्या मताप्रमाणें शके १५४१ मध्यें माघ शुद्ध १० स तुकाराममहाराजांना गुरूपदेश झाला व श्री. पांगारकरांच्या मताप्रमाणें त्यांना शके १५५४ मध्यें त्यांना गुरूपदेश झाला असावा. तुकाराम हे कुणबी जातीत जन्माला आल्याबद्दल आनंद मानतात. त्यांच्या पूर्वजांतहि भगवद्भक्ति दृढमूल झालेली होती. तुकाराममहाराजांच्या बापाचें नांव बोल्होबा व आईचें नांव कनकाई. तुकारामाचे उपनांव आंबिले. तुकारामांना महाजनकीचें वतन होतें. पण दुष्काळांत तें सगळें नाहींसें होऊन त्यांची पहिली पत्नी रखुमाबाई व मुलगा ही दुष्काळांत मेलीं. दुष्काळांतच गुरें-ढोरें मरून त्यांचें दिवाळें निघालें. त्यांची दुसरी बायको जिजाई ही कर्कशा होती. संपन्नतेपेक्षां विपन्नताच आपल्या व्यावहारिक व आध्यात्मिक उन्नतीला सहाय्यकारी होते. या नियमानुसार तुकारामांचें मन संसारांतील विपत्तीमुळें हरिभजनाकडे लागलें. त्यांनीं आदरानें ज्ञानदेव, नामदेव व एकनाथ यांच्या ग्रंथांचा अभ्यास केला व ते कीर्तन करावयास लागले. भामनाथभंडारा इत्यादि डोंगराच्या एकांतांत शिरून ते भजन करावयास लागले. पुढें तुकारामांना नामदेवांचें स्वप्नामध्यें दर्शन होऊन नामदेवांनीं त्यांना आपली शतकोटी अभंगाची प्रतिज्ञा पुरी करण्यास सांगितली. नामदेवाबरोबर विठ्ठलाचेंहि दर्शन झाल्याचें तुकारामांनीं सांगितलें आहे. तुकारामांचा अतोनात छळ झाला तरी त्यांची मनाची शांतता ढळली नाहीं, भक्ति चळली नाहीं व प्रेमळपणा कमी झाला नाहीं. शिवाजी महाराजांनीं एकदां जडजवाहीर लावून दिलें असतां ते त्यांनीं परत केले. सारांश तुकाराम हे निःस्सीम भगवद्भक्त होते. तुकारामांची अभंगरचना हीच त्यांची काव्यसंपदा होय. पण ती अलौकिक सौंदर्यानें अलंकृत असल्यामुळें मराठी भाषेत अजरामर व अनुपमेय ठरली आहे.

कीट्सनें म्हटलें आहे: “a poem should come as leaves come to a tree.” अशाप्रकारचें तुकारामांचें स्वाभाविक व सहजस्फूर्त कवित्व आहे. तुकारामांचे अभंग हे उत्कट भावनांचे सहजोद्गार आहेत. भागवत धर्माचें उदात्त स्वरूप त्यांच्या अभंगांत उत्कृष्ट रीतीनें प्रतिबिंबित झालें आहे. म्हणून तुकाराम हे वैणिक प्रतिभेचें (Lyrical genius) प्रभावशाली व प्रासादिक कवि होऊन गेले यांत यत्किंचितहि शंका नाहीं. तुकाराम-महाराज हे शके १५७१ फाल्गुन वद्य ३ शनिवार रोजीं सदेह वैकुंठास गेले. प्रा. रानडे यांनीं म्हटल्याप्रमाणे “ज्यानें गोविंदांचें ध्यान केलें त्याची कायाहि गोविंदरूपच होते. या तुकारामाच्या उक्तीप्रमाणें, अगर **‘सदेह सच्चिदानंद। कां नोहावे ते’** (१८–१६४५) या ज्ञानेश्वरांच्या उक्तीप्रमाणें तुकाराम सदेह वैकुंठास गेले असें म्हणण्याचा परिपाठ पडला असावा.” (तुकाराम–वचनामृत प्रस्तावना पृ. ६).

तुकाराममहाराजांच्या समकालीन असलेले श्रीरामदासस्वामी यांचाहि येथें उल्लेख करावयाला हरकत नाहीं. रामदास हे देशकालवर्तमानज्ञाते असे कर्मयोगी संत होऊन गेले. यांचा जन्म मौजें जांब येथें शके १५३० मध्यें कलिक संवत्सरीं चैत्र शुद्ध नवमीस म्हणजे रामनवमीचे दिवशीं मध्यान्हीस रामजन्माचे वेळींच ‘टळटळीत दुपारी’ झाला. त्यांच्या पित्याचें नांव सूर्याजीपंत, मातेचें नांव राणूबाई व उपनांव ठोसर. रामदासांनीं गोदावरी कांठीं पंचवटीजवळ टाकळी येथें राहून बारा वर्षें पुरश्चरण केलें व नंतर रामदासांना एके रात्री रामदासांना अनुग्रह झाला. अनुग्रहा-नंतर रामदासांनीं देशभर तीर्थाटन करून तत्कालीन शोचनीय स्थितीचें सूक्ष्म अवलोकन केलें. आपल्या देशांतील दास्य, दारिद्र्य व दुःख पाहून त्यांचें अन्तःकरण द्रवीभूत झालें व असहाय्य लोकांच्या असह्य यातना पाहून श्रीरामचंद्राची करुणा भाकली. अशा तऱ्हेच्या पारतंत्र्यपूर्ण व प्रातिकूल परिस्थितीचा नाश करून आपल्या राष्ट्राचा उद्धार करावा

असें त्यांनीं ठरविलें व १५६६ मध्यें तीर्थयात्रा संपवून परत जांबेस आले व येथून त्यांनीं मठस्थापनेस प्रारंभ केला. रामदासांचे हे मठ म्हणजे भिक्षा वृत्तीपासून राजकारणाचें ज्ञान देणारीं राष्ट्रीय विद्यापीठेंच होत असें म्हणण्यास हरकत नाहीं. हे मठ रामदासांनीं देशभर चारी दिशांना पसरिले होते. आपल्या शिष्यांची समर्थांनीं निरनिराळ्या मठांत योजना केली होती. रामनामाचा जप, मारुतीची उपासना व सामर्थ्याची जोपासना हीं रामदासांची मूल तत्त्वें होतीं. समर्थांची शिस्त कडक असल्यामुळें त्यांचा वचक अधिक असे समर्थांच्या शिष्यमंडळींत पुरुषाप्रमाणेंच स्त्रियांहि होत्या. समर्थांच्या संप्रदायांत वेणाबाई, अक्काबाई, द्वारकाबाई, गंगाबाई या शिष्यिणींचा समावेश होतो. वेणुबाईनीं 'पाईपादुका हातांत तुंबा । भर्जरी भगवी फाकली प्रभा । कटबंध कौपीन माळसूत्रशोभा । न वानवे मूर्ति साजरी । असें समर्थांच्या मूर्तीचें वर्णन केलें आहे. समर्थ हे मितभाषी होते. त्यांचें चित्त सदैव विचारांत निमग्न असे. श्रीशिवाजी महाराजांना त्यांचा अनुग्रह घ्यावा असें वाटलें व शिवाजीने झोळींत टाकलेलें राज्यहि त्यांनीं तुच्छ मानलें. देश व देव यांची उपसना करून प्रपंच व परमार्थ यांची सांगड घालावी असा समर्थांच्या उपदेशाचा कटाक्ष असे. रामदासांचा सर्वांत मोठा ग्रंथ 'दासबोध' हा होय. समर्थांच्या या ग्रंथांत सर्वप्रकारच्या विषयांचें विवरण असल्यामुळें त्याला 'पद्यात्मक ज्ञानकोश' असें म्हणतां येईल. हा ग्रंथ शके १५८१ त झाला असें त्यांनीं म्हटलें आहे. समर्थ हे केवळ विरागी भगवद्भक्तच नव्हे तर मुत्सद्दी संतहि होते. दासबोधाखेरीज समर्थांचे 'मनाचे श्लोक' प्रसिद्ध आहेत. त्याचप्रमाणें 'सुंदर कांड', 'युद्ध कांड' शंभर ओव्यांचें एक अशीं चौदा शतकें, पंचीकरण, करुणाष्टकें, स्फुट-ओव्या, श्लोक, आरत्या वगैरे विपुल ग्रंथरचना समर्थांनीं केलेली आहे. समर्थांची भाषा ओजस्वी असून त्यांच्या वृत्तींतील तेजस्विता त्यांच्या ग्रंथांत उत्कृष्ट रीतीनें व्यक्त झाली आहे. श्रीशिवाजी महाराजांनीं रामदास स्वामींना

राहण्यासाठीं सज्जनगडावर एक भव्य इमारत बांधून दिली होती व तींत शके १६०३ माघ वद्य नवमीच्ने दिवशीं दोनप्रहरी समर्थांचे प्राणोत्क्रमण झाले. सारांश, श्रीरामदास, हे कै. चंद्रशेखर यांनी म्हटल्याप्रमाणें '**राजयोगी, राजगुरु व कविराज**' होते.

मराठी भाषेत एकनाथपंचकाप्रमाणे 'रामदासपंचायतन' हेंहि सुप्रसिद्ध आहे. श्रीसमर्थ रामदास स्वामी व त्यांचे अनुयायी जयरामस्वामी वडगांवकर, रंगनाथ स्वामी निगडीकर, आनंदमूर्ति ब्रह्मनाळकर आणि केशवस्वामी भागानगरकर या पांचजणांस त्यावेळच्या लोकांनीं 'दासपंचायतन' हें नांव दिलें आहे. श्रीजयरामस्वामी वडगांवकर हे वडगांव येथील गादीचे अधिपति होते. त्यांचा जन्म १५२१ मध्ये गोकुळ अष्टमीस झाला. शके १५९४ परिधावी संवत्सर भाद्रपद वद्य ११ या दिवशीं त्यांनी समाधि घेतली. श्री रंगनाथ स्वामी निगडीकर हे आनंद-संप्रदायी होते. यांना लहानपणापासून शिपाईगिरीची हौस फार असे. त्यांचा राहण्याचा थाट ऐश्वर्यसंपन्न असे. रंगनाथस्वामींची कांति व कविता तेजस्वी आहे. यांनी गजेंद्रमोक्ष, गुरुगीता सुदामचरित्र, शुक-रंभासंवाद पंचीकरण, भानुदासचरित्र व योगवासिष्ठसार इतकी ग्रंथरचना केली आहे. रंगनाथ हे शके १६०६ मार्गशीर्ष वद्य १० स समाधिस्थ झाले. दास-पंचायतनांतील बाकीचे दोघे साधु जे आनंदमूर्ति ब्रह्मनाळकर व केशवमूर्ति भागानगरकर यांची ग्रंथरचना फारशी प्रसिद्ध नाहीं. आनंदमूर्ति हे प्रेमळ कीर्तनकार होते व भागानगरकर यांचीं कांहीं पदें उपलब्ध आहेत. समर्थपंचायतनांतील या चार साधु पुरुषांनीं रामदासांच्या प्रमाणें राष्ट्रीय कामागिरी केली असें म्हणवत नाहीं.

येथपर्यंत मुकुंदराजापासून तो रामदासापर्यंत होऊन गेलेल्या संत-सत्कवींच्या विषयीं संक्षिप्त विवेचन केलें. मुकुंदराजापासून तो रामदासा-पर्यंत झालेल्या संतांनीं अध्यात्मपर काव्यरचना वैपुल्यानें केली असल्यामुळें

या प्रकरणाला ' मराठी काव्यांतलि आध्यात्मिक युग ' असें नांव दिलेलें आहे. या महाराष्ट्रीय साधुसंतांनी महाराष्ट्राच्या इतिहासांत कोणती कामगिरी केली याविषयीं प्रामुख्यानें दोन मतें सांगतां येतील. पहिलें न्यायमूर्ति रानडे यांचें होय. न्यायमूर्ति रानडे यांनीं 'मराठी सत्तेचा उत्कर्ष' (Rise of the Maratha Power ) या आपल्या ग्रंथांत ' Poets and Saints of Maharastra ' हें अत्यंत सुंदर प्रकरण लिहिलें आहे. तें प्रकरण न्यायमूर्तींच्या मार्मिक विवेचन व मनोज्ञ तत्त्वदर्शित्व या गुणांमुळें मननीय व मनोहर वठलें आहे. सर्व साधुसंतांच्या कामगिरीचें सविस्तर विवेचन केल्यानंतर त्यांनीं पुढील निष्कर्ष काढला आहे. न्यायमूर्ति म्हणतात: " We have thus noticed all the principal feautures of the religious movement, which commencing with Dnyanashvar who lived in the fifteenth century, can be treated to the end of thc last century as a steady growth in spiritual virtues. It gave us a literature of considerable value in vernacular language of the country. It modified the strictness of the old-spirit of cast-exclusiveness. It raised the shudra-classes to a position of spiritual power and social importance almost equal to that of the Brahmins. It gave sanctity to the family relations and raised the status of woman. It made the nations more hummane at the same time more prone to hold together by mutual toleration. It suggested and partly carried out a plan of reconciliation with mahomedans and it subordinated the importance of rights and ceremonies; and of pilgrimages and facts and of learning and contemplation, to the higher excellence of worship by means of love and faith. It checked the excess of polytheism. It tends in all these ways to raise the nation generally to a higher level of a capacity both of thought and action and prepared it in a way no other nation in

India was was prepared to take the lead in establishing a united native power in the place of foreign domination. These appear to us to be the principlal features of the religion of of Maharashtra, which Saint Ramadas had in view when he advised Shivaji's son to follow in his father's footsteps, and propogate this faith at once to tolerant ant catholic, deeply spiritual and yet not iconoclastic (Rise of the Maratha Power ps. 171-72.) या उताऱ्यांत न्यायमूर्ति रानडे यांनीं संतांच्या चळवळीनें कोणतें कार्य घडून आलें याची मीमांसा केली आहे. संतांच्या चळवळीनें मराठी वाङ्मयाची अभिवृद्धि केली, जातिभेदाचें वैषम्य नाहींसें केलें; कर्मठपणाचें बंड मोडून प्रेम व श्रद्धा यांचें महत्त्व वाढविलें, धार्मिक सहिष्णुतेची वाढ केली आणि आध्यात्मिक सद्गुणांचा उत्कर्ष केला असें थोडक्यांत न्यायमूर्तींच्या विवेचनाचें तात्पर्य सांगतां येईल. अशा-रीतीनें न्यायमूर्ति रानडे यांनीं संतांच्या कामगिरीचें रहस्य उत्कृष्ट रीतीनें विशद केलें आहे.

तथापि न्या. रानडे यांनीं संतांच्या कामगिरीची मीमांसा इतिहासाचार्य राजवाडे यांना मान्य नाहीं. राजवाडे यांनीं रामदासाखेरीज इतर सर्व साधुसंतांचा संताळे, देशबुडवे या प्रखर शब्दांनीं तीव्र उपहास केला आहे व न्यायमूर्तींना संतांच्या कामगिरीचें रहस्य कळलें नाहीं असें मत व्यक्त केलें आहे. म्हणून या ठिकाणीं विवेचनाच्या पूर्ततेसाठीं राजवाडे यांच्या मताचा विचार करणें जरूर आहे. राजवाडे लिहितात " या भक्तिपंथाची स्थापना महाराष्ट्रांत तेराव्या शतकांत झाली. संताळ्यांची ही स्थापना झाल्यावर कांहीं कालानें देवगिरी येथील मराठ्यांचें राज्य नष्ट झालें व यवनांची सत्ता महाराष्ट्रांत तीनशें वर्षें म्हणजे शके १२४० त देवगिरी घेतल्यापासून शके १५४० अहमदनगरची मनसब-

गिरी शहाजीला मिळेपर्यंत बहुतेक अव्याहत चालली. या तीन शतकांत संताळ्यांचेंच प्राबल्य महाराष्ट्रांत फार होतें. संत म्हटला म्हणजे अत्यंत पंगुपणाचा केवळ मूर्तिमंत पुतळाच होय. संताला खाणें नको, पिणें नको, वस्त्र नको, प्रावरण नको, कांहीं नको, एक विठोबा मिळाला म्हणजे सर्व कांहीं मिळालें. असल्या या संत मंडळींचे हाती विचाराची दिशा जाऊन महाराष्ट्र तीन शतकें पंगु बनून राहिला. सनातन धर्माला त्रासून महाराष्ट्रांतील लोकांनी जी धर्मक्रांति केली तिचे स्वरूप हें असें होतें. या धर्मक्रांतीनें राष्ट्रोन्नति होण्याचें एकीकडेच राहून उलटी धर्मावनति, राष्ट्रावनति मात्र झाली. रामदास स्वामी, रंगनाथ स्वामी, मोरया देव वगैरे सनातन धर्माभिमानी विचारी साधु पुरुष झाले व ते महाराष्ट्रास महाराष्ट्रधर्माचा उपदेश करते झाले. या सनातन धर्माभिमानी साधु पुरुषांच्या वेळीं संताळे आपला संथ मार्ग आक्रमीतच होते. ... संताळ्यांच्या उपदेशानें महाराष्ट्रांत नवीन जोम उत्पन्न झाला. म्हणून न्यायमूर्ति रानडे म्हणतात तो खरा प्रकार नसून, समर्थांनीं काढलेल्या नवीन रामदासी पंथाच्या उपदेशानें तो चमत्कार घडून आलेला आहे. निवृत्तीकडे ज्यांचे डोळे लागले. त्या संतांच्या हातून हें प्रवृत्तिपर कृत्य व्हावें कसें ? 'समर्थांचिया सेवका वक्र पाहे असा सर्व भूमंडळीं कोण आहे' असली धमकी देणाऱ्या समर्थांच्याच महोपदेशाचा तो परिणाम होय. समर्थांनीं नवीन बनविलेल्या महाराष्ट्रधर्म या शब्दाचा नीट अर्थ न कळल्यामुळें, न्यायमूर्तींनीं रामदासांच्या महाराष्ट्रधर्माची व संतांच्या भक्तिमार्गाची तद्रूपता कल्पिली व एकाच्या गुणाचा आरोप दुसऱ्यावर केला. या अवस्त्वारोपामुळें न्यायमूर्तींची कार्यपरंपरा चुकली व असमर्थ कारणापासून समर्थ कार्याची उत्पत्ति झाली असें चमत्कारिक विधान त्यांच्या हातून घडलें गेलें. श्रीमदाचार्यप्रणित सनातनधर्माच्या कठोर आचाराला कंटाळून त्याच्या विरुद्ध जी धर्मक्रांति ती संताळ्यांचा भक्तिमार्ग होय. या पंगू भक्तिमार्गाच्या किंचित विरुद्ध झालेली जी धर्मशुद्धि ती

समर्थांच्या प्रवृत्तिपर महाराष्ट्रधर्माच्या सहाय्याने पुनरुज्जीवित झालेला सनातन धर्म होय. सहिष्णुता हे संतांचे व्रत पडलें. सर्वस्वाचा नाश झाला तरी आपले कांहीहि गेले नाहीं ही संतांची बालंबाल खात्री. अशांच्या हातून राष्ट्राची राजकीय उन्नति कशी व्हावी...या राज्यक्रांतिला समर्थांनीं उपदेशिलेला महाराष्ट्रधर्म कारण झाला, संतांचा निवृत्तिमार्ग कारण झाला नाहीं ...सारांश, संताळ्यांची व महाराष्ट्रधर्माची जी सांगड न्यायमूर्तींनीं जोडून दिली आहे ती निराधार व अवास्तव आहे व 'महाराष्ट्राच्या पुनरुज्जीवनासंबधानें संतांचे जे गोडवे न्यायामूर्तीनी गाइले आहेत ते पायाशुद्ध वाटत नाहीत' ( राजवाडे ले. सं. भा. १ पृ. २८५–२८८ ).

राजवाडे यांनी न्यायमूर्ति रानडे यांच्या मताचे हे जे खंडन केले आहे ते अनेक दृष्टींनी प्रमादास्पद व पूर्वग्रहदूषित आहे. त्यांनीं रामदास व इतर साधुसंत यांची जी फारकत केली आहे तीच मूलत: सदोष आहे. ज्ञानेश्वर, तुकाराम, एकनाथ व रामदास हे एकाच परंपरेच होते. राजवाडे ज्याला महाराष्ट्रधर्म म्हणतात तो भागवतधर्माचेंच परिणत स्वरूप आहे. भागवतधर्मापेक्षां महाराष्ट्रधर्म हा सर्वस्वी भिन्न आहे असे जें राजवाडे मानतात तें सदोष आहे. ज्ञानेश्वर, तुकाराम व रामदास हे सर्व संत–कवि भागवतधर्माच्या वृक्षावर बसून कूजन करणारे कोकिल आहेत. संत हे पंगुपणाचा मूर्तिमंत अवतार होते हे म्हणणे चूक आहे कारण '**वज्रादपि कठोराणि मृदूनि कुसुमादपि**' अशी त्यांची वृत्ति होती. केवळ रामदासांच्या महाराष्ट्राधर्माच्या उपदेशानें राष्ट्राची राजकीय उन्नति झाली हें मत अर्थवादात्मक होय. म्हणून रानडे यांनीं भागवतधर्म व महाराष्ट्रधर्म यांची तद्रूपता कल्पिली तीच समर्पक आहे. किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं ज्ञानेश्वरापासून तुकारामापर्यंत झालेल्या कवींनीं जें भागवतधर्माचें मंदिर उभारलें त्यावरच रामदासांनीं महाराष्ट्रधर्माचा कळस बसविला. प्रा. रा. द. रानडे

म्हणतातः It is indeed true, as late mr. Justice Ranade said that even pacifist saints like Namadev & Tukaram laid the moral foundations on which Ramadas later reared his politico religious edifice " ( Mysticism in Maharashtra P. 442 ) म्हणून संतांचा वारकरी संप्रदाय व रामदासांचा संप्रदाय यांत वैमनस्य वाढविणे अनुचित होय. हे दोन्ही संप्रदाय परस्परविरोधी नसून परस्परपूरक झाले. अशी वस्तुस्थिति असतां भागवतधर्म व महाराष्ट्रधर्म यांच्या अभिमान्यांनीं परस्परांचा अधिक्षेप न करितां एकमेकांकडे आदराने व आत्मीयतेनें पाहणें हेच इष्ट होय.

अशारीतीने ज्ञानेश्वरापासून रामदासापर्यंत होऊन गेलेल्या सर्व संत–सत्कवींनीं केवळ मराठी साहित्यांतच नव्हे तर महाराष्ट्राच्या संस्कृतीतहि स्पृहणीय भर घातली व महाराष्ट्राचें '**आनंदवनभुवन**' बनविलें. या संतांचे चारित्र्य जितके निर्मल, निष्कलंक व निष्कंप तितकेंच त्यांचें कवित्व हें प्रसन्न, पवित्र व प्रभावशाली आहे. हे सर्व संत म्हणजे भागवत धर्माचें भव्यसुंदर मंदिर उभारणारे जणुं कांहीं शिल्पकारच होते. श्रीज्ञानेश्वरी, एकनाथी–भागवत व दासबोध हे तीन ग्रंथ म्हणजे '**महाराष्ट्राची प्रस्थानत्रयी**' आहे असें म्हणतां येईल. श्रीज्ञानेश्वर हे महाराष्ट्राचे सर्वमान्य गुरु असून 'ज्ञानेश्वरी' हा मराठी भाषेतील सर्वश्रेष्ठ ग्रंथ आहे. या युगांतील संत–सत्कवींच्या साहित्यांत ईश्वरावरील अचल श्रद्धा, मानवजातीवरील असीम प्रेम व ज्ञानभक्तीचें आल्हादक विवेचन–हे विशेष प्रामुख्यानें आढळतात. आधिभौतिक अभ्युदयाची अभिलाषा बाळगणाऱ्या आधुनिक चिकित्सकांनी या आध्यात्मिक काव्याचा कितीहि अधिक्षेप केला तरी सात्विक वृत्तीच्या सहृदय रसिकांना तें सदैव चित्सुखशांतिदायक वाटल्यावांचून राहणार नाहीं असा आम्हाला दृढ विश्वास वाटतो. कारण हे संतकवि केवळ शब्दसृष्टींत विहार करणारे साहित्यिक नसून तत्कालीन समाजाचे

नेते, तत्त्वज्ञ व मार्गदर्शक होते. म्हणून त्यांनीं निर्माण केलेल्या साहित्यांत त्यांचें उच्चतम व्यक्तिमत्व उत्कृष्टरीतीनें आविष्कृत झालें आहे. म्हणून महाराष्ट्राच्या या वैभवशाली वागीश्वरांनीं निर्माण केलेलें '**आध्यात्मिक युग**' हें मराठी काव्यांतील '**सुवर्णयुग**' (Golden age) आहे असें म्हटल्यास त्यांत मुळीच अतिशयोक्ति होणार नाहीं. शेवटीं, या महाराष्ट्रीय संतांनीं प्रस्थापित केलेल्या भागवतधर्माची लक्षणें ज्यांत सूत्ररूपानें सांगितलीं आहेत असें एकनाथांचें सुंदर पद उद्धृत करून या प्रकरणाची परिसमाप्ति करितों.

**सगुणचरित्रें परमपवित्रें सादर वर्णावीं ॥**
**सज्जनवृन्दें मनोभावें आधीं वंदावीं ॥ ध्रु. ॥**
**संतसंगें अंतरंगें नाम बोलावें ॥**
**कीर्तनरंगीं देवासंनिध सुखें डोलावें ।**
**भक्तिज्ञानाविरहित गोष्टी इतरां न कराव्या ।**
**प्रेमभरें वैराग्याच्या युक्ति विवराव्या ।**
**जेणेंकरुनी मूर्ति ठसावी अंतरिं श्रीहरिची ।**
**ऐशी कीर्तनमर्यादा हे संतांच्या घरची ।**
**अद्वयभजनें अखंडस्मरणें वाजवि करटाळी ।**
**एकाजनार्दनीं मुक्ति होय तात्काळीं ॥**

——o——

# प्रकरण तिसरें



## मराठी काव्यांतील अभिजात युग



Captains and conquerors leave a little dust.
And kings a dubious legend of their reign,
The swoards of Ceasars, they are less than rust,
The poet doth remain.

—Sir William Watson
( A third Book of Modern Poetry p. 86 )

मागील प्रकरणांत ' मराठी काव्यांतील आध्यात्मिक युगाचें समालोचन केलें. त्यांत मुकुंदराजापासून तो रामदासापर्यंत होऊन गेलेल्या कवींचा उहापोह केला. कोणत्याहि भाषेचें काव्य हें सरित्प्रवाहाप्रमाणें असतें. सरिता ज्याप्रमाणें निरनिराळ्या प्रदेशांमधून वहात चालली म्हणजे तिला अनेक निर्झर येऊन मिळतात व त्यायोगें तिचा प्रवाह विशाल होतो; असाच प्रकार आपणांला मराठी काव्याच्या बाबतींत झालेला आढळून येतो. मुकुंदराजापासून तो रामदासापर्यंत होऊन गेलेल्या कवींची कविता ही बव्हंशीं अखंड नामस्मरण, गोविंदगुणसंकीर्तन, सज्जनसमागम व भक्तिज्ञानविवेचन, यांतच रमलेली दिसून येते. या आध्यात्मिक युगांतील कवितेला एकाद्या सुंदर मंदिरांत, हातांत वीणा घेऊन ईश्वराचें गुणगान करण्यांत रममाण झालेल्या लावण्यवती पतिव्रतेची उपमा देतां येईल. भक्ति हा या आध्यात्मिक युगांतील काव्याचा प्रमुख विषय आहे. पण येथून भक्तिरसानें संभृत असलेल्या या काव्यकल्लोलिनींत आतां नवरसनिर्झरिणींचे प्रवाह येऊन मिसळण्याला सुरवात झाली. इतकेंच नव्हे तर मराठी भाषेची सहजसुभगता ही कमी होत जाऊन या युगांत गीर्वाणवाणीच्या ललित

विभ्रमांची रमणीयता दृष्टोत्पत्तीला यऊं लागली व संस्कृत भाषेतील गणवृत्तांच्या योजनेमुळें मराठी काव्याच्या वृत्तवैचित्र्यांतहि भर पडूं लागली. म्हणून वामनपंडितापासून तों मोरोपंतापर्यंत निर्माण झालेल्या या काव्यरचनेला 'मराठी काव्यांतील अभिजात युग असें म्हणावयास हरकत नाहीं. आध्यात्मिक युगांतील कवि हे संत होते तर आतां काव्यशास्त्रकोविद असे पंडित कवि उदयाला येऊं लागले. तथापि संतांची परंपरा अगदीच नष्ट झाली असें म्हणतां येत नाहीं. एकंदरीत या अभिजात युगांत **पंडित, संत व शाहीर** असे त्रिविध प्रकारचे कवि आढळून येतात. म्हणून आतां सोळाव्या शतकाच्या शेवटीं महाराष्ट्र साहित्यांत प्रथितयश असलेल्या वामनपंडितापासून मराठी काव्यांतील अभिजात युगाला प्रारंभ झाला असें म्हणावयाला हरकत नाहीं.

वामनपंडित यांच्याविषयी अनेक मते प्रचलित आहेत. वामन या नांवाचे किती कवि होऊन गेले यांविषयीं अनेक तर्क लढविण्यांत आले आहेत. कै. बा. अ. भिडे यांनीं 'सरस्वती-मंदिर' या मासिकांत एक विस्तृत लेख लिहून पांच वामन होऊन गेले असें आपलें मत प्रतिपादन केलें. भिडे यांनीं १. यथार्थ दीपिकाकार वामन, २. शांडिल्यगोत्री वामन, ३. वसिष्ठगोत्री वामन, ४. शृंगारप्रिय वामन- ५. यमक्या वामन असें पांच वामन कल्पिले आहेत. श्री. अजगांवकर म्हणतात: "या वामनांपैकीं दोन वामन मला खरे वाटतात. ते कोणतें म्हणाल तर (१) वसिष्ठगोत्री यर्थार्थदीपिकाकार शृंगारप्रिय वामन. (२) शांडिल्यगोत्री नृसिंहसुत यमक्या वामन. पहिलें 'वामनस्वामी' या नांवानें ओळखले जातात. परंतु ते महापंडित असल्यामुळें त्यांना पंडित असेंहि म्हणतात. दुसऱ्याचें आडनांवच पंडित होतें (महाराष्ट्र कवि चरित्र भा. १ पृ. १५९). भिडे यांना जे हे पांच वामन प्रस्थापित करावें लागले. याचें कारण 'यथार्थदीपिकाकारा' सारखा विद्वान् व वेदांती कवि राधाभुजंगासारखी

शृंगारिक काव्यें लिहिणार नाही हें होय. पण त्यांचा हा तर्क समंजसपणाचा वाटत नाही. कवीची प्रतिभा ही कामरूपिणी असल्यामुळें ती विविधरसांत सारख्याच तन्मयतेनें विहार करिते. ज्या भर्तृहरीनें वैराग्यशतक लिहिलें त्यानेंच शृंगारशतक लिहिलें नाहीं काय ? किंवा ज्या मिल्टनने 'रंगोपंत हर्षे' हें काव्य लिहिलें त्याला 'चिंतोपंत उदास' हें काव्य लिहिण्याला कोणती अडचण भासली ? प्रतिभाशाली कवि हा विविधरसात्मक काव्यें लिहिंण्यांत सारखेंच कौशल्य व्यक्त करितो म्हणून त्याची शकलें करणें हें युक्त नाही. तथापि भावे यांनी म्हटल्याप्रमाणे, "वामन कवीच्या अनेकत्वासंबंधीं अनेक मतें आहेत. त्या सर्वांमध्ये 'यथार्थदीपिकाकार' वामन पंडित व श्लोकबद्धरचना करणारा वामन पंडित हे अगदीं दोन भिन्न पुरुष आहेत या मुद्यासंबंधी एकवाक्यता आहे. पण असें मानण्यास कांहीं विशेष पुरावा दिसत नाही. किंबहुना आहे तो पुरावा थोडासा उलट बाजूचा दिसतो. म्हणजे तो पाहून गोड यमकांची सुंदर श्लोकबद्ध रचना करणाऱ्यानेंच 'यथार्थदीपिका' रचिली असें मनाला वाटतें (महाराष्ट्र–सारस्वत भा. २. पृ. ६६). श्री. भावे याचे मत समर्पक आहे. म्हणून वामनाची द्विधा, पंचधा अशीं शकलें करण्यापेक्षां त्याचें अद्वैत कल्पिणें हेंच योग्य होय. श्री. राजवाडे यांनी वामनासंबंधीं पुढील माहिती दिली आहे: "वामन राहणारा मुळचा विजापुरचा; ऋग्वेदी वसिष्ठगोत्री ब्राह्मण, उपनांव शेषे, बापाचें नांव नरसिंह व आईचें नांव लक्ष्मी, पत्नीचें नांव गिराबाई. याचा विद्याभ्यास काशीस झाला. याचा गुरु सच्चिदानंद, मूळ पंथ माध्व, कुटुंबमत अद्वैत, गुरूपदेशानंतर अद्वैत. त्यानें कोरेगांवीं नारायणाचें देऊळ व मठ बांधला. वामन शके १६१७ त समाधिस्थ झाला." सारांश, वामन पंडितासारख्या अव्वल दर्जाच्या कविचरित्रमंदिरांत इतका अंधार पसरलेला पाहून कुणालाहि विषाद वाटल्यावांचून राहणार नाहीं.

वामनपंडिताच्या ठिकाणीं विद्वत्त्व आणि कवित्व यांचा सुंदर

संगम झाला होता. किंबहुना प्राचीन कवींत पंडित हें अभिधान यथार्थतेनें जर कुणाला लागू पडत असेल तर तें वामनांनाच होय. त्यांनीं वेदांतपर, सर्वस्वी भाषांतरित व पौराणिक अशी तीन प्रकारची काव्यरचना केली आहे. त्यांच्या वेदांतपर ग्रंथांपैकीं 'यथार्थदीपिका' या ग्रंथाचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. 'यथार्थदीपिका' हा ग्रंथ गीतेवरील टीकारूप असून त्याची ओवीसंख्या बावीस हजार आहे. ज्ञानेश्वरांच्या 'भावार्थदीपिके'वर कटाक्ष ठेवून 'यथार्थदीपिका' लिहिली असावी हें उघड दिसतें. ज्ञानेश्वरांनीं गीतेचा भावार्थ सांगितला तर मी यथार्थ सांगतों असा अभिनिवेश नांवांतच दिसून येतो. 'भावार्थ दीपिकें'त जितका प्रतिभाविलास तितकाच यथार्थदीपिकेंत पांडित्यप्रकर्ष आढळतो. 'यथार्थदीपिकेंत' विद्वत्तेचें वैभव अमूप असलें तरी काव्याचें सौंदर्य मुळींच आढळत नाहीं. कै. बा अ. भिडे यांनीं म्हटल्याप्रमाणें 'या ग्रंथाची वाक्यरचना इतकी सरळ व बिनधोक आहे कीं, ती बहुतेक गद्यासारखीच भासते. किंबहुना गद्यग्रंथ लिहिण्याचा पंडितांच्या वेळीं प्रघात असतां तर त्यांनीं आपली 'दीपिका' गद्यरूपानेंच प्रगट केली असती. या ग्रंथांत पंडितांची चतुरस्रता, व्यवहारज्ञान, निस्पृहता व सत्याभिमान हे गुण स्पष्ट दिसतात व भागवतधर्मावरील अचल निष्ठा सर्वत्र बिंबली आहे ( वि. ज्ञा. वि. सन १९२२ पृ. ८५ ). म्हणून भावार्थदीपिका ही काव्यश्रीच्या ललितविलासांनीं चंद्रिकेप्रमाणें प्रसन्न वाटते तर यथार्थदीपिका ही पांडित्याच्या परमोत्कर्षामुळें चंडातपाप्रमाणें प्रखर वाटते. यथार्थदीपिकेशिवाय वामनपंडितांनीं निगमसार ब्रह्मस्तुति, अपरोक्षानुभूति, कर्मतत्त्व, बालसुधा, शुकाष्टक, ध्यानमाला, भक्तिमहिमा, चरमगुरुमंजरी, गीतार्णवसुधा इत्यादि काव्यें लिहिलीं आहेत. सर्वस्वी भाषांतरित ग्रंथांपैकीं – समश्लोकी गीता, गंगालहरी भर्तृहरीचीं तीन शतकें यांचा उल्लेख करितां येईल. पण वामनपंडितांची

खरी काव्यकीर्ति त्यांच्या पौराणिक विशेषतः भागवती प्रकरणांवर अवलंबून आहे व ते परम कृष्णभक्त असल्याने त्यांची श्रीकृष्णाच्या ललितविलासा-वरील काव्यें चारुमनोहर वाटतात.' या काव्यांतील यमकानुप्रास-मंडित अशा सुश्लिष्ट श्लोक रचनेवरूनच त्यांची 'सुश्लोक वामनाचा' ही कीर्ति सुप्रतिष्ठित झाली आहे. सारांश वामनपंडितांनीं वेदांताच्या दीप्तीनें झळकणारें कवित्वाचें रत्न विद्वत्तेच्या कोंदणांत बसविण्याचें प्रशंसनीय चातुर्य प्रगट केलें आहे.

वामनपंडितानंतर सामराजाचा प्रारंभी उल्लेख केला पाहिजे. राजोपाध्ये यांच्या मुद्गलाख्यानाच्या प्रस्तावनेंतून सामराजासंबंधीं जी ऐति-हासिक माहिती देण्यांत आली आहे तेवढाच या कवीच्या स्थलकाला-संबधीचा पुरावा उपलब्ध आहे. शामभट ऊर्फ सामराज हा प्रथम मालोजीच्या कारकीर्दींत आपल्या वडिलाबरोबर खानदेश, नगर, सातारा वगैरे प्रांतीं फिरत असावा. पुढें आपले वडील बंधु मल्हारभट यांचे-बरोबर तो शहाजी महाराजांच्या दरबारीं असावा व तेथेंहि शहाजीच्या पश्चात् मल्हारभट्टाबरोबरच शिवाजी महाराजांकडे आला असावा असें अनुमान काढण्यांत आलें आहे. पुढें राजारामाबरोबर तो सिंहगडास राहिला व तेथें राजाराम कैलासवासी झाला त्या सुमारास शामभट्टहि निवर्तला असे राजोपाध्ये म्हणतात. यावरून सामराज हा कोल्हापूर प्रांतीं किंवा पन्हाळ्यावर बराच काळ राहिल्यामुळें त्यांस 'पन्हाळकर' असें उपनांव दिलें गेलें असावें [ प्रा. पंगु. सामराज प्र. पृ. १०३ ]. सामराजाचा काल ठरवितांना प्र. धों. कानिटकरांनीं अंतर्बाह्य पुराव्याची छाननी करून 'सामराज' हा एकनाथ व लोलिंबराज यांच्या उत्तरकालीन तुकाराम, समर्थ, नागेश, जयराम, परमानंद व वामन यांच्या समकालीन व बेणाबाई, विठ्ठल, आनंदतनय यांच्या पूर्वकालीन होय असा निष्कर्ष काढला आहे. या दोन्ही विद्वानांच्या मतांचा विस्तृत उहापोह करून प्रा. पंगु

यांनीं शके १५३० ते १६१० हा सामराजाचा सर्वसाधारण काळ ठरविला आहे [सामराज प्र. पृ. १०९]. सामराज हा व्युत्पन्न, रसिक व व्यवहारचतुर होता. त्याने संस्कृत-साहित्य-सरितेंत अवगाहन केलें असून देशाटनहि केलें असावें असें वाटतें. सामराजानें 'मुद्गलाख्यान' व 'रुक्मिणीहरण' हीं दोन काव्ये लिहिली आहेत. मुद्गलाची श्लोकसंख्या २६१ असून शेवटचा श्लोक नकलकाराचा आहे. हे आख्यान कवीनें जैमिनी अश्वमेधाच्या शेवटच्या प्रकरणांतील नकुलाख्यान, महाभारत, वनपर्व अध्याय २६०–६१ यांतील मुद्गलोपाख्यान व पद्मपुराणांतर्गत भीमामहात्म्यांतील मौद्गलतीर्थ-वर्णन, या ग्रंथांवरून रचिले आहे. मुद्गलोपाख्यानापेक्षांहि त्याचें 'रुक्मिणी-हरण' हें काव्य रमणीय आहे. रुक्मिणी स्वयंवराची कथा इतकी लोकप्रिय व ललितहृद्य आहे कीं त्यावर १५–१६ कवींनीं काव्ये लिहिली आहेत. सामराजानें 'रुक्मिणी हरण' हें काव्य संस्कृत महाकाव्याचा आदर्श डोळ्यापुढें ठेवून लिहिलें आहे. या काव्याचें आठ सर्ग असून त्याची श्लोक संख्या ११४० आहे. रसाविष्कार, अलंकारवैभव, स्वभावपरिपोष, वर्णन-कौशल्य व भाषासौष्ठव या दृष्टीनें हें महाकाव्य सरसमनोहर आहे. संस्कृत महाकाव्याची इत्थंभूत लक्षणें याच्याइतकीं दुसऱ्या कोणत्याहि कवीनें आपल्या काव्यांत उतरविलीं नाहींत. अशा स्थितींत महाराष्ट्राचा एकमेव आद्य महाकवि अशी पदवी महाराष्ट्रीय रसिक एकमुखानें बहाल करतील यांत तिळमात्र शंका नाहीं असे प्रा. पंगु यांनीं आपलें मत व्यक्त केलें आहे.

वामन-सामराजाप्रमाणें श्लोकबद्ध काव्यरचना करणाऱ्या कवींत नागेशाचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. नागेश हा अहमदनगराजवळील भिंगार येथील राहणारा. याचें उपनांव मुळे. यानें आपल्या 'चंद्रावळी' या काव्यांत आपल्या मातापितरांचीं अनुक्रमें जानकी व मोरजोशी अशीं नांवें दिलीं आहेत आणि आपल्या बंधूंचीं नांवें मल्हार व त्र्यंबक अशीं दिलीं आहेत. कोणा कोकाट्या यशवंतराव नांवाच्या श्रीमंताचा हा आश्रित

होता. आणि भिंगारसारख्या कुग्रामवस्तींत याचा काळ गेला असावा म्हणून याच्या काव्यांत असंस्कृत अभिरुचीचा पुष्कळ ठिकाणीं अतिरेक झाला आहे. नागेशाचें 'सीतास्वयंवर' हें काव्य प्रसिद्ध आहे. प्रा. पंगु म्हणतात: त्याचें काव्य सर्गबद्ध नाहीं म्हणून त्याला महाकवि म्हणतां आलें नाहीं तरी सृष्टिवर्णनें, नायक-नायिकांची स्वभाववर्णनें व नवरसांचा परिपोष इत्यादी-वरून पहातां त्यास महाकवीची पदवी बहाल करण्यास हरकत नाहीं असें म्हणावेसें वाटतें. महाकाव्यरचनचे ध्येय त्यानें आपल्यापुढें ठेविलें नव्हतें. नाहींतर असे एकादें महाकाव्य रचण्याची पात्रता त्यानें येथें सिद्ध केली आहे [ना. सी. स्व. प्र. पृ. ३७]. नागेशानें 'रुक्मिणीस्वयंवर,' 'रसमंजरी' आणि 'शारदाविनोद' हीं तीन काव्यें लिहिली आहेत. एके-काळीं नागशाचें पुष्कळश्लोक हरदासांच्या रसनाग्रावर नर्तन करीत असत. नागेशाच्या ठिकाणीं विनय, आत्मविश्वास, विनोद हे गुण त्याच्या काव्या-वरून दिसतात. त्यानें संस्कृत साहित्याचा सूक्ष्म अभ्यास केला असून त्याच्या ठिकाणीं इतर शास्त्रांतील अभ्यासामुळें चांगली बहुश्रुतता प्रत्ययाला येते. सारांश, नागेशाच्या काव्यांत, वामनपंडितांची वेदांतप्रवणता, साम-राजाची रसवत्ता, विठ्ठलाची चमत्कृतिपरता, आनंदतनयांची भक्त्युत्कटता व रघुनाथ पंडिताची प्रतिभोज्ज्वलता नसली तरी त्यानें आपल्या अक्षरगणा-त्मक व यमकानुप्रासमंडित काव्यरचनेनें मराठी काव्यांतील अभिजात युगा-च्या प्रगतीला स्पृहणीय हातभार लावला आहे.

नागेशाप्रमाणेंच अक्षरगणात्मक काव्यरचना करणाऱ्या कवींत विठ्ठलाचीहि गणना होते. मराठी भाषेंत विठ्ठल या नांवाचे चार पांच भिन्न कवि होऊन गेले. त्यांपैकीं विठ्ठल दीक्षित, विठ्ठल केरोकर व आणखी एक विठ्ठल यांची कविता काव्यसंग्रहांत छापली आहे. तसेंच विठ्ठल कळपूरकर हाहि एक कवि होऊन गेला. तथापि या चार विठ्ठलापेक्षां विठ्ठल बीडकर हा कवि अधिक परिचित आहे. विठ्ठल हा बीडजवळील

गौरीपूर या गांवचा राहणारा. याचें सगळें नांव विठ्ठल अनंत क्षीरसागर हें असून त्याचें गोत्र कौशिक हें होतें. त्याचा धंदा व्यापाराचा असून तो दरवर्षीं पंढरीची वारी करीत असे. विठ्ठल हें त्याचें कुलदैवत होतें. विठ्ठल बिडकरानें रुक्मिणीविलास, पांचालीस्तवन, द्रौपदी वस्त्रहरण, विद्वज्जीवन, रसमंजरी व बिल्हण चरित्र ही सात काव्यें लिहिलीं आहेत. विठ्ठलानें काव्यशास्त्राचें सूक्ष्म अध्ययन केलें असावें असें त्याच्या काव्यांवरून दिसतें. यानें 'सीतास्वयंवर', 'रुक्मिणी स्वयंवर' व 'विद्वज्जीवन' यांची सर्गात्मक रचना केली आहे. याच्या कवितेंत स्फूर्तीचे सहज विलास क्वचितच आढळत असून पुष्कळ ठिकाणीं कृत्रिमतेचा कळस झाला आहे. चित्रकाव्यरचनाचातुर्य व छंदःशास्त्रनैपुण्य यांचें प्रदर्शन करण्याच्या अतिरिक्त हव्यासामुळें त्याच्या काव्याचें स्वरूप एकाद्या संगमरवरी पुतळ्याप्रमाणें प्रेक्षणीय भासलें तरी सचेतन वाटत नाहीं. यामुळें विठ्ठलाचें काव्य कितीहि चमत्कृतिजनक असलें तरी चित्ताल्हादक वाटत नाहीं. सुभाषितकारानें म्हटलेंच आहे : " **किं कवयस्तस्य काव्येन किं काण्डेन धनुष्मतः । परस्य हृदये लग्नं न घूर्णयति यच्छिरः** " तें कवीचें काव्य काय कामाचें, तो तिरंदाजाचा तीर काय कामाचा कीं जो हृदयाशीं येऊन धडकला असतां मुरकुंडी वळत नाहीं? विठ्ठलाच्या काव्यांत निरनिराळीं वृत्तें, बंध, यमकें व अलंकार इत्यादि गुण विपुलतेनें असले तरी काव्याचा आत्मा जो रस त्याचा क्वचितच अढळ होतो. म्हणून त्याची कविता विशेष लोकप्रिय झाली नाहीं व त्याला—

जिव्हे तूं नटवी तुझे अनुभवी श्रीमंत सन्मानवी ।
होती लुब्ध परंतु एकहि तुला कोणीच ना गौरवी ॥
सत्कीर्ती बरवी जगांत मुरवी, व्युत्पन्नता डोलवी ।
सत्संगें नटवी पवित्र पदवी देशील ज्या सत्कवी ॥

असें करुणोद्गार काढावे लागले. विठ्ठलाची 'सौंदर्यलहरी' व 'रसमंजरी'

हीं काव्ये भाषांतरित आहेत. तात्पर्य विठ्ठलानें संस्कृत गणवृत्तात्मक रचनेनें चमत्कृतिजनक व चित्रकाव्यात्मक काव्यभांडारांत भर घातली यांत शंका नाहीं.

नागेश व विठ्ठल यांच्यानंतर आपण आतां रामदासांच्या संप्रदायांतील कांहीं कवींचा उल्लेख करूं. रामदासांच्या संप्रदायांतील देवदास हा उल्लेखनीय आहे. देवदास हा ' दादेगांव ' येथील मठाधिपति होता. त्यानें श्लोक, अभंग, अष्टके इत्यादि काव्यरचना केली आहे. देवदासानें गजेंद्र-मोक्षाची कथा चोवीस श्लोकांत सांगितली आहे. याशिवाय आणखी एक देवदास प्रसिद्ध आहे. हा चैतन्यशिष्य असून गिरीचा व्यंकटेश हें त्याचें दैवत होतें. आपले कुलदैवत जो व्यंकटेश त्यावर याने ' व्यंकटेश स्तोत्र ' रचिलें आहे. देवदासाप्रमाणें मुकुंद या नांवाचे दोन कवि होऊन गेले आहेत. एक दत्तपादांकित मुकुंद व दुसरा सातारकर ताराबाईचा आश्रित मुकुंद. दत्तपादांकित मुकुंदानें संसाराला त्रासून तीर्थयात्रा केली व या तीर्थयात्रेचें वर्णन केलें आहे. मुकुंद हा बहुभाषाकोविद होता. त्याने ब्रज, नेमाडी, अभीर इत्यादि भाषेत कविता लिहिली आहे. दुसऱ्या मुकुंदानें एक ' संतमालिका ' लिहिली असून कांहीं स्तोत्रें व अष्टके रचिलीं आहेत. या दोन मुकुंदापेक्षां अवचितसुतकाशी हा अधिक प्रसिद्ध आहे. या कवीचा बाप भारम गांवचा देशमुख असून तो चंद्रवंशी क्षत्रिय होता. देशमुखीचें काम कांहीं दिवस केल्यावर अवचितरावानें एक गांव वसविलें व त्याचें नांव भारम असें ठेविलें. त्याला दोन मुलगे होते. एक त्रिंबक व दुसऱ्याचें नांव काशी. काशी हाच अवचितसुत काशी या नांवानें परिचित आहे. काशी कवीनें ' द्रौपदीस्वयंवर ' हा प्रसादसुंदर ग्रंथ लिहिला आहे. या ओवीबद्ध काव्याप्रमाणेंच त्यानें श्लोकबद्ध 'द्रौपदीस्वयंवरहि' लिहिलें आहे. ओवीबद्ध द्रौपदीस्वयंवराचे २९ अध्याय असून श्लोकबद्ध द्रौपदीस्वयंवराचे १४ अध्याय आहेत. हा कवि महानुभवपंथीय असल्यानें त्या पंथांत या

कवीला मान आहे. हे दोन्ही ग्रंथ महाभारताचा आदिपर्व व कथाकल्पतरु या ग्रंथांच्या आधारानें लिहिले आहेत. केवळ द्रौपदीस्वयंवराच्या कथानकावर त्यानें चार हजार ओव्यांचें काव्य लिहिलें यावरून त्याचें काव्यविरचन-कौशल्य दृग्गोचर होतें. याच सुमाराला जयराम या नांवाचा एक कवि होऊन गेला. त्याने श्लोक, पदे, अभंग, अष्टकें अशी विविध रचना केली आहे. या कवीच्या समकालीन असणारा शिवरामस्वामी कल्याणकर यांचा अवश्य उल्लेख केला पाहिजे. शिवरामस्वामींनी प्रचंड ग्रंथरचना निर्माण केली आहे. शिवरामस्वामींची वृत्ति प्रथमपासून भक्तिपर होती व केशवस्वामी भागानगरकर यांचा त्यांच्यावर लोभ होता. त्यांनी 'गंडिकाख्यान', 'नानासाहेब पेशव्यास उपदेश,' पदे, मुद्रिका, रामजन्मकटाव, हस्तामलकाचें भाषांतर, शुकांक, उद्बोधदीपिका इत्यादि अनेक ग्रंथ लिहिले आहेत.

याच सुमाराला दक्षिणहिंदुस्थानांत मराठी भाषेचा प्रसार होत होता. मराठे तंजावरकडे गेले त्यावेळी त्यांची भाषाहि तिकडे गेली. महाराष्ट्रांतून मराठे सरदार तिकडे जात त्यावेळीं त्यांच्याबरोबर सर्व पेशांची मंडळी तिकडे जात असत आणि त्यामुळे त्या त्या प्रांतांत मराठी भाषेचा स्वाभाविक प्रसार होत असे. शहाजीराजे हे प्रथम चंदीचंदावराकडे गेले तेव्हां त्यांच्याबरोबर महाराष्ट्रांतील अनेक कुटुंबे तिकडे गेली होतीं. शहाजीनंतर शिवाजीराजे चंदावरास गेले त्यावेळीं रामदासांनीं आपल्या शिष्यवर्गापैकीं भीमस्वामी, राघवस्वामी वगैरे शिष्य तिकडे पाठविले. भीमस्वामींचीं कांहीं पदे उपलब्ध असून त्यांनीं श्रीरामदास स्वामींचें एक लहानसें चरित्र लिहिलें आहे. या भीमस्वामींच्या बरोबर तंजावर प्रांतांत गेलेले दुसरे शिष्य अनंतस्वामी व राघवस्वामी हे होत. यांपैकीं अनंतस्वामींचा शिष्य मेरुस्वामी याने भीमोपदेश, स्वानंदलहरी, अनुभवसार हे ग्रंथ लिहिले आहेत. त्याचप्रमाणे राघवस्वामींचा शिष्य माधव यानें एक श्लोकबद्ध रामायण, ओवीबद्ध रामायण, योगवाशिष्ठ, गणेशपुराण, विष्णुपुराण, अश्वमेध हे ग्रंथ

लिहिले. महाभारताच्या १८ पर्वांवर याने ओवीबद्ध रचना केली आहे. माधवकवीने हा प्रचंड ग्रंथ कावेरी नदीच्या कांठी गौरीमयूर या गांवीं श्रीरघुनाथासमोर बसून लिहिला. सारांश, माधव हा बहुप्रसू (voluminous) ग्रंथकार होता. रामदासस्वामींनीं तंजावर प्रांतांत जे शिष्य पाठविले त्यांत अनंतकवि प्रसिद्ध आहे. हा अनंतकवि मुळचा सातारा जिल्ह्यांतील 'मेथवड' या गांवचा राहाणारा. तो रामदाससंप्रदायी असूनहि विठ्ठलभक्त होता व नेहमीं पंढरीची वारी करीत असे. यावरून हल्ली कांहीं जण समजतात त्याप्रमाणें या दोन संप्रदायांत विरोध नव्हता हे दिसून येते. त्याने 'सुलोचना गंहिवर', 'सुलोचनाख्यान' व 'रामदासस्तुति' हीं प्रकरणे लिहिलीं आहेत. याची सुमारें १५०० कविता उपलब्ध आहे. अनंतकवीने सुमारे पन्नासवर्षें काव्यरचना केली असल्यानें यापेक्षांहि अधिक कविता लिहिली असावी. सारांश, या परिच्छेदांत उल्लेखित केलेल्या कवींची कविता काव्यगुणांच्या दृष्टीने फारशी वरच्या दर्जाची आहे असें म्हणवत नाहीं.

अनंताच्या समकालीन असणाऱ्या 'आनंदतनय' या प्रसिद्ध कवीबद्दल उहापोह करणे आतां क्रमप्राप्त आहे. शिवाजीला कैद करण्यासाठीं विजापुरच्या बादशहानें भास्कर या पुरुषाची योजना केली होती; व या कामगिरीबद्दल त्याला 'आरणी' हा गांव इनाम करून दिला. त्यावेळीं भास्कराबरोबर आनंदतनयाचा बाप आनंदराव त्याच्याबरोबर गेला होता. आनंदरावाचा मुलगा 'गोपाळ' हा आपणाला 'आनंदतनय' असें म्हणवितो. यानें आपणाला एके ठिकाणीं 'आरणीचा शिपाई' असें म्हटलें आहे; यावरून समर व साहित्य या दोन्ही विद्येंत तो प्रवीण असावा असें वाटतें. त्याच्या गुरूचें नांव 'मुरारपरब्रह्म' हें असून या कविचा निधनकाल शके १६४५ असा भक्तमंजिरींत दिला आहे. सीतास्वयंवर, पूतनावध, सुदामचरित्र, इत्यादि काव्यें त्यानें लिहिलीं आहेत. आनंदतनयानें रामायण व भागवत यांतील लोकप्रिय कथानकांवर यमकानुप्रासमंडित अशी

सुश्लिष्ट काव्यरचना केल्यामुळे ती कीर्तनकारांना विशेष प्रिय होती. कीर्तनकार हे आपल्या कीर्तनांत रंग भरण्यासाठीं या कवीच्या नादमधुर श्लोकांचा नेहमी उपयोग करीत असत. श्री. भावे यांनीं म्हटल्याप्रमाणें "म्हणून याची काव्यें विद्यासंपन्न सहृदय वाचकांपेक्षां कथेकरी हरदासांनाच्च अधिक उपयोगी आहेत. किंबहुना याची कविता ही हरिदासाची एक अन्न-दात्री कामधेनु आहे [म.सा. भा. २ पृ. १०५]." वामनपंडिताप्रमाणेच आनंदतनयाचेहि व्याकरणशुद्धतेकडे फार दुर्लक्ष आढळून येते. तथापि मोरोपंतांनीं 'आनंदतनय अरणीकर शोभवि कवन बहुत यमकाहि' असा त्याचा गौरव केला आहे. नागेशाप्रमाणें या कवीनें सदभिरुचीचें उल्लंघन फारसे केलेले नाही. यामुळे नागेश, विठ्ठल, अनंत यांच्यापेक्षां आनंदतनयाची कविता हृदयंगम असल्यामुळे अधिक आनंददायक वाटते.

आनंदतनयापेक्षां रघुनाथपंडित हे अधिक श्रेष्ठ कवि होऊन गेले. किंब-हुना प्राचीन कविपंचकांत त्यांना स्थान द्यावें लागेल. अत्यंत अल्प काव्यरचना करून असामान्य कीर्ति संपादन केलेल्या अभिजात कवींत रघुनाथपंडित हे अग्रेसर आहेत. कारण वाङ्मयविश्वांत संख्येपेक्षां सौंदर्याला, विपुलतेपेक्षां विलोभनीयतेला व पांडित्यापेक्षां प्रतिभेला अधिक मान दिला जातो. रघुनाथपंडित हे सानसुंदर काव्यमंदिर उभारणारे शिल्पीकवि होते तथापि अशा या विख्यात वागीशाच्या चरित्राविषयी अनेक मतें आढळतात. श्री. प्रियोळकरांनी रघुनाथपंडितांना केरोमंडल किनाऱ्यावरील तंजावरचा ठरवि-लेला आहे. त्याचप्रमाणें त्यांनीं पंडितराव बखरीच्या आधारें व समर्थांच्या पत्राच्या आधारें रघुनाथपंडित हा शिवाजीच्या अष्टप्रधानांपैकीं म्हणजे पंडितरावपद धारण करणारा असून त्यांच्या वडिलांचें नांव गणेश, त्यांचें अडनांव नवहस्त आणि गोत्र वसिष्ठ असें ठरविलें आहे. श्री. शणै गोयबाब यांनीं रघुनाथपंडितास मलबार किनाऱ्यावरील कुमठाकारवारजवळच्या चंदावर गांवचा ठरविला आहे. प्रा. पंगु यांनीं रघुनाथ नारायण हणमंते

हा नलोपाख्यानाचा कर्ता आहे अशी आपली कल्पना सांगितली आहे. [ लो. शि. १९३१ पृ. ७१६–७१७ ] श्री. गो. रा. राजोपाध्ये यांना प्रा. पंगु यांचें मत मान्य नाहीं. रघुनाथ नारायण हणमंते याच्या हातून नलोपाख्यान व गजेंद्रमोक्ष अशीं प्रणयरम्य व करुणकोमल काव्यें लिहिलीं जाणे शक्य नाहीं म्हणून रघुनाथ पंडितराव हाच या काव्यांचा कर्ता होय असे मानणे समुचित आहे असे राजोपाध्ये यांचे मत आहे [ लो. शि. १९३१ पृ. ८३९ ]. रघुनाथपंडित व आनंदतनय हे व्याही व्याही होते ही जुनी आख्यायिका उपलब्ध आहेच. अशा रीतीनें रघुनाथ पंडितांच्या चरित्राविषयीं अनेक तर्ककुतर्कांचें जाल पसरले असले तरी त्यांची नलोपाख्यान, गजेंद्रमोक्ष व रामदासवर्णन हीं तीन काव्ये श्रुतिमनोहर आहेत. विशेषतः 'नलोपाख्यान' हें त्यांचें नितांतरमणीय काव्य हें जणुं कांही रघुनाथ पंडितांच्या प्रतिभारूपी कनक–लतिकेवर प्रफुल्लित झालेली रत्नकालिका आहे असें म्हटल्यास त्यांत मुळींच अतिशयोक्ति होणार नाहीं.

येथपर्यंत दक्षिण हिंदुस्थानांतील कवींचा विचार झाला. आतां शाहू महाराजांच्या वेळीं होऊन गेलेल्या कवींचा विचार करूं. शाहू महाराजांच्या वेळीं जे कवि होऊन गेले त्या सर्वांत कचेश्वर व निरंजनमाधव हे दोन कवि अधिक प्रसिद्ध आहेत. कचेश्वर हे पुणे जिल्ह्यांत खेड तालुक्यांतील चाकण गांवीं एका वैदिक ब्राह्मणाच्या घरीं जन्मले. हे मोठे तपस्वी असून चाकणच्या रानांत आश्रम बांधून मुलाबाळांसह अयाचित वृत्तीनें रहात असत. शाहूमहाराजांनीं त्यांचा उपदेश घेतल्यामुळें लोक त्यांना ' राजगुरु ' असें म्हणावयाला लागले. साताऱ्यास कांहीं वर्षे राहिल्यावर ते कृष्णातीरीं उंब्रज येथें येऊन राहिले. कचेश्वरांचीं सुदामचरित्र, गजेंद्रमोक्ष, द्रौपदीवस्त्रहरण इत्यादि काव्य रचना प्रसिद्ध आहे. त्यांच्या काव्यांत वृत्तसुखार्थ शब्दांची ओढाताण झाली असून त्यांची कविता मध्यमप्रतीची आहे. कचेश्वरापेक्षां निरंजनमाधवाची कविता अधिक वरच्या दर्जाची आहे. निरंजन-

माधव हे केवळ भगवद्भक्त कवि नसून राजकारणकोविद कवि होते. त्यांच्या पित्याचें नांव महादेव बनाजी व आईचें नांव भागीरथी होतें. हे इ. स. १७०० ते १७९० या कालांत होऊन गेले. यांचा जन्म १७०५ च्या सुमारास कंचीप्रांतीं वेगवती नदीतीरी पक्षितीर्थासमीप झाला. निरंजनमाधव हे राजकार्यनिपुण असूनहि त्यांनीं संस्कृत, मराठी, कानडी व हिंदुस्थानी या चार भाषांचे उत्तम अध्ययन केलें होते. त्यांनीं आपली पत्नी जी गंगादेवी तिच्यासाठीं 'सांप्रदायपरिमळ' हा ग्रंथ लिहिला. त्यांनीं 'कृष्णानंदसिंधु' चिद्बोधरामायण किंवा निरंजनरामायण, ज्ञानेश्वरविजय, ज्ञानेश्वरसमाधी, रामकर्णामृत, इत्यादि अनेक ग्रंथ लिहिले. त्याशिवाय ते छंदशास्त्रप्रवीण असल्याने त्यांनीं 'वृत्तमुक्तावलि', 'वृत्तवनमाला' व वृत्तावतंस' हे छंदःशास्त्रावर ग्रंथ लिहिले. त्यांना 'स्तोत्र–कवि' असे म्हणावयास हरकत नाहीं. सारांश, निरंजनमाधवांच्या काव्यांत कवित्वगुण किंचित् कमी असला तरी या बहुश्रुत, बहुभाषाकोविद, व्यवहारचतुर व वेदांतमर्मज्ञ असा हा कवि कुणालाहि आदरणीय वाटल्यावांचून राहणार नाहीं.

निरंजनमाधवाने स्तोत्ररचनेकडे लक्ष पुरविलें तर श्रीमत्कृष्ण दयार्णव यांनीं श्रीमद्भागवताच्या दशमस्कंधावर विस्तृत टीका केली आहे. कृष्ण-दयार्णव हे दुःखी व दुर्दैवी कवि होते. पण मानवजातीला निरंतर उत्फुल्ल करणारी काव्यकमलिनी ही दुःखरूपी पंकांतच निर्माण झालेली आढळते. डॉ. ब्रिजिस (Bridges) यांनीं आपल्या 'कोकिळा' (Nightingales) या कवितेंत हीच कल्पना ध्वनित केली आहे. कृष्णदयार्णवाच्या पित्याचें नांव नारायण व आईचे नांव बहिणादेवी. त्यांचे मुळचें नांव नरहरि असून त्यांच्या पित्यानें लहानपणींच त्यांना वेदांचें शिक्षण दिलें. त्यावेळीं यवन व मराठे यांच्या धुमश्चक्रीची त्यांना झळ लागली व त्यांच्या संसाराची वाताहत झाली. पुढें त्यांना रक्तपितीची व्यथा जडली व अशा सर्वस्वी प्रतिकूल परीस्थितींत त्यांनीं 'हरिवरदा' हा ग्रंथ लिहिण्याला प्रारंभ केला या ग्रंथाची

ओवी संख्या ५२००० असून त्याचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग आहेत. 'हरिवरदा' हा ग्रंथ मराठी भाषेत उल्लेखनीय आहे. त्यांची भाषा प्रसादयुक्त असून वर्णनशैली प्रसन्न आहे. महामहोपाध्याय भीमाचार्य झळकीकर यांनीं म्हटल्याप्रमाणें "श्रीमत् शंकराचार्यांच्या अद्वैत मायावाद शास्त्रानुसार असून ग्रंथ फार उत्तम आहे" (महाराष्ट्र-कवि चरित्र-भा. ३ पृ. २७८). कृष्णदयार्णवांनीं 'तन्मयानंदबोध' हा अध्यात्मिक ग्रंथ लिहिला असून त्यांनी कांही पदेहि लिहिलीं आहेत.

कृष्णदयार्णवानंतर आपणांला मराठी भाषेतील अत्यंत प्रेमळ व प्रासादिक अशा एका कवीकडे वळावयाचे आहे. हे कवि म्हणजे श्रीधर हे होत. ज्ञानेश्वर व तुकाराम हे कवि वगळले असतां त्यांच्या इतकी लोकप्रियता दुसऱ्या कोणत्याहि कवीला लाभलेली नाहीं. श्रीधर हे मुक्तेश्वराच्या रसात्मक काव्यरचनेच्या परंपरेतील प्रमुख कवि होत. त्यांच्या पित्याचें नांव ब्रह्मानंद, आईचे सावित्री व पत्नीचे पार्वती. यांनी पूर्ववयांतच संन्यासदीक्षा घेतली असा तर्क आहे. त्यांनी महाभारत, रामायण व भागवत या तीन ग्रंथांवर देशीकार लेणें चढविलें आहे व त्यांची रसवंती हृदयंगम असल्यामुळें त्यांच्या ओवीबद्ध ग्रंथांना पराकाष्ठेची मनोज्ञता व मोहकता लाभली आहे. त्यांनीं हरिविजय, रामविजय, वेदांतसूर्य व पांडवप्रताप हे प्रमुख ग्रंथ लिहिले. 'पांडवप्रताप' या ग्रंथांत पांडवांचा प्रताप तेवढाच वर्णन केला आहे. हा ग्रंथ त्यांच्या प्रतिभेचा व परिश्रमाचा चिरंतन स्मारक आहे. मराठी भाषेत महाभारतावर नामाविष्णुदास, माधवस्वामी, गोपाळ, नरहरी प्रभुति कविनीं ग्रंथरचना केली आहे. त्यांत मुक्तेश्वर, श्रीधर व मोरोपंत यांची कविता आल्हादप्रद आहे. 'पांडवप्रतापा'नंतर त्यांनीं 'शिवलीलामृत' हा ग्रंथ लिहिला व नंतर 'जैमिनीअश्वमेध' हा ग्रंथ रचिला. सारांश श्रीधरांनी आपलें सर्व जीवन शारदोपासनेंत घालवून महाराष्ट्रभारतीच्या रत्नभांडारांत बहुमोल भर घातलीं. मुक्तेश्वरांच्या

काव्यांतील प्रतिभाविलास श्रीधरांत नसला तरी प्रसादरम्यता त्यांत ओत-प्रोत भरली आहे. मुक्तेश्वरांची प्रतिभा गरुडाप्रमाणे गगनविहारी असून श्रीधरांची प्रतिभा शुकाप्रमाणें मधुर शब्द बोलते. विविधरसांचें सुंदर आविष्करण करण्याचें श्रीधरांचें कौशल्य अनुपम आहे. कल्पकता व कलात्मकता हे मुक्तेश्वरी काव्याचे तर माधुर्य व मार्दव हे श्रीधरी काव्याचे विशेष आहेत. श्रीधरांची वाणी ही रसतरंगिणी असल्यामुळे तिची मोहिनी कमी होण्याची फारशी भीति नाहीं. कारण पंडितापेक्षां रसनिर्माता हा मानव जातीला अधिक उपकारकर्ता वाटतो व पांडित्यप्रचुर ग्रंथापेक्षां रसनिर्भर ग्रंथच कालावर मात करून आनंदाचे निकेतन ठरत असतात. म्हणून श्रीधर हे रससिद्ध कवि असल्यामुळें त्यांच्या काव्यलीलामृतांचे आदरानें प्राशन करणाऱ्या रसिकांना त्यांच्या ‘ विजयसंपदेचा ’ कधींहि विसर पडणार नाहीं.

याच वेळीं महाराष्ट्रांत नाथसंप्रदायांत जे कवि होऊन गेले त्याचांहि उल्लेख करणें क्रमप्राप्त आहे. या संप्रदायांत शिवदिन केसरी हे प्रसिद्ध कवि होऊन गेले. मोरोपंतांनीं सन्मणिमालेत “ **गावें नरपद्मातें जो दे निःसीम शिवदिन कराया । पटुहित उपासकाचें श्रीशिवदिन तेवि शिवदिन कराया** ” असा त्यांचा गौरव केला आहे. शिवदिनांच्या आईचें नांव सरस्वती व पित्याचें नांव कृष्ण यादव जोशी. ते लहानपणापासून सात्विक वृत्तीचे होते. त्यांचा विवाह वयाच्या बाराव्या वर्षी झाला असून त्यांच्या पत्नीचें नांव उमाबाई असें होतें. शिवदिननाथ हे परमवैराग्यसंपन्न असले तरी त्यांनीं प्रपंच व परमार्थ यांची सांगड घालून आपलें जीवित सुफलित केलें. “ **प्रपंच साधुनि परमार्थाचा लाभ जयानें केला । तो नर भलारे भला** ” असा त्यांचा उपदेश होता. त्यांनीं कीर्तनद्वारें आपला संप्रदाय वाढविला व ‘ विवेकदर्पण ’, ज्ञानदीप, श्लोक, अष्टकें, पदें अशी काव्य-रचना केली. त्यांचें पुत्र नरहरिनाथ हेंहि कवि असून त्यांनीं थोडी कवनें

केली आहेत. नरहरिनाथाचे लक्ष्मण व महिपती हे प्रसिद्ध शिष्य होते. त्यांपैकीं लक्ष्मण हा प्रारंभीं रंगेल असून पुढे उपरति झाल्यामुळें तो ईश्वर-भक्त बनला. याने कांहीं पदे लिहिलीं असून 'प्रीतिभूषण' हा ग्रंथ लिहिला असे म्हणतात. नरहरिनाथाचा दुसरा शिष्य जो महिपती त्याची प्रसिद्धी उत्तर हिंदुस्थानांत विशेष आहे. यानें पदें, अभंग वगैरे रचना केली आहे. या महीपतीच्या आयुष्यांतील बराच काल ग्वाल्हेर–उज्जयिनीकडे गेला असल्यानें त्या भागांत त्याची शिष्यपरंपरा आहे. सारांश या नाथसंप्रदायांतील सत्कवींनीं मराठी भाषेंत स्पृहणीय भर घालून महाराष्ट्राचें आध्यात्मिक वैभव वृद्धिंगत केलें. नाथसंप्रदायी गुरुशिष्यांची परंपरा श्रीनिवृत्ति-ज्ञानेश्वरापासून तो नरहरी-महीपतींपर्यंत म्हणजे १२०० पासून ते १७४४ पर्यंत अखंड चाललेली होती. म्हणून या उज्ज्वल परंपरेतील महापुरुषापुढें कुणाचेहि मस्तक आदराने नम्र झाल्याशिवाय राहणार नाहीं असा आम्हांला दृढ विश्वास वाटतो.

प्राचीन मराठी काव्यांत मराठीशाहीच्या ऐन अमदानींत स्वतंत्र काव्यरचनेकडे ज्यांनी लक्ष वळविले त्यांपैकीं जगन्नाथ हा एक कवि आहे. जगन्नाथानें 'शशिसेना' हें स्वतंत्र अद्भुतरम्य (Romantic) काव्य लिहिलें आहे. या काव्यांत शृंगाररसाचें अतिरिक्त आविष्करण झाले असल्याने तें उन्मादक वाटतें हे खरें. पण या काव्याचे कथानक स्वतंत्र असल्यामुळें 'शशिसेना' हें काव्य कौतुकास्पद वाटते. त्याचप्रमाणें विठ्ठल, त्र्यंबक वगैरे कवींनीं तत्कालीन परिस्थितिनिदर्शक अशी स्फुट पद्यरचना केली आहे. परंतु या सर्वांपेक्षां मध्वमुनि हे कवि नामांकित होते. मध्वमुनीश्वरासंबंधानें निरनिराळ्या ग्रंथकारांनीं वेगवेगळी माहिती दिली आहे. महीपतींच्या मतें मध्वमुनि हे जनस्थानचे रहिवासी असून यांस पांडुरंगाचा साक्षात्कार होत असे. राजारामबुवा प्रसादी म्हणतात कीं, मध्वनाथ नीरानदीच्या कांठीं कळवोळी येथें शिवरात्रीस जन्मले म्हणून यांचें नांव आईबापांनीं महादेव

असे ठेविलें. नरहरी धुंडिराज मालू यांच्या मतें मध्वमुनि हे नासीकचे राहणारे असून त्यांच्या पित्याचें नांव नरहरी व आईचें द्वारावती. त्यांचें प्रारंभींचे नांव त्र्यंबक गोसावी असें असून पुढें मध्वाचार्यांनीं त्यांचे नांव मध्वमुनि असें ठेविलें. मध्वमुनीश्वर हे कीर्तन करीत असत व अभंग, पदें सहजस्फूर्तीने रचत असत. ते विठ्ठलाचे परमभक्त असल्यामुळें पंढरीची वारी ते नियमाने करीत. मध्वमुनींची वाणी नांवाप्रमाणेच मधुवर्षिणी व मनोहारिणी आहे. 'उद्धवा शांतवन कर जा' हें सर्वपरिचित पद यांचेंच आहे. त्यांच्या श्रीकृष्ण चरित्रविषयक पदांची गणना भावगीतांत करावयाला हरकत नाहीं. सारांश, मध्वमुनि हे मराठी भाषेतील वैणिक प्रतिभेचे कवि होऊन गेले.

मध्वमुनीश्वराचे प्रख्यात शिष्य म्हणजे अमृतराय हे होत. अमृतरायांचा जन्म शके १६२० मध्यें झाला असून त्यांच्या पित्याचें नांव शंकर व आईचें नांव उमा. हे मुळचे बुलढाणा जिल्ह्यांत मेहेकर तुकयांतील फेत्तेरखेरडा येथील राहणारे. अमृतराय नामांकित कीर्तनकार होते म्हणून मोरोपंतांनीं: "कीर्तनसुखार्थ झाला अवतारचि काय अमृतरायाचा। भलत्या मुखांतुनि अशी सुरसखनि निघेल काय जी वाचा" असें गौरवोद्गार काढले आहेत. अमृतरायांच्या कवितेला मोरोपंतांनीं 'सुरसखनि' हें जें विशेषण लाविलें आहे तें फार समर्पक आहे. त्यांनीं विस्तृत काव्यें लिहिलीं नाहींत. पण निरनिराळ्या पौराणिक कथानकांवर कटाव रचले आहेत. त्याशिवाय त्यांचीं पुष्कळ पदेंहि उपलब्ध आहेत. अमृतराय हे संस्कृत, मराठी व हिंदी या तिन्ही भाषेंत सारखेच प्रवीण होते. त्यांच्या कटावांत पराकाष्ठेचें नादमाधुर्य दृष्टोत्पत्तीला येत असून त्यांतील पदलालित्य श्रुतिसुखद आहे. त्यांची वर्णन शैली जितकी प्रदीर्घ व पल्लेदार तितकीच रसपूर्ण व रेखीव आहे. विशेषतः कीर्तनकारांना अमृतरायांच्या कटावांचा उपयोग होत असे हें सांगण्याचें कारणच नाहीं.

अमृतरायांनीं मराठी काव्यांत गीर्वाण वाणीचें प्रागल्भ्य व संगीतानुकुल माधुर्य यांची सांगड घातली. त्यांच्या कटावांतील अनुप्रासाचा विलास क्वचित अर्थहीन असला तरी चमत्कृतिजनक आहे. त्यांची काव्यकन्यका नवरसाच्या पुष्करिणींत सलील विहार करितांना आढळते. त्यांचे कटाव हें वृत्त धावतें असून ते वर्णनात्मक काव्याला अनुकूल आहे. अमृतरायांची कर्णमनोहर कटावरचना मयूराच्या पिसाऱ्याप्रमाणें वैचित्र्यपूर्ण व विलोभनीय वाटते. त्यांची पदे हीं गीतिकेची ( Song ) उत्कृष्ट निदर्शक आहेत. त्यांनीं श्रृंगार, वीर व करुण हे रस उत्कटतेने वर्णिले असले तरी भक्तिरसाला प्राधान्य दिलें आहे. कै. ओक यांनी म्हटल्याप्रमाणे 'अमृतरायांची वाणी अमृतलहरीप्रमाणे' सुधास्राविणी आहे. मराठी भाषेंतील उच्च प्रतीच्या कवींत त्यांची गणना करावयाला हरकत नाहीं. त्यांच्या काव्यांत पदलालित्याच्या अतिरेकानें पुष्कळ ठिकाणी प्रसादाची हानी झाली आहे. कारण नादाचा नाद हा अर्थाला अनर्थ व रसाचा विरस करण्याला कारण होतो हें प्रसिध्दच आहे. तथापि हें कांहीं असले तरी मराठी कवींत अलंकार ( Ornate ) भाषाशैली लिहिण्याच्या बाबतींत अमृतराय हे प्रमुख कवि आहेत. चमत्कृति हा त्यांच्या काव्यांचा आत्मा आहे व ही चमत्कृति क्वचित प्रसंगी कृत्रिम, पुष्कळ ठिकाणीं कमनीय व फारथोड्या ठिकाणीं क्लिष्ट झाली आहे. सारांश, आपल्या प्रतिभेच्या वाहनाला योग्य असें अभिनव वृत्त योजून श्रृतिसुभग काव्यरचना करणाऱ्या कवींत अमृतराय हे वरच्या दर्जाचे कवि आहेत.

येथपर्यंत विविधरसात्मक काव्यरचना करणाऱ्या कवींनंतर आपण कांहीं चरित्रकार संतकवींचा विचार करूं. भाविकपणानें चरित्र लिहिण्याची प्रथा मराठी भाषेंत प्रारंभापासून दिसून येते. ज्ञानेश्वरांचें चरित्र सच्चिदानंद-बोवांनीं लिहिलें आहे. चरित्रलेखनाप्रमाणें आत्मचरित्रेंहि आढळून येतात. निरंजनमाधव, कचेश्वर प्रभृतींनीं आत्मचरित्रें लिहिलीं आहेत. परंतु त्रुटित.

स्फुट अशा चरित्रात्मक ग्रंथांत नाभाजीचा 'ग्रंथमाला' हा ग्रथ प्रसिद्ध आहे. नाभाजी हा शके १६०० च्या सुमारास होऊन गेला व त्यांचा मराठी भाषेशीं फारसा परिचय नसल्यामुळे महाराष्ट्रसंतांचीं चरित्रें त्यांनीं ऐकीव माहितीवरून लिहिलेलीं दिसतात. नाभाजीनंतर उद्धव चिद्धन व दासो दिगंबर हे चरित्र लेखक होऊन गेले. या सर्वांपेक्षां महिपती ताऱ्हाबादकर हे चरित्रलेखकांत अग्रेसर आहेत. हे नगर जिल्ह्यांतील राहुरी तालुक्यांत ताऱ्हाबाद गांवचे राहणारे. लहानपणापासून ते भगवद्भक्त असून वडील हयात असतांनाच पंढरीची वारी करूं लागले. वडील वारल्यानंतर महिपती हे गांवची कुलकर्णीपणाची वृत्ती करून संसार सांभाळून असत. पुढे सरकारी नोकरीविषयीं औदासीन्य उत्पन्न होऊन यांनीं संतचरित्रें वर्णन करावयाला सुरवात केली. 'भक्तविजय' हा त्यांनीं पहिला ग्रंथ शके १६६४ मध्ये लिहिला. भक्तविजयानंतर त्यांनीं 'कथासारामृत' हा सात हजार ओव्यांचा ग्रंथ लिहिला. त्यानंतर त्यांनीं 'पांडुरंगमहात्म्य' हा ग्रंथ लिहून त्यात विठ्ठलाचे गुणगान केलें. पौराणिक आख्यानें लिहिण्यापेक्षां चरित्रात्मक ग्रंथ लिहिण्यांत त्यांना अधिक आनंद वाटत असे. म्हणून वयाची पन्नाशी उलटल्यावर 'संतलीलामृत' हा ग्रंथ लिहिला. यानंतर त्यांनीं 'तुळसी-महात्म्य', 'गणेशपुराण', 'दत्तात्रयचरित्र', 'शुक्राभरण', 'ऋषिपंचमी' वगैरे ग्रंथ लिहिले. त्यानंतर 'भक्तलीलामृत' हा ग्रंथ शके १६९६ मध्ये समाप्त केला. अशा रीतीनें महीपतींनीं आपलें सगळें आयुष्य संतचरित्रें लिहून त्यांचे सद्गुणसंकीर्तन करण्यांत व्यतीत केलें. महीपतींच्या ग्रंथांत भाविकता असली तरी त्यांचे ग्रंथ प्राचीन संतचरित्रें लिहिण्याला आधारभूत आहेत. प्रा. लागू यांनीं म्हटल्याप्रमाणें "महीपतींच्या साध्या निष्कपट वाणीनें आपलें मन मोहून जातें. त्यांची कळकळ, श्रद्धा, मनाचा मोकळेपणा पाहून ते काय सांगतील तें ऐकायला तयार असतों. महीपतींच्या ग्रथरचनेंत कला-कुसरीच्या कोणाला संशयसुद्धां येणार नाहीं. (साहित्यसुवर्ण पृ. ४९).

त्यांच्या ग्रंथांत काव्यसौंदर्य फारसें नसले तरी एकप्रकारची '**स्वभावभूयिष्ठ माधुरी**' आहे हें नाकारतां येणार नाहीं. याच ठिकाणीं भीमस्वामीकृत 'भक्तलीलामृत' व राजारामप्रासादीकृत 'भक्तमंजरी' या ग्रंथांचा उल्लेख करितां येईल. सारांश, या कवींनीं "**गावीं संतचरित्रें हो। भावें परमपवित्रें हो**" या सद्भावनेनेंच ही संतचरित्रें गायिलीं आहेत.

अशा रीतीनें मराठी काव्याची प्रगति होत असतां एक कविरत्न महाराष्ट्रात उदयाला आले. ते कवि म्हणजे मोरोपंत हे होत. त्यांचा जन्म शके १६५१ सौख्यनाम संवत्सरी पन्हाळगडावर झाला. त्यांच्या पित्यांचें नांव रामाजीपंत व आईचें नांव लक्ष्मीबाई. मोरोपंतांचें शैशव निसर्गसौंदर्यानें मंडित असलेल्या पन्हाळगडावर गेलें. पन्हाळगड सोडल्यावर पंत हे पेशव्यांचे व्याही जे बारामतीकर त्यांच्या आश्रयानें पुराण सांगून रहात असत. मोरोपंत जन्मसिद्ध कवि होतेच पण मम्मटांनी '**शक्तिर्निपुणता लोककाव्यशास्त्राद्यवेक्षणात्। काव्यज्ञ शिक्षयाभ्यास इति हेतुस्तदुद्भवे**' (का. प्र. १–३.) या कारिकेंत सांगितल्याप्रमाणें 'काव्यशास्त्राद्यावेक्षण व काव्यज्ञशिक्षयाभ्यास' हीं जीं काव्यस्फूर्तींचीं साधनें आहेत त्यांचाहि त्यांनीं अवलंब केला. संस्कृत व मराठी या दोन्ही भाषांच्या काव्य–सरोवरांत त्यांनीं सलील अवगाहन केलें, कवित्वाला विद्वत्तेची जोड देऊन आपला वाग्विलास वैभवशाली केला व वामनपंडिताप्रमाणे यमकानुप्रासविभूषित अशी प्रगल्भ काव्यरचना करण्याचें ध्येय डोळ्यापुढे ठेविलें. पंतांनीं प्रारंभी सीतागीत, लवकुशाख्यान, रुक्मिणीगीत हीं काव्ये लिहिलीं. हरिश्चंद्राख्यान, देवीमहात्म्य, प्रल्हादविजय ही लघुकाव्यें त्यांनीं पहिल्या बहरांत लिहिलीं. नंतर त्यांनी '**कृष्णविजय**' हा विस्तृत ग्रंथ लिहिला. पुढें मंत्रभागवत व हरिवंश हे ग्रंथ लिहून भागवतावर देशीकार लेणें चढविलें पण या सर्वांपेक्षां त्यांचा महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे '**आर्याभारत**' हा होय. 'आर्याभारत' ह्या ग्रंथांत पंतांची प्रतिभा, पांडित्य व

परिश्रमशीलता यांचा त्रिवेणी संगम झाला असून तो मराठी भाषेचा अवि-नाशी अलंकार आहे. पंतांनीं १०८ रामायणें लिहिल्याची आख्यायिका आहे, पण त्यांपैकी ९४ रामायणें उपलब्ध आहेत. या रामायणांत कृत्रिमता असली तरी त्यांत पंतांचे भाषावैभव प्रतिबिंबित झालें आहे. पण ही रामायणें वाचून त्यांनीं 'आर्याभारताप्रमाणें' विस्तृत असें 'आर्यारामायण' लिहिलें असतें तर बरें झाले असते असें वाटल्यावांचून रहात नाही. त्याशिवाय त्यांनीं गंगावकिली, केकावली, पंढरीमहात्म्य इत्यादि स्फुट काव्यें लिहिलीं आहेत. त्यांपैकीं 'केकावली' ही एक उत्कृष्ट कलाकृति आहे. एकंदरींत, मोरोपंत हे संत नव्हते किंवा योगीहि नव्हते. त्यांनी आपले ग्रंथ वेदांतविवेचनासाठीं लिहिलें नाहीत किंवा पांडित्यप्रदर्शन हेंहि त्यांचें ध्येय नव्हते. प्रापंचिक लोकांचे मनोविनोदन करण्यासाठीं त्यांनीं आपली प्रचंड व प्रगल्भ काव्यनिर्मिति केली. महाभारत, रामायण, भागवत या तीन काव्यांतील रसकल्लोलिनींत विहार करण्याचा आनंद मराठी वाचकांना प्राप्त करून दिला. सारांश, मोरोपंतांचें चमत्कृतिजनक व चारुतर काव्य वाचत असतां, वसंतसेनेच्या सप्तकक्ष प्रासादांत शिरलेल्या मैत्रेयाप्रमाणे रसिकांचें मन आश्चर्यमुग्ध व आनंदनिर्भर झाल्यावांचून रहात नाही.

मोरोपंतांची कीर्ति त्यांच्या हयातींतच सर्वत्र प्रस्थापित झाली होती; व त्यांच्या आर्या काशी-रामेश्वरापर्यंत पोंचल्या होत्या. रामजोशी प्रभृति सम-कालीन कवींनीं व त्यानंतर होऊन गेलेल्या कीर्तनकारांनीं त्यांच्या आर्येचा अतोनात प्रसार केला. इंग्रजी राज्य सुरू होण्यापूर्वी मोरोपंतांच्या काव्या-विषयीं एक मत होते. तथापि पाश्चात्य शिक्षणाच्या संस्कारामुळें त्यांच्या-विषयींचा आदर कांहींजणांच्या मनांतून कमी होऊं लागला व ते त्यांच्या काव्याला दूषण ठेवूं लागले. कृष्णशास्त्री चिपळूणकर हे स्वतः रसज्ञकवि असतांनाहि मोरोपंतांना नेहमीं 'यमक्या' असें संबोधून त्यांचा तीव्र अधिक्षेप करीत असत. न्यायमूर्ति रानडे यांनीं केकावलीचें परीक्षण करितांना

ईश्वरांशीं फाजील सलगी केल्याबद्दल पंतांना दूषण दिलें आहे. पण कलाकृति (Work of art) या दृष्टीनें केकावलीसारखें दुसरें काव्य नाहीं असा आपला अभिप्राय व्यक्त केला आहे. विविधज्ञानविस्ताराच्या पहिल्याच अंकांत शके १७९० सालीं मोरोपंतांवर लिहितांना कवीवर कीर्तिलोलुपता व यमकप्रियता हे दोन आक्षेप घेतले आहेत. डॉ. वुइल्सननें मोरोपंतांच्या काव्यांतील कृत्रिमतेची कुचेष्टा केली आहे. माधवराव कुंटे यांनीं वामन-मोरोपंतांचें 'Degenerate Marathi Poets' असें उपहासास्पद वर्णन 'राजा शिवाजी' या महाकाव्याच्या प्रस्तावनेंत केलें आहे. डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांनीं 'वामन–मोरोपंत हे कविच नव्हेत' या लेखांत मोरोपंतांची कवित्वपदवीच हिरावून घेण्याचा प्रयत्न केला आहे. अशाप्रकारें उपरिनिर्दिष्ट टीकाकारांनीं मोरोपंतांना काव्यसिंहासनावरून पदच्युत करून त्यांचें कीर्तिमंदिर उध्वस्त करण्याचा प्रयत्न केला आहे.

मोरोपंताच्या दूषकांपेक्षां त्यांच्या प्रशंसकांची संख्या अधिक भरेल. प्रख्यात मयूरभक्त परशुरामपंत तात्या गोडबोले यांनीं 'प्राकृत कवितेंत मोरोपंतांच्या सारखी कविता नाहीं' असें नवनीतांत लिहिलें आहे. दादोबा पांडुरंग तर्खडकर यांनीं 'यशोदा पांडुरंगी' ही केकावलीवर विस्तृत टीका लिहून मोरोपंतांच्या काव्याकडे लोकांचें लक्ष वळविलें. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं आपल्या 'मोरोपंत' या प्रभावशाली प्रबंधांत पंतदूषकांचा यथोचित समाचार घेऊन मयूरकाव्यांचें सौंदर्य रसिकांच्या निदर्शनाला आणिलें. चिपळूणकर लिहितात: "गीर्वाणवाणीच्या सुवर्णसूत्रांनीं जागोजाग विणून काढलेलें व अनुप्रासांनीं स्थल विशेषीं विचित्रित केलेलें असें उज्ज्वल वस्त्र परिधान केलेली अभिनव कविता जनमनःप्रांगणीं जेव्हां नटीप्रमाणें अवतीर्ण झाली असेल तेव्हां तिचा अलंकार, थाटमाट व चरणांत रुणझुणणाऱ्या यमकरूप पैंजणांचा कर्णमनोहर नाद ऐकून जोशीबोवासारखी मंडळी तल्लीन होऊन गेली यांत काय आश्चर्य ! (नि. मा. पृ. ८३६). हंस यांनीं एखाद्या सुंदर व चतुर कामिनीच्या

लीलावलोकनांत रसिक तरुण जसा तल्लीन व गर्क होऊन जातो तसे मोरोपंतांच्या कवितावलोकनापासून सहृदय झाल्यावांचून रहाणार नाही. असे उद्गार काढले आहेत. पांगारकर यांनीं मोरोपंतावर महाकवित्वाचा मुकुट चढविला आहे. प्रा. रा. रा. भागवतांनी यांना मयूर काव्याच्या आस्वादानें कालिदास व भारवी वाचल्याचें श्रेय मिळून आणखी भक्तिरसाचा लाभ होतो असे म्हटलें आहे. बा. अ. भिडे लिहितात, " संस्कृत छंदाची धाटणी साहित्यगुणांची जडणी, ओजस्वी शब्दसरणी, रसाविष्काराची उभारणी व भाषेची कमावणी या गुणगणानें मराठी काव्याला पंतांनीं रसिकांतच नव्हे तर पंडितवर्गातहि आदरणीय करून सोडले [ काव्यचर्चा पृ. २१२ ]. प्रा. बनहट्टी यांनीं ' मयूर-काव्यविवेचन ' या ग्रंथांत भावनांचा उल्लास व कल्पनांचा विलास हे मोरोपंताच्या काव्यांत एकत्रित झाली आहेत असे आपलं मत प्रतिपादन केले आहे. त्याचप्रमाणें प्रा. शि. म. परांजपे, प्रा. श्री. वि. पराजपे, न. चि. केळकर, चि. वि. वैद्य, प्रा. लेले, प्रा. चापेकर, मुकुंदराय, पावगी, प्रा. आळतेकर, प्रा. वाटवे, बाळाचार्य खुपेरकर, प्रा. पोतदार व बॅ. सावरकर या काव्यरसिकांचीहि मोरोपंतांच्या प्रशंसकांतच गणना करावी लागेल. सारांश, मोरोपंतांचे हे सर्व दूषक-प्रशंसक त्यांचा कीर्तिपरिमळ अधिक दरवळण्याला कारणीभूत झाले आहेत.

अशाप्रकारें मोरोपंताच्या काव्याविषयीं परस्पर विरोधीं मते आढळून येतात. तथापि सत्याला मध्यमक्रम प्रिय असतो. मोरोपंत हे कालिदास, ज्ञानेश्वर, डांटे, गटे, मिल्टन यांच्या मालिकेंत बसणारें कवि नाहींत हे खरें पण ते आजिबात कविच नव्हतें असें म्हणणे जितकें अनुचित तितकेंच अन्यायमूलक आहे. ते शब्दसृष्टीचे ईश्वर असून त्यांची कलात्मक दृष्टि सूक्ष्म होती. संक्षेपचातुर्य, आटोपशीरपणा व टापटीप हे त्यांच्या काव्याचे मुख्य गुण आहेत. प्रो. किलरकूचनीं म्हटल्याप्रमाणें " In selecting what is essential, in casting out what is irrelevent lies one half of a

great artist's work ( Shakespeare's Workmanship p. 249 ). अवश्यक गोष्टींची निवड करणे व अनवश्यक गोष्टींचा त्याग करणे यांत कलावंताच्या कलेचें निम्मे रहस्य आहे. यादृष्टीनें मोरोपंत पहिल्या प्रतीचे कलावंत होते असें ह्मणावे लागेल. महाभारतांतील कथा सांगतांना त्यांनीं संक्षेप-विस्ताराचें धोरण फार कौशल्यानें पाळलें आहे. त्यांची भावनाशक्ती प्रबळ नसल्यामुळे त्यांच्या काव्यांत मुक्तेश्वराप्रमाणे रसोत्कटता कमी आहे. मुक्तेश्वरी काव्याचे स्वरूप प्रक्षुब्ध सागराप्रमाणे असून मयूरकाव्याला प्रशांत सरोवराची उपमा देतां येईल. रसाविर्भाव व रचनासौष्ठव यांत मुक्तेश्वर श्रेष्ठ असून वाग्वैचित्र्य व विचारगांभीर्य यांत मोरोपंत सरस आहेत. त्यांच्या काव्यांत शब्दार्थाचे अलंकारभांडार खुले झाले असून त्यांनीं आपली कविता 'तनुमनवाक्शुद्धी' करितां लिहिली आहे. त्यांच्या काव्यांत कृत्रिमता, अनौचित्य, प्रसादाभाव, क्लिष्टता हे दोष यमकासक्तीमुळेंच उत्पन्न झाले आहेत. सौंदर्याविष्करण करून रसिकमनाला सात्विक आनंदाचा लाभ करून देण्याचे सामर्थ्य त्यांच्या काव्यांत आहे. प्रतिभेच्या वेगवंत अश्वावर आरूढ होऊन नभोमंडळांत भराऱ्या मारण्याचें ज्ञानेश्वर-मुक्तेश्वर यांचे चातुर्य मोरोपंतांत नाहीं. तथापि विषण्ण हृदयाला उल्लसित करणाऱ्या कुसुमवाटिकेप्रमाणें त्यांच्या काव्याचें प्रसन्न स्वरूप आहे. त्यांच्याइतकी व्याकरणशुद्ध कविता प्राचीन कवींत दुसऱ्या कोणत्याहि कवीनें लिहिली नाहीं. सारांश, मोरोपंतांनीं वैदग्धमंडित काव्यरचना करून मराठी भाषेला प्रागल्भ्य व प्रतिष्ठा यांची प्राप्ति करून दिली हें निर्विवाद आहे.

मोरोपंतांच्या नंतर त्यांचें अनुकरण करणारें पुष्कळ कवि झाले. कोणताहि प्रतिभाशाली पुरुष झाला म्हणजे त्यांचें अनुकरण करणारे पुष्कळ-जण निर्माण होतात. टेनिसनने म्हटल्याप्रमाणें ध्वनि थोडे प्रतिध्वनि फार. "There are few voices and many echoes" या न्यायानें मोरोपंतांच्या आर्येचें अनुकरण करणारे असंख्य कवि झाले असल्यास त्यांत

काय नवल ? धुंडिराज कवीनें ' चंद्रावळी ' हे काव्य आर्यावृत्तांत लिहिलें आहे. हे काव्य रचनेच्या दृष्टीने बरें असूनहि अनीतिप्रवर्तक असल्यामुळें हीनदर्जाचें वाटतें. जनार्दन व कृष्णानंदनिमग्न हे मोरोपंतांची नक्कल करणारे कवि होऊन गेले. विठ्ठल केरीकर याने वामनचरित्र, कबीरकथा, गजगौरीकथा हीं प्रकरणें आर्यावृत्तांत लिहिली आहेत. बाळंभट काजळे, दाजिबा पुजारी, रामजोशीबुवा, रामचंद्र बडवे हे कवि पंतपरंपरेंतीलच होत. "**सुश्लोक वामनाचा किंवा आर्या मयूरपंताची । ओवी ज्ञानेशाची अभंग वाणी प्रसिद्ध तुकयाची**" ही सर्वपरिचित आर्या रामबडवे याच्या 'मोरेश्वर वर्णनांतील' आहे. कांहीं अलौकिकत्व किवा अभिनवत्व असल्या-खेरीज अनुकरण होत नाहीं व मोरोपंतांच्या काव्याचें अनुकरण करणारे इतके कवि होऊन गेले हेच त्यांच्या अपूर्वतेचे एक लक्षण मानतां येईल. याचवेळीं महाभारताचेहि भाषांतर करणारे कवि होऊन गेले. त्यांपैकीं समग्र महाभारतावर गोपाळ, शुभानंद, माधव आणि जिवा-शिवा यांनीं ग्रंथ-रचना केली आहे. त्याशिवाय मुरारी व अनंत यांनींहि भारताच्या कांहीं पर्वांवर काव्यरचना केली आहे. ज्योतिपंत दादा यांनीं समग्र भागवत मराठींत आणिलें; यामुळें लोक त्यांना ' महाभागवत ' असें म्हणत असत. अशा प्रकारें सतराव्या शतकाच्या शेवटीं मराठी काव्याची प्रगति होत चालली होती. यावेळच्या काव्यावर मुक्तेश्वर व मोरोपंत यांच्या काव्याची चारुतर छाया पडली आहे. याच सुमाराला मराठी वाक्सरितेंत एक नवीन निर्झरौघ येऊन मिसळण्याला सुरवात झाली. तो निर्झरौघ म्हणजे शाहिरी कविता ही होय. म्हणून आतां आपणांला शाहिरांच्या काव्यरचनेचें स्वरूप अवलोकन करावयाला हरकत नाहीं.

शाहिरांचें काव्य हें भाषांतरित अगर रूपांतरित नसून सर्वस्वी स्वतंत्र आहे. या शाहीरकवींत रामजोशी हे अग्रेसर आहेत. रामजोशी हे सोला-पुरचे राहणारे असून लहानपणापासून ते छंदीफंदी होते. पुढें त्यांनीं पंढर-

पुराकडे जाऊन काव्यव्याकरणाचा अभ्यास केला व वयाच्या तिसाव्या वर्षी मोरोपंतांच्याकडून ' कविप्रवर ' ही पदवी मिळविली. रामजोशी हे उत्कृष्ट कीर्तनकार होते. रामजोशी यांनी लावण्या, पदे, श्लोक, कटिबंध, मदालसाचंपू, इत्यादि कविता लिहिली आहे. त्यांची कवितां थोडी असली तरी ती तप्तसुवर्णाप्रमाणे देदिप्यमान आहे. संस्कृत भाषेवर त्यांचे उत्कृष्ठ प्रभुत्व असून त्यांची भाषा सुश्लिष्ट व सुललित आहे. प्राचीन कवींत ज्यांच्या काव्यांत पराकाष्ठेचे पदलालित्य आढळतें असे अमृतराय, रामजोशी व विठोबा अण्णा हे कवि होत. रामजोशांच्या शृंगारपर, वैराग्यपर व पौराणिक अशा तीन प्रकारच्या लावण्या बहारदार आहेत. महाराष्ट्र वाणीचें रमणीय स्वरूप रामजोशांच्या लावण्यांत प्रगट झाले आहे. असें म्हटल्यास त्यांत अतिशयोक्ति होणार नाहीं. विष्णुशास्त्री चिपळुणकरांनीं म्हटल्याप्रमाणे रस, प्रौढ, झोकदार आणि आवेशयुक्त असें आपल्या भाषेचें स्वरूप ज्यास पाहणे असेल त्यास या कवीच्या लावण्यांत सांपडेल. शृंगार व वैराग्य या दोन विषयांचें वर्णन करणारा रामजोशांच्या तोडीचा दुसरा कवि झाला नाही. असा रड्डीशास्त्री यांनीं आपला अभिप्राय व्यक्त केला आहे. महाराष्ट्र–सारस्वतकार भावे म्हणतात, " महाराष्ट्रकवींच्या पहिल्या पक्तींत जोशीबुवांची संभावना होते. आणखी भाषाकामिनीचे हे खरोखर वस्ताद आहेत. आणि एका मुक्तेश्वराखेरीज ती यांच्याशिवाय दुसऱ्या कोणाबरोबर इतकी खुलून रंगांत आलेली नजरेस पडत नाहीं." नाहीं म्हणावयाला श्री. य. न. केळकर यांनीं रामजोशांच्या काव्यांत प्रासानुप्रासांच्या मौजेखेरीज विषेश कांहीं नाही असा आपला पूर्वग्रहदूषित अभिप्राय व्यक्त केला आहे. सारांश, रामजोशी यांनीं त्रिविधप्रकारची कामगिरी केली आहे. पहिली अशी कीं त्यांनीं कीर्तनांतून मोरोपंतांच्य आर्येचा प्रसार केला. श्रृतिसुखद पदलालित्यानें मंडित अशा मनोज्ञ लावण्या लिहिल्या व आपल्या विद्वत्तेने शाहिरावरील असंस्कृततेचा आक्षे

भ्रममूलक ठरविला. या सर्व दृष्टीनें पाहतां शाहीरमंडळांत रामजोशांनाच अग्रपूजेचा मान देण्याला कोणीहि अभिनिवेशरहित रसिक हरकत घेईल असे आम्हांला वाटत नाहीं. कारण रामजोशी यांची कविता वाचली असतां ' **किति श्रृतिमनोहरा रसिक रामजोशी–कृती । कृती न कवितें तुझी करिति नूपुरें झंकृती** ' या कविवर्य चंद्रशेखरांच्या ओळी जिव्हाग्रावर खेळूं लागतात.

शाहीर कवींत रामजोशांच्यानंतर होनाजी बाळ या कवीचा उल्लेख करावयाला हरकत नाहीं. याच्या पूर्वजांचा धंदा गोंधळीपणाचा असून याचा जन्म शके १६६६ मध्यें झाला. अनंत फंदी हा रामजोशाप्रमाणें पंडित नसला तरी मराठी व ऊर्दू या दोन भाषांचें त्यास चांगलें ज्ञान होतें. प्रारंभीं हे तमाशा करीत असत; पण पुढें अहिल्याबाईच्या सांगण्यावरून त्यांनीं तमाशाचा धंदा सोडला व ते कीर्तन करूं लागले. तत्कालीन शाहीरमंडळांत अनंत फंदींचा फार लौकिक होता हे 'लुंगेसुंगे कवि भेदरले अवघ्यावर त्याची गुर्की' या होनाजी बाळाच्या उक्तीवरून दिसून येतें. त्यांनीं विविध-प्रकारच्या विपुल लावण्या लिहिल्या असून त्यांत पुष्कळ ठिकाणीं श्रृंगार-रसाचा अतिरेक झाला आहे. त्यांची ' चंद्रावळ ' ही लावणी बहारदार आहे. दुसऱ्या बाजीरावांनीं त्याच्याकडून ' माधवनिधान ' हें काव्य लिहून घेतले. या काव्याचे सहा अध्याय असून त्यांत ३५९ ओव्या आहेत. सवाई माधवरावांच्या मृत्यूनंतर पेशवाईत ज्या घडामोडी झाल्या त्यांचें सुसंगत वर्णन या काव्यांत केलें आहे. तसेंच ' खर्ड्याच्या लढाईवरील ' पोवाडाहि प्रसिद्ध आहे. अनंत फंदी हे उतारवयांत मिरज, सांगली, बडोदें वगैरे ठिकाणीं मुलुखगिरी करून आले व १८१९ सालीं वारले. त्यांनीं ' **अनंत फंदीचे छंद जखमा जशा जिव्हारीं शस्त्राच्या**'–असें आत्मस्तुतीचे उद्गार अनेक ठिकाणीं काढले आहेत. तथापि अनंत फंदीपेक्षां होनाजी बाळ हा अधिक उच्च दर्जाचा कवि होऊन गेला. होनाजी बाळ हा जातीचा गवळी,

त्याचें आडनांव शिलारखाने. त्याला कवित्वाची देणगी अनुवंशिकच होती. सवाई माधवरावाच्या कारकीर्दींत होनाजीची अतोनात प्रसिद्धी झाली पण दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दींत त्याच्या गुणाची अधिक बूझ झाली. रावबाजीच्या रंगेल राजवटींत या शाहिराच्या काव्याला वासंतिक बहर आला असे म्हणतां येईल. होनाजी बाळाने रागदारींत लावण्या रचण्याची प्रथा पाडली असून पुढे सगनभाऊ व प्रभाकर यांनीं या पद्धतीचें अनुकरण केलें. त्याच्या रागबद्ध लावण्यांची इतकी मोहिनी पडली होती कीं पुण्यांतील वारयोषितांना त्यांच्या लावण्या शिकण्याची पाळी आली होती. होनाजी बाळाची कविता हृदयंगम असून त्यांतील वैचित्र्य रमणीय आहे. केवळ प्रणयलीलांचेच नव्हे तर परमेश्वराच्या वैभवाचेहि वर्णन त्यानें कुशलतेनें केले आहे. इतर शाहिरांप्रमाणे त्याच्या काव्यांत अश्लीलता व असदभिरुचि पुष्कळ ठिकाणीं असली तरी त्याची कविता पुष्कळ सोज्ज्वल आहे. सारांश, अनंत फंदी व होनाजी बाळ यांनीं शाहिरी वाङ्मयांत भर घालून त्याला लोकप्रियता प्राप्त करून देण्याचें श्रेय संपादन केले यांत शंका नाहीं.

शाहीरमंडळांत प्रभाकर हा एक प्रसिद्ध शाहीर होऊन गेला. प्रभाकराचे सबंध नांव जनार्दन दातार हें होय. त्याचा जन्म सन १७५३ च्या सुमारास झाला. वयाच्या पंधरासोळाव्या वर्षांपासून त्याला कवित्वाचे अंकूर फुटूं लागले. त्यावेळीं गंगू हैबतीचा फड प्रसिद्ध होता व त्यांत प्रभाकरानें छाप पाडण्याला सुरवात केली. प्रभाकरानें लावणी रचावी व इतरांनीं म्हणावी अशी स्पृहणीय स्थिति लवकरच प्राप्त झाली. पुढे बाजीरावाची त्याच्यावर बहाल मर्जी बसली व प्रभाकरानेंहि त्याच्या विलासवर्णनपर पुष्कळ लावण्या रचिल्या. दुसऱ्या बाजीरावासारख्या विलासलोलुप व विवेकहीन पुरुषाला संतपंडितांच्या उदात्त काव्यापेक्षां शाहिरांचें प्रणयोत्कट काव्य अधिक रुचावें यांत काय नवल? पेशवाईचा अस्त झाल्यावर प्रभाकराची फार शोचनीय स्थिति झाली. व १८४३ सालीं तो वारला. प्रभाकरानें लावण्या, पोवाडे

अशी बरचि काव्यरचना केली. त्याच्या काव्यांत भाववैचित्र्य व भाषा-सौंदर्य हे गुण प्रामुख्यानें आढळतात. प्रणयविकल युवयुवतींच्या भावना-कामनांचीं शब्दचित्रे प्रभाकराने कुशलतेने रेखाटली आहेत. प्रभाकराप्रमाणेंच सगनभाऊ हाहि एक प्रसिद्ध शाहीर आहे. हा मुसलमान असून वारकरी संप्रदायाचा अभिमानी होता. दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत त्यानें आपला स्वतंत्र फड काढला. व बाजीरावाची त्याच्यावर मर्जी बसली. सगनभाऊनें बाजीरावाच्या विलासवर्णनवर सुमारें १५ लावण्या लिहिल्या आहेत. सगनभाऊच्या लावण्यांत शृंगाराचा अतिरेक असून गायकीचे ढंग अधिक आढळतात. सगनभाऊप्रमाणेंच नासिक प्रांतांत परशुराम हा शाहीरहि प्रथितयश होता. हा लहानपणापासून शिप्याचा धंदा करीत असे. श्रीविठ्ठल हें याचें उपास्यदैवत होतें. त्यानें ठिकठिकाणच्या दैवतावर्णनात्मक, भागवतांतील कथानकांवर व राजकारणी पुरुषांवर लावण्या रचल्या आहेत. इतर शाहिरांपेक्षां परशुरामाच्या लावण्या सात्विक आहेत. याशिवाय, गोविंद, लाछिराम, मोतिराम या कवींनींहि शाहिरी वाङ्मयांत भर घातली आहे.

येथपर्यंत शाहिरी कवींचा उहापोह केला. या शाहीर कवींनीं आपल्या अभिनव काव्यनिर्मितीनें मराठी साहित्यांत एक आल्हादक कुसुमवाटिका उत्पन्न केली आहे. या शाहिरांत रामजोशी, प्रभाकर, होनाजी बाळ, परशराम व सगनभाऊ हे पांच प्रमुख शाहीर आहेत व त्यांतहि रचनासौष्ठव व रसाविर्भाव या दृष्टीनें रामजोशी हे सर्व शाहिरांत अग्रेसर आहेत. ही शाहीरमंडळी बरीचशी अशिक्षित व असंस्कृत असली तरी त्यांचें हृदय सौंदर्यलोलुप व संवेदनक्षम. शाहिरांचें काव्य हे शृंगार व वीर या दोन रसांनीं सुस्नात झालें आहे. अच्युतराव कोल्हटकरांनीं म्हटल्याप्रमाणें "लावण्यांचे विशेष 'लावण्य' असें आहे कीं त्यांत खरेंखुरें आणि जिवंत मराठीपण बघावयाला सांपडतें" (कोल्हटकर लेखनसंग्रह

भा. २ ). महाराष्ट्राच्या वैभवशाली कालांत मराठी वाग्वल्लरीला आलेला हा फुलोरा आहे. शाहिरी वाङ्मयांत सदभिरुचीचें पुष्कळ ठिकाणीं उल्लंघनच काय पण उन्मूलनहि झालें आहे. शाहीर हे परिस्थिति पराङ्मुख नसल्यामुळे त्यांच्या वाङ्मयांत तत्कालीन समाजाचे प्रतिबिंब प्रत्ययाला येतें. अश्लीलता, अनौचित्य व अतिशयोक्ति हे दोष या काव्यांत आहेत. माडखोलकरांनी म्हटल्याप्रमाणें, ' महाराष्ट्राचे सर्व राष्ट्रीय गुणावगुण त्यांच्या काव्यांत प्रतिबिंबित झाले आहेत, (काव्यविचार पृ. ९५). म्हणून मराठी काव्याच्या अभिजात युगांत या शाहिरी काव्याला महत्त्वाचे स्थान द्यावें लागेल. सारांश, शाहिरी वाङ्मय हे कितीहि अश्लीलतेनें दूषित, असद्भिरुचीनें कलंकित असले तरी ते पदलालित्याने मंडित व विविध-रसांनीं संभृत आहे, यांत संशय नाहीं.

काव्याची उपासना करणाऱ्या कविबरोबर त्याची जोपासना करणाऱ्या कीर्तनकारांचाहि उल्लेख करणें अवश्यक आहे. कीर्तनकारांनीं मराठी काव्याच्या प्रगतीला प्रशंसनीय हातभार लावला आहे. श्रीमद्भागवतांतील " **श्रवणं कीर्तनं विष्णोः श्रवणं पादसेवनं । अर्चनं वंदनं दास्यं सख्यम् आत्मनिवेदनम्** " या श्लोकांत कीर्तन हा एक नवविधा भक्तीचा प्रकार सांगितला आहे. कीर्तन हें भगवद्भक्तीप्रमाणेच मनोरंजनाचेंहि एक अमोघ साधन आहे. महाराष्ट्रांत कीर्तनपरंपरा फार प्राचीन काळापासून रूढ असावी असें '**नामदेव कीर्तन करी । पुढें नाचे पांडुरंग**' या अभंगावरून नामदेवाच्या काळीं कीर्तनाची प्रथा होती असे दिसून येते. प्रारंभीं कीर्तनाचा थाट केवळ भजनी व निरूपणी होता. नामदेव-तुकाराम इत्यादि वारकरी सप्रदायाच्या कीर्तनांत भजन व वेदांतविवेचन यांना प्राधान्य दिलेलें असतें. पण पुढें पुढें कीर्तनाला कलात्मक स्वरूप येत चाललें. ज्ञानेश्वरांच्या ओव्या व तुकारामाचे अभंग याबरोबरच श्लोक, कटाव, सुभाषितें व आर्या या श्रुतिसुभग छंदांचा अवलंब कीर्तनकारांकडून होऊं लागला. कीर्तनांत रंजकता

ा रसवत्ता आणण्यासाठी पौराणिक आख्यानांची वाढ होऊं लागली. कीर्तनांत संगीताचेंहि सहाय्य घेतलें जात असल्यामुळें त्याच्या संमोहनीयतेंत अधिक भर पडली. अमृतराय यांना अशा प्रकारच्या कलात्मक कीर्तनाचें आद्यप्रवर्तक मानतां येईल. उत्कृष्ट कीर्तनकाराच्या ठिकाणीं विद्वत्व, कवित्व, गायनपटुत्व, रसिकत्व व वक्तृत्व या पांच गुणांची अवश्यकता आहे. पुढील काळांत रामजोशी हे प्रसिद्ध कीर्तनकार झाले. त्यांनीं आपल्या कीर्तनांतून मोरोपंतांच्या आर्येचा अतोनात प्रसार केला. कारण 'जैसी जनकें दिधली विद्धन रामजोशिता त्याला । तैसी आर्या मयुरें दिधली त्या रामजोशिता याला' या आर्येची समर्पकता सिद्ध होते. रामजोशाप्रमाणेंच अनंत फंदी हेहि प्रसिध्द कीर्तनकार होते. त्याचप्रमाणे विठोबा अण्णा कऱ्हाडकर या विदग्ध कवींनीं प्रख्यात कीर्तनकार अशी यथोचित कीर्ति मिळविली होती. पुष्कळ कीर्तनकारांनीं आपल्या कीर्तनांत रंगदेवतेनें, कवित्वशक्तीने, वाक्पटुत्वानें भाविक, सात्विक व रसिक जनांचीं अंतःकरणें हर्षनिर्भर केली. कीर्तनीं ईशस्तवन, मनोविनोदन व वाङ्मोहन यांचा त्रिवेणीसंगम झाला आहे. सारांश, कीर्तनकारांनीं रसिकरंजनाबरोबरच मराठी काव्याच्या प्रसारालाहि सहाय्य केलें आहे म्हणून त्यांचाहि येथें सादर उल्लेख केला आहे.

येथर्यंत मराठी काव्यांतील अभिजात युगाचें, रहस्योद्ग्राही विहंगमावलोकन केलें. आध्यात्मिक युगांतील कवींनीं वेदांतविवेचनावर भर दिला असून अभिजात युगांतील कवींनीं कथनपर काव्यरचनेला प्राधान्य दिलें आहे. विशेषतः रामायण, महाभारत व भागवत या ग्रंथांची चारुतर छाया या युगांतील काव्यरचनेवर पडलेली आहे. वामन, रघुनाथपंडित, मोरोपंत, आनंदतनय व सामराज यांच्या काव्याचे स्वरूप रसात्मक असूनहि अलंकारमंडित आहे. आध्यात्मिक युगांत ओवी व अभंग हे सुलभ छंद आढळतात तर अभिजात युगांत श्लोक, आर्या, कटाव या सुलभ वृत्तांचा उपयोग केला अधिक आढळतो. कोणत्याहि भाषेंतील काव्याचा इतिहास पाहिला

तर असें आढळून येतें कीं, प्रारंभी काव्याचे स्वरूप सहजरम्य व सुंदर असून पुढें त्याला कृत्रिम व कलात्मक स्वरूप येतें. संस्कृतसाहित्यांत व्यास-वाल्मिकींच्या काव्यांतील प्रकृतिमधुरता मागें पडून पुढे माघ–भारवींच्या काव्यांत कृत्रिमतेचा कळस झाला आहे. ज्ञानेश्वर व मुक्तेश्वर यांच्या काव्यांत मराठीभाषेचे निसर्गरमणीय स्वरूप असून वामन-मयूरांच्या काव्यांत तिची कृत्रिम कमनीयता व्यक्त झाली आहे. ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम व रामदास हे केवळ कवि नसून तत्कालीन समाजाचे प्रभावी नेते होते. त्यांनीं आपल्या प्रासादिक काव्याच्याद्वारें महाराष्ट्राच्या सांस्कृतिक उन्नतीला सर्वतोपरी सहाय्य केले. पण अभिजात युगांतील कवि हे पंडितकवि असून त्यांनीं केवळ काव्यप्रणयनप्रटुत्वच प्रगट केले आहे. आध्यात्मिक युगांतील कवींनीं महाराष्ट्रांतील लोकांचीं मने समुन्नत केलीं तर अभिजात युगांतील कवींनीं तीं समुल्लसित केली. श्री. सरवटे यांनीं म्हटल्याप्रमाणें, ‘ दृष्टांत-रूपानें बोलावयाचे म्हणजे महाराष्ट्रसरस्वतीसाठीं हा मराठी काव्याचा भव्य प्रासाद पायापासून कळसापावेतो, श्रीज्ञानदेव, एकनाथ, तुकाराम व रामदास यांनीं निर्माण केला. त्यांत वामन, श्रीधर, मोरोपंत इत्यादिकांनीं क्वचित एकादें दालन जोडलें, कांहीं वातायने व गवाक्षें लाविलीं व अशाच सुखसोई निर्माण केल्या तर शाहिरांनीं त्या प्रासादांतील एखाद-दुसऱ्या दालनांतील भिंतीवर रंगरोगण केलें व कांहीं वेली सुद्धां काढल्या ( मराठी–साहित्य पृ. ३४ ). सारांश, ‘ मराठी काव्यांतील अभिजातयुग ’ हें रसात्मकता व रचनावैचित्र्य या दृष्टीनें हृदयाल्हादक वाटतें.

येथपर्यंत प्राचीन कवि व त्यांनीं दोन युगांत निर्माण केलेली काव्य-संपदा यांचें संक्षिप्त सिंहावलोकन केलें. त्यावरून प्राचीन मराठी काव्यांत तत्त्वज्ञानात्मक, भावगीतात्मक, कथनपर, चरित्रपर व ललित असे पांच काव्यप्रकार आढळतात. भावार्थदीपिका व यथार्थदीपिका ही तत्त्वज्ञानात्मक

काव्यांचीं उदाहरणे असून नामदेव–तुकाराम यांची कविता भावगीतात्मक आहे. महिपति व नाभाजी यांची कविता चरित्रात्मक आहे. कटाव, लावण्या व पोवाडे यांना ललितकाव्यरचनेचा प्रकार म्हणून संबोधावयाला हरकत नाही. प्राचीन मराठी काव्यावर महाभारत, भागवत, भगवद्‌गीता व रामायण या ग्रंथचतुष्टयाचा प्रबल संस्कार झाला आहे. श्री. माधवराव अणे यांनीं म्हटल्याप्रमाणें, ' मराठी कविता ही प्रायशः संस्कृत वाङ्मयांतील रामायण, महाभारत, भागवत व भगवद्गीता या ऐतिहासिक व पौराणिक ग्रंथांवर आणि संतचरित्रें व नाममहिमा यांवर पुष्ट आहे. (आनंदगीत भा. १ प्रस्तावना पृ. १७). प्राचीन मराठी काव्यावर या चार ग्रंथांचा संस्कार झाला असल्यामुळे प्रा. वा. ब. पटवर्धन यांनी त्यावर परभृततेचा आक्षेप घेतला आहे. प्रा. पटवर्धन म्हणतात, " संसाराचा वीट आल्यावर अंतःकरणाची निवृत्तीच्या बाजूनें होणारी उपरति आणि "ब्रह्मानंदीं लागली टाळी। कोण देहातें सांभाळी " अशी स्थिति आमच्या काव्याइतकी दुसऱ्या कोणत्याहि वाङ्मयांत वर्णिलेली मिळणार नाही. हें जितकें खरें तितकेंच संसाराच्या प्रवत्तिपर अंगाचें विविध स्वरूप आणि भाववैचित्र्य इत्यादिकांनीं प्रेरित झालेली कविता आमच्या कवितेंत पहावयाला सांपडत नाहीं. एक भक्ति हा विषय सोडून दिला म्हणजे बाकीची सारी कविता कथनात्मक आहे. व तीहि परपुष्ट आहे ( निबंधरत्नमाला पृ. २४९ ). प्रा. पटवर्धनांनीं, निवृत्तिपरता, कथनात्मकता व परपुष्टता हे प्राचीन काव्यावर आक्षेप घेतले आहेत; पण हे तिन्ही आक्षेप समर्पक वाटत नाहींत. आमचे प्राचीन कवि वैराग्यपर मनोवृत्तीचें ध्येयवादी संत असल्यामुळें त्यांच्या हातून निवृत्तिपर वाङ्मय लिहिलें गेलें आहे. संसारांतील क्षुद्र सुखदुःखांचें वर्णन करण्यांपेक्षां ईश्वराचे स्तवन व संकीर्तन हा उदात्त विषय त्यांनीं काव्याकरितां निवडला. कथनात्मकता हा काव्याचा दोष होऊं शकत नाहीं. कारण सर्वभक्षक कालाच्या कसोटीला उतरून मानवजातीला चिरंतन आनंदाचें एकमेक

निधान झालेलें रामायण, महाभारत, इलियड, ओडेसी, इत्यादि महाकाव्यें कथनपरच नाहींत काय ?. आणि प्राचीन कवींनीं संस्कृत काव्याचा आधार घेतला असला तरी त्यांचें स्वतंत्र प्रतिभातेज त्यामुळें मुळींच लोपलेलें नाहीं हे ज्ञानेश्वरी, मुक्तेश्वरी भारत, आर्याभारत इत्यादि ग्रंथांवरून दिसून येईल. म्हणून प्राचीन मराठी काव्य हें शैशवावस्थेंतील नसून ते परिणतप्रज्ञ-वाणीचें विलासस्थल आहे. केवळ भक्तिरसात्मकतेमुळें त्याला कमी लेख-ण्याचें कारण नाही. इतकेंच नव्हे तर एका भक्तिरसाचा अनेक प्रकारांनीं केलेला आविष्कार जितका मराठी भाषेत आढळतो तितका दुसऱ्या कोण-त्याहि भाषेंत आढळणार नाहीं. यादृष्टीनें भक्तिरसात्मकता हे प्राचीन मराठी काव्याचें अनन्यसाधारण लक्षण म्हणून सांगतां येईल. आधिभौतिक ज्ञानाची कितीहि अभिवृद्धी झाली तरी आध्यात्मिक अभ्युदयाखेरीज मानवजातीला मानसिक आनंद लाभणार नाही. यामुळें प्राचीन मराठी काव्यांत अध्यात्माचा परमोत्कर्ष दृग्गोचर होत असल्यामुळें तें कुणालाहि निर्मल आनंदाचें मंगल निकेतन वाटल्याखेरीज रहाणार नाहीं. अशा प्रकारच्या सात्विक व सोज्ज्वल वाङ्मयाकडे आपण उपहासाच्या व उपेक्षेच्या दृष्टीनें पाहणे सोडून दिले पाहिजे. परिस्थितिपराङ्मुखता हा प्राचीन काव्याचा ठळक दोष आहे हें खरें, पण या दोषाला प्राचीन कवींची परमार्थप्रवणताच कारणीभूत झाली आहे. एकंदरींत, उदात्तता, कळकळ व उत्कटता हे अभिजात काव्याला अवश्यक असणारे गुण प्राचीन काव्यांत आहेत. म्हणून कोणी कितीहि आक्षेप घेतले तरी अच्छोद सरोवराप्रमाणे आल्हादप्रद असलेल्या प्राचीन काव्यांतील सौंदर्याचा आस्वाद अभिजात काव्यरसिक आदरपूर्वक बुद्धीनें अव्याहत घेत राहतील असा आम्हांला दृढ विश्वास वाटतो..

—o—

# प्रकरण ४ थें



## मराठी काव्यांतील अद्‌भुतरम्य युग



कवी सृष्टीचा अलंकार । कवी लक्ष्मीचा शृंगार ।
सकल सिद्धींचा निर्धार । ते हे कवी ॥ —श्रीसमर्थ

प्राचीन मराठी काव्याचा गेल्या दोन प्रकरणांत जो परामर्ष घेतला त्यांत प्राचीन काळीं कोणते प्रमुख कवि झाले, त्यांनीं मराठी भाषेत कोणती भर घातली यांचा थोडक्यांत ऊहापोह केला. आतां आपणांला आंग्ल राजवटी-खालीं मराठी काव्य कोणत्या स्वरूपाचें झालें याचा विचार या प्रकरणांत करावयाचा आहे. राज्यक्रांतीचे काव्यावर फार मोठे परिणाम होतात. राज्यक्रांति झाली म्हणजे सामाजिक आचारविचार, धार्मिक कल्पना, राजकीय विचार यांच्याप्रमाणेंच काव्यप्रांतांतहि स्थित्यंतर होत असतें. फ्रान्सच्या रुधिरप्रदिग्ध राज्यक्रांतीनें आंग्लसाहित्यांत केवढा प्रक्षोभ निर्माण केला हें सर्वांना विदितच आहे. या क्रांतीमुळेंच ड्रायडन—पोपचें कृत्रिम बौद्धिक युग नाहींसें होऊन वर्डस्वर्थ—कॉलरिज यांचे निसर्गप्रधान अद्‌भुत-रम्य (Romantic) युग निर्माण झालें. इतकेंच नव्हे तर फ्रान्स देशांत राजक्रांति झाली नसती व तिच्यामुळें इंग्लंडमध्यें प्रक्षोभाचा प्रभंजन वाहूं लागला नसता तर शेले व बायरन यांच्या प्रतिभा इतक्या प्रज्वलित झाल्या नसत्या असें पाश्चात्य काव्यकोविदांचें मत आहे. प्रा. वा. ब. पटवर्धन यांनीं म्हटल्याप्रमाणें, "सामाजिक, औद्योगिक व धार्मिक स्थित्यंतराप्रमाणें राजकीय स्थित्यंतर हे एकंदर मानवी स्थित्यंतराचें एक अंग आहे. समाजाचा उत्कर्ष किंवा अपकर्ष एकांगी असला तर बाह्यमात्र। उत्कर्ष एकांगीच होतो. त्यांतहि राजकीय घडामोडीचा

काव्योदयाशीं विशेष संबंध असतो असे दिसतें (निबंध-रत्नमाला 'काव्य—काव्योदय' पृ. २३८). इ. स. १८१८ सालीं महाराष्ट्रांत स्वातंत्र्यसूर्याचा अस्त होऊन इंग्रजी राजवट सुरू झाली. इंग्रजी राज्य सुरू झाल्यानंतर महाराष्ट्रांतील सुशिक्षित आंग्लसाहित्याचें परिशीलन करूं लागले व मराठी काव्यहि आंग्लकाव्याप्रमाणेंच आत्मलक्षी (Subjective) असावें अशी प्रवृत्ति निर्माण झाली. यामुळे अध्यात्मविवेचन, कथाकथन, ईशसंकीर्तन हे प्राचीन काव्यविषय मागें पडून अभिनव विषयांचे अर्वाचीन मराठी काव्यांत वर्णन होऊं लागलें. काव्याच्या प्राचीन कल्पना बदलल्या व नवकल्पनांचा उदय होऊं लागला. म्हणून प्रस्तुत प्रकरणांत इंग्रजी राजवटी-खालीं पाश्चात्य साहित्याच्या संस्कारामुळें आधुनिक मराठी काव्याचें स्वरूप विविधविलासप्रवण व वैचित्र्यपूर्ण कसे होत चाललें याचें विहंगमावलोकन करावयाचें आहे.

इंग्रजी राज्याला सुरवात झाल्यानंतर मराठी काव्याचा प्रवाह बदलण्याला सुरवात झाली. तथापि अध्यात्मिक कवितेचे अवशेष समूळ नष्ट झाले नव्हते. हंसराज (१७९८–१८९५) या साधु कवींनीं आपलें सर्व आयुष्य वेदांतपर काव्यरचना करण्यांत व्यतीत केलें. जुन्या काव्यांतील वेदांत व पौराणिक कथा हे विषय जाऊन तत्कालीन शास्त्रीपंडितांनीं संस्कृत काव्यनाटकांचीं भाषांतरें व रूपांतरें करण्याला सुरवात केली. अध्यात्माच्या पर्णकुटिकेंत रममाण झालेली महाराष्ट्रशारदा या काळांत संस्कृत काव्यनाटकांच्या पुष्पवाटिकेंत विहार करूं लागली. त्यावेळचे शास्त्रीं संस्कृतभाषेंत निष्णात असल्यामुळें त्यांनीं त्या भाषेंतील काव्यावर 'देशीकार देणें' चढविलें. अशा पंडितांत परशुरामपंत तात्या यांचा प्रारंभीं उल्लेख केला पाहिजे. परशुरामपंत तात्या हे इ. स. १७९९ सालीं श्रीक्षेत्र वाई येथें जन्मले. लहानपणींचें त्यांचें शिक्षण वाई येथें झाल्यावर रा. रा. नारायणशास्त्री देव यांच्याजवळ त्यांनीं संस्कृतभाषेचा अभ्यास

केला. त्यांची काव्यशक्ति लहानपणींच अंकुरित झाली व उत्तरोत्तर ती वृद्धिंगत झाल्यामुळें तें प्रारंभीं कवि म्हणून प्रसिद्धीला आलें. सरकारी शिक्षण-परिषदेनें मराठी भाषेचा कोश तयार करण्यासाठीं जे शास्त्रीमंडळ नेमले त्यांत त्यांची योजना केली. पुढें परशुरामपंत तात्यांनीं प्राचीन मराठी काव्यांतील वेंचे निवडून काढून ते 'नवनीत' या नांवानें प्रसिद्ध केले. पालग्रेव्हच्या हेमकोशाप्रमाणेंच ( Golden Treasury ) तात्यांचा 'नवनीत' हा ग्रंथ झाला आहे. या ग्रंथाच्याद्वारें त्यांनीं महाराष्ट्रवाचकांना मराठी काव्याचे सौंदर्य निदर्शनाला आणून देण्याचे स्पृहणीय कार्य उत्कृष्ट रीतीनें केले आहे. त्यानंतर त्यांनीं 'उत्तररामचरित्र', 'वेणीसंहार', 'मृच्छकटिक', 'शाकुंतल' या नाटकांन्नीं भाषांतरें केलीं. पुढे माधव चंद्रोबाच्या सर्वसंग्रहाचें संपादकत्वहि तात्यांच्याकडेच होतें. त्यांची मयूरकाव्यावर निस्सीम भक्ति होती व मयूरकवीच्या केकावलींतील हृद्गत त्यांनीं 'केकादर्श' या ग्रंथांत प्रगट केलें आहे. याशिवाय त्यांनीं बालबोधामृत, वृत्तदर्पण, मराठ्यांच्या इतिहासावरील स्फुट काव्यें, नामार्थदीपिका हे ग्रंथ प्रसिद्ध केले. परशुराम-पंत तात्या यांच्या काव्यांत प्रसाद हा गुण ओतप्रोत भरला आहे. आधुनिक मराठी काव्यांत भाषांतरित काव्यरचनेचा उगम त्यांच्याच पासून झाला असें म्हणावयास हरकत नाहीं. भाषांतर करण्याची संवय स्वतंत्र काव्य-निर्मितीला विघातक असते. इंग्रजांचें दास्य पतकरल्यानंतर तत्कालीन ग्रंथकारांचें स्वतंत्रप्रज्ञत्व नाहींसे होऊन त्यांनी बौद्धिक दास्यहि स्वीकारले. ही भाषांतराची प्रथा इंग्रजी राज्याच्या सुरवातीला जी सुरू झाली ती पुढें बराच काळ मराठी काव्यांत दृग्गोचर होते. म्हणून परशुरामपंत तात्या यांनीं भाषांतरापेक्षां स्वतंत्र ग्रंथनिर्मितीकडे लक्ष पुरविलें असतें तर अधिक बरें झालें असतें, असें वाटल्यावांचून रहात नाहीं. सारांश, अव्वल इंग्रजींत मराठी भाषेची अखंड उपासना करणाऱ्या कवींत परशुरामपंत तात्या हे आदरणीय कवि होऊन गेले.

परशुरामपंत तात्या गोडबोले यांच्यापेक्षां कृष्णशास्त्री चिपळुणकर यांची कविता अधिक रमणीय आहे. कृष्णशास्त्री यांचा जन्म इ. स. १८२४ मध्यें पुणें येथें झाला. त्यांचे वडील हरिपंत यांनी त्यांच्याकडून लहानपणींच वेदाभ्यास करविला. कृष्णशास्त्र्यांची बुद्धि अलौकिक असल्या-मुळें त्यांचे गुरु मोरशास्त्री साठे त्यांना 'बृहस्पति' असे म्हणत असत. तर्कशास्त्राच्या तपोवनापासून तो काव्यशास्त्राच्या कुसुमवाटिकेपर्यंत त्यांची प्रखर प्रज्ञा सलील विहार करीत असे. पुढे इंग्रजी शिक्षण पूर्ण झाल्यावर त्यांनीं सरकारी नोकरी पतकरली व ते अनुक्रमे भाषांतरकार, ट्रेनिंग कॉलेजचें 'प्रिन्सिपॉल' झाले. कृष्णशास्त्री हे गद्य व पद्य हीं दोन्हीं लिहि-ण्यांत सारखेच कुशल होते. पाश्चात्यविद्येचें परिशीलन केल्यावर त्यांच्या वरील वेदाध्ययनाचे सर्व संस्कार लुप्त होऊन ते नास्तिक बनले. शास्त्री-बुवांच्या ठिकाणीं अगाध विद्वत्त्व, अभिजात कवित्व व अस्खलित वक्तृत्व यांचे मनोज्ञ मिश्रण झालें होते. त्यांचा 'पद्यरत्नावलि' हा चिमुकला काव्यसंग्रह चारुगुणी आहे. त्यांनीं कालिदासाच्या 'मेघदूताचे' केलेलें साकीबद्ध रूपांतर सहजसुंदर आहे. मराठी भाषेत 'मेघदूताचीं' जितकीं भाषांतरें झालीं आहेत त्यांत शास्त्रीबुवांच्याच मेघदूताला अग्रपूजेचा मान द्यावा लागेल. मेघदूताप्रमाणेच जगन्नाथपंडितांच्या करुणविलासाचें 'विरही-विलाप' हें भाषांतरहि उत्कृष्ट साधलें आहे. मूळ काव्याचा कर्ता व भाषां-तरकर्ता यांच्यांत समानधर्मत्व असेल तर भाषांतर किती सरस होऊं शकतें याचें 'विरहिविलाप' हें उत्कृष्ट उदाहरण आहे. 'अन्योक्ति–कलाप' या काव्यांत सुभाषित शारंगधर या ग्रंथाच्या आधारें अन्योक्ति लिहिल्या आहेत. पद्यरत्नावलीतील काव्यें हीं शब्दशः भाषांतरें नाहींत. तर त्यांनींच सांगित-ल्याप्रमाणें, 'मुळांतील मार्मिक व सरस अर्थ सर्व यांत आणण्याचा प्रयत्न केला आहे व कोठें कोठें वृत्ताच्या यमकाच्या अनुरोधानें वगैरे मुळापेक्षां कमी अथवा जास्त अर्थ झाला तरी तसें करण्यांत रसहानि न होण्याविषयीं

राखवली तितकी तजवीज राखली आहे. [ पद्यरत्नावलि पृ. २१ ]. ‘ विद्याप्रशंसा ’ हें काव्य आर्याबद्ध असून त्यांत विद्येची महति गाइली आहे. ‘प्रश्नोत्तरमाला’ हें काव्यहि आर्याबद्ध आहे. सारांश, कृष्णशास्त्र्यांच्या ‘ पद्यरत्नावलींत जरी प्रतिभाविलास नसला तरी प्रसाद व माधुर्य यांचा मोहक मिलाफ झाला आहे. म्हणून तत्कालीन कविमंडळांत कवित्वाच्या दृष्टीनें कृष्णशास्त्री चिपळुणकर हेच अग्रेसर आहेत असें म्हटल्यास त्यांत अतिशयोक्ति होणार नाहीं.

कृष्णशास्त्री चिपळूणकर यांच्या समकालीन असलेले दुसरे प्रसिद्ध कवि म्हणजे गणेशशास्त्री लेले हे होत. हे कवि गोदावरीच्या उगमावरील श्रीक्षेत्र त्र्यंबकेश्वर येथें इ. स. १८२५ या वर्षी जन्मले. मराठी शिक्षण त्र्यंबकेश्वर येथे झाल्यावर पुढें त्यांनीं ‘ एल्फिस्टन विद्यालयांत’ प्रवेश केला. गणेशशास्त्री हे व्युत्पन्न, वक्तृत्वकुशल व वाङ्मयकोविंद कवि होते. त्यांनीं कालिदासांच्या ‘ रघुवंशाचें ’ समग्र भाषांतर केलें आहे. मराठी भाषेंत ‘ रघुवंशाचीं ’ जीं भाषांतरें उपलब्ध आहेत त्यांत लेलेशास्त्री यांचें भाषांतरच चांगलें आहे. त्याशिवाय त्यांनीं शिवाजीचरित्र, गंगाचरित्र, शिवस्तुति, कृष्णाकुमारी, महिम्नस्तोत्र हे ग्रंथ लिहिलें. त्यांपैकीं ‘ शिवाजी व कृष्णा-कुमारी ’ ही ऐतिहासिक काव्यें उल्लेखनीय आहेत. त्यांचीं काव्यरचना प्रौढ असून क्वचित क्लिष्ट असली तरी एकंदरींत प्रसन्न आहे. गणेशशास्त्री लेले यांच्या प्रमाणेच पांडुरंगशास्त्री पारखी हेहि प्रसिद्ध कवि होते. हे सुमारें १३ वर्षांचे झाल्यावर आपल्या वडिलाजवळ अध्ययन करूं लागले. कांहीं काळ सरकारी नोकरी केल्यावर डॉ. भांडारकर यांच्या हाताखालीं त्यांनीं शास्त्री या नात्यानें चांगलें काम केलें. पारखी शास्त्री यांनीं अनेक गद्यग्रंथ लिहिले असून त्यांच्या ‘ बाणभट्टा ’वरील निबंधाची लो. टिळकांनीं प्रशंसा केली आहे. पारखी हे संस्कृत व मराठी या दोन्ही भाषेंत काव्यरचना करण्यांत सारखेच कुशल होते. त्यांनीं ‘ षड्ऋतुवर्णन ’ ‘ कृष्णाकुमारी ’

'बोधामृत' ही काव्यें लिहिलीं आहेत. त्यांपैकी 'षड्ऋतुवर्णन' हें काव्य सुश्लिष्ट आहे. पारखी यांच्या काव्यांत श्लेषरचनेचे वैपुल्य असल्यामुळें त्याला क्वचित क्लिष्टता आली आहे. पारखी यांच्या बरोबरच कृष्णशास्त्री राजवाडे यांचाहि उल्लेख करितां येईल. राजवाडे हे व्युत्पन्न रसिक होते. त्यांनीं 'मुद्राराक्षस' या नाटकाचें भाषांतर केले असून 'षड्ऋतुवर्णन' हें काव्य लिहिले आहे. कृष्णशास्त्री राजवाडे यांच्या या काव्यापेक्षां पारखी-शास्त्र्यांचें 'षड्ऋतुवर्णन' अधिक बरें वाटतें. सारांश, या तीन शास्त्री कवींनीं संस्कृत भाषेंतील ग्रंथांचीं भाषांतरे करण्याची परंपरा कायम ठेवून अलंकारमंडित काव्यरचना केली असे म्हणतां येईल.

हे तीन शास्त्री जितके पंडितकवि तितकेच राजा सर. टी. माधवराव हे ( १८२८–१८९१ ) राजकार्यधुरंधर कवि होते. यांचा विद्याभ्यास मद्रासच्या हायस्कूलमध्ये झाला. हे कवि मोठे राजनीतिनिपुण असून फावल्यावेळी काव्योपासनेची त्यांना आवड होती. त्यांची कविता दोन भागांत छापली असून ती सर्व आर्यावृत्तांत आहे. त्यांचें मराठी भाषेवर प्रभुत्व नसल्यानें त्यांची कविता फारसी वरच्या दर्जाची वाटत नाहीं. तथापि त्यांनीं आपल्या कुटुंबाविषयीं लिहिलेल्या आर्या हृदयस्पर्शी आहेत. या काव्यांत त्यांनीं आपल्या सुखद संसाराचे सुंदर वर्णन केलें असून आपल्या गुणवती गृहिणीविषयीं, '**ऐशी भार्या दिधली यास्तव देवा कितीच वंदावें। निस्सीम सौख्य पाहुनि राहिन मी स्तुति करीत सद्भावें**' असे प्रेमलोद्गार काढले आहेत. याशिवाय त्यांनीं कांहीं प्रासंगिक कविता लिहिल्या आहेत. सर टी. माधवराव हे राजनीतिनिपुण होते तर बापूसाहेब कुरुंदवाडकर हे राजघराण्यांतील कवि होते. त्यांच्या ठिकाणीं श्री व सरस्वती यांचा स्पृहणीय संगम झाला होता. त्यांनीं लहानपणींच संस्कृत भाषेचें इतकें चांगलें परिशीलन केलें कीं तें विद्वानांशीं त्या भाषेंत वाद-विवाद करीत असत. त्यांनीं 'गंगावर्णन', 'गणेशपुराण' व 'भट्टवंशकाव्य'

हीं तीन विस्तृत काव्यें लिहिलीं आहेत. त्यांपैकीं ‘ गंगावर्णन ’ हें काव्य अधिक बरें आहे. मयूरकवीच्या काव्यावर बापूसाहेबांची अतीव भक्ति असल्यामुळे त्यांनीं हीं तीन्हीं काव्यें आर्यावृत्तांत लिहिलीं आहेत. त्यांच्या काव्यरचनेंत प्रौढत्व असलें तरी शब्दशय्येचे मार्दव नसल्यामुळे त्यांची कविता क्लिष्ट वाटते. तथापि गर्भश्रीमंत अशा राजघराण्यांत जन्माला येऊन त्यांनी एवढें काव्यप्रणयनपटुत्व प्रगट केलें याबद्दल त्यांचें कोणीहि कौतुकच करील. याच ठिकाणीं, भास्कर दामोदर पाळंदे (इ. स. १८३२–७४) या प्रार्थनासमाजी कवीच्या भक्तिपर ‘रत्नमालेचाहि’ उल्लेख करावयाला हरकत नाहीं. पाळंदे यांच्या ‘ रत्नमालेंत ’ ईशस्तुतिपर पदांचा संग्रह केला असून त्यांत कवीची भक्त्युत्कटता उत्कृष्टपणें दिसून येते.

अशा रीतीनें संस्कृत भाषेचा मराठी काव्यावर प्रबळ संस्कार होत असतांना त्याचा इंग्रजी भाषेशीं संबंध येऊं लागला. इ. स. १८५७ सालीं मुंबई विश्वविद्यालयाची स्थापना झाली व त्यांतून बाहेर पडलेल्या पदवी-धरांनीं आंग्लकाव्याचें परिशीलन केलें होतें. त्यामुळें मराठी काव्यावर आंग्ल भाषेचा परिणाम होणें अपरिहार्य होतें. मिल्टनचें ‘Paradise Lost’ हें महाकाव्य डोळ्यापुढें ठेवून कुंटे यांनीं ‘राजा शिवाजी’ हें काव्य लिहिलें. महादेव मोरेश्वर कुंटे (इ. स. १८३५-८८) हे तत्कालीन समाजांत विद्वत्ता व वक्तृत्व या गुणांनीं प्रख्यात होते. बी. ए. झाल्यानंतर त्यांनीं कोल्हापूर येथील राजाराम हायस्कूलमध्यें मुख्याध्यापकाची नोकरी केली व पुढें पुणें येथील सरकारी हायस्कूलचे ते मुख्याध्यापक झाले. त्यांचा ‘आर्य संस्कृतीचीं स्थित्यंतरें, (Vicissitudes of Aryan Civilization) हा ग्रंथ पांडित्यप्रचुर आहे. कुंटे यांनीं ‘ राजाराम महाराज,’ ‘ राजा शिवाजी ’ व ‘ मन ’ हीं तीन काव्यें लिहिलीं. त्यांपैकीं ‘ राजा शिवाजी ’ या महाकाव्यानें त्यावेळीं अतोनात खळबळ उडवून दिली. कुंटे यांचा हें काव्य लिहिण्यांत मराठी काव्याला सुबोधता आणण्याचा मुख्य हेतु होता. म्हणून या काव्याला

लिहिलेल्या इंग्रजी प्रस्तावनेंत त्यांनीं वामन-मोरोपंतादि कवींवर प्रखर टीका केली आहे. त्यांच्या मतें काव्य हें राष्ट्रांतील सुशिक्षित–अशिक्षित या सर्वांना समजेल असें पाहिजे. यासाठीं कवींनीं भाषा ही साधी व स्पष्ट वापरली पाहिजे. या त्यांच्या मतानुसार त्यांनी 'राजा शिवाजी' या काव्यांत अगदीं व्यवहारांतले रसापकर्षक शब्द वापरले आहेत. तत्कालीन कविमनांवर संस्कृत भाषेचा जो प्रबल संस्कार होता तो कमी होऊन स्वाभाविक काव्यरचना करावी हा कुंटे यांचा प्रयत्न स्तुत्य होता. पण त्यांची काव्यप्रतिभा उज्ज्वल नसल्यामुळे त्यांचा हा प्रयत्न उपहासनीय झाला. 'राजा शिवाजी' या प्रदीर्घ काव्यांत, वाळवंटांत क्वचित आढळणाऱ्या हिरवळीप्रमाणें, काव्यमय स्थळें फार थोडीं आहेत. अशी खरी स्थिति असल्यामुळें मालाकारांनीं या काव्याचा अधिक्षेप केल्यामुळें हें काव्य मागें पडलें या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. त्यांच्या 'मन' या कवितेंतहि फारसा कावित्वगुण दृग्गोचर होत नाहीं. परंतु इंग्रजी काव्याचा संस्कार मराठी काव्यावर होऊं लागला याचें हीं काव्ये उत्कृष्ट निदर्शक आहेत. यामुळें संस्कृत काव्य-नाटकांचीं भाषांतरें मागे पडून इंग्रजी काव्याचीं भाषांतरें करण्याची प्रवृत्ति बळावली. अशा प्रकारचें इंग्रजी काव्याला 'मराठी लेणें' चढविणारे पहिले कवि बजाबा रामचंद्र प्रधान (१८३८–८६) हें होत. त्यांनीं सर वाल्टर स्कॉटच्या 'लेडी ऑफ दि लेक' (Lady of the Lake) या काव्याच्या आधारें 'देवसेनी' हे काव्य लिहिलें. हें काव्य रूपांतरित असलें तरी रचनेच्या दृष्टीनें बऱ्यापैकीं आहे. यांचें कारण कुंटे यांच्या मताचा स्वीकार प्रधान यांनी केला नाहीं हें होय. अंत:करणाला आल्हादित करणाऱ्या काव्याची भाषा अलंकारिक व औचित्यपूर्ण असली पाहिजे हें तत्त्व प्रधान यांच्या डोळ्यापुढें होतें. सारांश, कुंटे आणि प्रधान यांच्या काव्यांवरून मराठीं कविता हीं आंग्ल–काव्योपवनांत विहार करूं लागली असें म्हणावयास हरकत नाहीं.

इंग्रजी काव्यांची भाषांतरें करण्याची जी प्रथा पडली ती मराठी भाषेंत पुष्कळ काळ टिकली. इंग्रजी काव्यांची यशस्वीं भाषांतरे करणाऱ्या कवींत कीर्तिकरांची ( इ. स. १८४९–१९१८ ) प्रामुख्याने गणना केली पाहिजे. त्यांनीं इग्लंडमध्यें आंग्लवैद्यकीचा अभ्यास केला व पुढे हिंदुस्थानात आल्यावर ठिकठिकाणीं मोठ्या हुद्यांची कामे केलीं. इ. स. १९०७ मध्यें जळगांव येथे भरलेल्या पहिल्या कविसंमेलनाच्या अध्यक्षपदाचा बहुमान त्यांना मिळाला होता. त्यांनी ' भक्तिसुधा, ' ' विलापलहरी ' व ' इंदिरा ' हीं काव्ये लिहिलीं आहेत. त्यांपैकीं ' इंदिरा ' हे काव्य टेनिसनच्या ' Princess ' या काव्याचें रूपांतर आहे. प्रधानांच्या ' देवसेनेप्रमाणेच ' ' इंदिरा ' काव्यहि चांगले आहे. ' विलापलहरी ' हे काव्य पत्नी-विलापपर असून त्यांत करुण रसाचा परिपोष झाला आहे. विष्णु मोरेश्वर महाजनी ( इ. स. १८५१–१९२३ ) यांनीं आंग्लसाहित्यांतील स्फुटगीतांची भाषांतरें करण्याला सुरवात केली. महाजनी हे केवळ कविच नव्हेत तर नामांकित विद्वान व सहृदय टिकाकार होते. विविधज्ञानविस्तारांत त्यांचें परीक्षणा–त्मक निबंध प्रसिद्ध झाले आहेत. महाजनींनीं इंग्रजी भाषेंतील शेले, वर्ड्‌सवर्थ, टेनिसन प्रभृति कवींच्या भावगीतांचीं रूपांतरे करून त्यांची ' कुसुमांजली ' महाराष्ट्रशारदेच्या चरणीं वाहिली. त्यांची ' कुसुमांजलि ' रूपांतरित असली तरी प्रसादयुक्त असल्यामुळे आल्हादप्रद वाटते. मराठी काव्यांतील ' अद्‌भुतरम्य युगाचा ' पुढें केशवसुतांनीं विकास केला असला तरी त्याचा उगम ' कुसुमांजलींत ' आढळतो. महाजनीप्रमाणेंच थोडी भाषांतरित व थोडी स्वतंत्र अशी काव्यरचना करणाऱ्या कवींत गोविंद वासुदेव कानिटकर ( इ. स. १८५४–१९१७ ) यांची गणना केली पाहिजे. त्यांनीं ' अकबर ' ' नारायण पेशवे, ' ' कृष्णाकुमारी ' हीं ऐतिहासिक काव्यें लिहिलीं. त्यांचें ' संमोहलहरी ' हें काव्य तात्त्विक आहे. त्याशिवाय त्यांनीं निरनिराळ्या मासिकांतून भावगीतात्मक पद्यरचना प्रसिद्ध

केली. महाजनींच्या ' कुसुमांजलीत अक्षरवृत्ते असून कानिटकरांच्या गीतांत मात्रावृत्तात्मक पदांचा अवलंब केला आहे. याचवेळी अण्णासाहेब किर्लोस्कर यांचीं नाटकें रंगभूमीवर आली व त्यांतील पदांच्या कर्णमनोहर चालींचा उपयोग मराठी काव्यांत होऊ लागला. या श्रुतिसुभग पद्यरचनेमुळें कानिटकरांच्या स्फुटगीतांना आकर्षकता प्राप्त झाली आहे. अशाप्रकारें मराठी कविता ही अजूनहि परभृतच होती. कृष्णशास्त्री व लेले प्रभृतींनीं संस्कृत काव्यांचीं भाषांतरें केलीं तर प्रधान–महाजनींनीं इंग्रजी काव्यांचीं भाषांतरें केलीं. विशेषतः महाजनी–कानिटकरांनीं वैणिकरचनेतील (Lyrical Poetry) माधुर्य महाराष्ट्र वाचकांच्या प्रतीतीला आणून देण्याचे कार्य केले. सारांश, या कवींच्या काव्यांत स्वतंत्र प्रतिभेचे स्वैर विलास जरी दृग्गोचर होत नाहींत तरी त्यांची कामगिरी अगदींच उपेक्षणीय नाहीं.

संस्कृत व इंग्रजी काव्यांची भाषांतरे होत असतां ज्यांनीं स्वतंत्र काव्यरचनेकडे आपले लक्ष वळविलें अशा कवींत प्रारंभी लेंभे यांचा नामोल्लेख केला पाहिजे. विठ्ठल भगवंत लेंभे (इ. स. १८५०–१९२०) यांना घरच्या गरिबीमुळें शाळेंतील शिक्षणक्रम सोडून लहानपणी रेल्वे-खात्यांत नोकरी पतकरावी लागली. त्यांनीं संस्कृत साहित्याचे सूक्ष्म व सखोल अध्ययन केलें होतें. त्यांच्या दुःखमय व दारिद्र्यपूर्ण जीवनांत काव्यदेवतेनेंच त्यांना समाधानाचा व सौंदर्याचा लाभ करून दिला. लेंभे यांनीं सुरतरंगिणी, शोकावर्त, खंडिता हीं खंडकाव्ये लिहिलीं असून स्फुट कविताहि विपुल लिहिली आहे. आधुनिक कवींत स्वतंत्र खंडकाव्यें लिहिण्याचें श्रेय लेंभे यांनाच दिलें पाहिजे. लेंभे यांच्या काव्यांतील मृदुललित शब्दशय्येचें मनोज्ञ माधुर्य पराकाष्ठेचें श्रुतिसुखद वाटतें. त्यांनीं वामन व विठ्ठल यांची सुश्लिष्ट रचना करण्याची परंपरा आधुनिक काव्यांत अव्याहत पणें चालविली. त्यांच्या काव्यांत कल्पकता नसली तरी मराठी भाषेचें

सुललित व सालंकार स्वरूप त्यांत उत्कृष्टपणें प्रत्ययाला येतें. माडखोलकर यांनीं म्हटल्याप्रमाणें, ‘ एकोणिसाव्या शतकांत परवश झालेल्या मराठी कवितेला स्वतंत्र, सुंदर व शुद्ध वळण लावण्याचा यत्न करून ज्यांनीं तिची श्रीमंती वाढविली त्या अभिजात कवींत लेंभे यांची गणना पुढील पिढ्या निःसंशय करतील. (प्रस्तावना), म्हणून कविवर्य चंद्रशेखर यांनीं त्यांच्या कवितेचें—

ही येतांच उठोनि कौतुक जणो नेत्रांतुनी पाहते
धांवोनि अवधान ये लगबगा कानीं उभे राहतें
देण्याला बहुमान मान लवते उल्हास ये मानसा
वाटे आज शरत्प्रभात नटुनी ही येतसे राजसा !

असें समर्पक वर्णन केले आहे.

लेंभे यांच्याबरोबर १८५० सालीं जन्मलेले असे शिवराम कृष्ण नित्सुरे यांचाहि उल्लेख केला पाहिजे. त्यांनीं ‘विद्या–महिमा’ व ‘धनप्रशंसा’ हीं काव्यें लिहिलीं असून त्यांत वैशिष्ट्य असें फारसें नाहीं. सारांश लेंभे व नित्सुरे यांनीं भाषांतरें न करतां स्वतंत्र काव्यनिर्मितीकडे अधिक लक्ष पुरविलें.

नित्सुरे यांच्याप्रमाणेंच चिंतामणी पेटकर ( इ. स. १८५९–७९ ) हे अल्पायुषी कवि होऊन गेले. पांडुरंग व्यंकटेश चिंतामणी पेटकर हे बाल्यापासून बुद्धिमान् विद्यार्थी असल्यामुळें १८६८ सालीं त्यांना प्रवेश-परीक्षेंत शंकरशेट स्कॉलर्शिप मिळाली. १८७४ साली हे बी. ए. झाले व पुढें सरकारी नोकरींत ते डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टरचें हुद्यापर्यंत चढले. ते बहुभाषाकोविद असून त्यांना मराठी, कानडी, ऊर्दु, गुजराथी व इंग्रजी या भाषा चांगल्या येत. अस्खलित वक्तृत्वाविषयींहि त्यांचा लौकिक होता. त्यांनीं ‘ गंगावर्णना ’ हें एकच सुंदर काव्य लिहिलें असून निबंध-मालेंत या काव्याची स्तुति मालाकारांनीं केली आहे. ‘ गंगावर्णना ’ या काव्याच्या वाक्सरितेंत उदात्त विचारांचे तरंग देशाभिमानाच्या दीप्तीनें

झळकत आहेत. सारांश, चिंतामणी पेटकर यांनी 'गंगावर्णना' हें सरस व सोज्ज्वल काव्य लिहून अर्वाचीन मराठी काव्यांत स्पृहणीय भर टाकली आहे.

चिंतामणी पेटकर यांच्यानंतर आपण कृष्णाजी नारायण अठल्ये यांच्याकडे वळूं. लहानपणीं त्यांनीं वेदाभ्यास केला होता; व रोझेटीप्रमाणें काव्य व चित्र या दोन्ही कला त्यांना वश होत्या. मलबारांतील कांहीं गृहस्थांच्या प्रोत्साहनानें त्यांनीं 'केरळकोकिळ' हें मासिक काढलें. श्रीमत् शंकराचार्य यांच्याकडून त्यांना 'महाराष्ट्रभाषा-चित्रमयूर' ही पदवी मिळाली. त्यांच्या कवितेंत पदलालित्य हाच प्रमुख गुण आहे. त्यांची 'भीमकर्मा राघोबा' यासारखीं ऐतिहासिक काव्यें केवळ शब्दचमत्कृतीमुळे श्रुतिसुखद वाटतात. त्यांचा 'दारूचा फटका' चांगला आहे. अठल्ये हे चतुरस्त्र लेखक व चित्रकाव्यरचनापटु असे संपादक होते यांत शंका नाहीं. १८५२ सालीं जन्मलेले दुसरे पंडितकवि म्हणजे गणेश जनार्दन आगाशे हे होत. आगाशे (१८५२–१९१९) हे शिक्षण खात्यांत प्रमुख अधिकारी असून त्यांना तत्कालीन साहित्यिकांत मान असे. इंदूरच्या नवव्या संमेलनाचें ते अध्यक्ष होते. आगाशे हे पंडितकवि असून त्यांच्या काव्यांत प्रतिभा व प्रसाद यांच्यापेक्षां पांडित्यच अधिक प्रभावी असल्याचें प्रत्ययाला येतें. स्फुट काव्यापेक्षां त्यांचीं वैलापिक काव्यें अधिक प्रसिद्ध आहेत. सारांश, आगाशे यांनीं वैलापिक काव्यरचनेच्या प्रगतीला हातभार लावला व पांडित्यप्रचुर काव्याची परंपरा चालू ठेविली. आगाशे यांच्याबरोबरच हरि कृष्ण दामले यांचाहि उल्लेख करतां येईल. दामले यांनीं 'पार्वती–प्रकोप' हें पौराणिक काव्य लिहिलें. मोरो गणेश लोंढे (इ. स. १८५४–१९२०) यांनीं स्फुट कविता पुष्कळच लिहिली आहे. त्यांची बोधशतक, बोधसुधा, बोधमाला, पुष्पगुच्छ, पुष्पावलि, पुष्पमाला हीं काव्याचीं लघु पुस्तकें प्रसिद्ध आहेत. बोधप्रदता हा लोंढे यांच्या काव्याचा प्रमुख गुण आहे. लोंढे यांच्यापेक्षां बळवंत जनार्दन

करंदीकर (१८५५-१९०३) यांची कविता अधिक उच्च दर्जाची आहे. त्यांच्या 'प्रेमालेख्य' या प्रसन्नरमणीय काव्याची मराठी भाषेंतील उत्कृष्ट खंडकाव्यांत गणना केली पाहिजे. आगाशे यांच्या प्रमाणें पुरुषोत्तम बाळकृष्ण जोशी हे पंडितकवि होते. त्यांनीं 'मुक्तावलि,' पद्यसुधा, समाधिशतावलि, शिवदुःखाश्रुमार्जन व आनंदोद्गार इत्यादि काव्ये लिहिलीं आहेत. या कवींच्या काव्यांत सुबोध पद्यरचनेशिवाय फारसे वैशिष्ट्य आढळत नाहीं.

तथापि या सर्वांपेक्षां गंगाधर रामचंद्र मोगरे (इ. स. १८५८-१९२०) हे श्रेष्ठ कवि होत. त्यांचे शिक्षण मुंबई येथील एल्फिस्टन हायस्कूल मध्ये झाले व पुढे त्यांनीं 'रॉयल एशीआटिक सोसायटीच्या ग्रंथालयांत नोकरी पतकरली. मोगरे यांनीं काव्यदेवतेची अखंड उपासना करून तत्कालीन कविमंडळांत अग्रेसरत्व प्राप्त करून घेतलें. त्यांच्या काव्याचे पांच खंड प्रसिद्ध असून त्याला ह. ना. आपटे, अ. शि. साठे, प्रो. लेले, प्रभृति रसिकाग्रणींनीं गुणग्राही प्रस्तावना लिहिल्या आहेत. मोगरे यांनीं आर्या-वृत्ताचा कुशलतेनें उपयोग केल्यामुळे त्यांना 'आर्यापति' असे म्हटले जाते. प्रो. लेलेशास्त्री यांनीं म्हटल्याप्रमाणें, 'वासंतिक मंद पवनानें आंदोलित झालेल्या मंदारमंजरीच्या मरंदाप्रमाणें मंजुगुंजारव करणाऱ्या मिलिंदाशीं मोगऱ्यांचें बरेंच सादृश्य आहे.' त्यांनीं वैलापिक व विडंबनात्मक या दोन्ही प्रकारच्या काव्यरचनेंत सारखेंच चातुर्य व्यक्त केले आहे. इंग्रजी व संस्कृत या दोन्हीं काव्यांचे सुभग संस्कार मोगरे यांच्या मनावर झाले होते. तथापि त्यांनीं प्राचीन काव्याचें अभिजात वळण सोडले नाहीं. मोगरे यांची प्रतिभा विषयलक्षी (objective) असून कथनपर असल्यामुळें त्यांच्या हातून आत्मपर भावगीते लिहिलीं गेलीं आहेत. ना. म. भिडे यांनीं म्हटल्याप्रमाणे "मोरोपंती, चिपळूणकरी आणि केशवसुती या निरनिराळ्या तीन युगांचे प्रकार-विशेष मोगऱ्यांच्या कवितेंत अनु-

भवावयाला सांपडतात. हे प्रकारभेद ह्मणजे भाषाप्रभुत्व, प्रसाद व भावनाप्रकर्ष हे होत (काव्यचर्चा पृ. ४३५). मराठी भाषेविषयींचा अत्युत्कट अभिमान त्यांच्या 'मराठी ग्रंथकारांस प्रार्थना' या काव्यांत प्रगट झाला आहे. एकंदरींनें, मोगरे हे कथनपर व कलाभिज्ञ असे अभिजात कवि होते असें एकाच वाक्यांत त्यांचे वर्णन करितां येईल. मराठी काव्याचें जुने वळण कायम ठेवून पाश्चात्य काव्याच्या रुचिर संस्कारानें त्यांनीं प्रसन्न काव्यनिर्मिती केली. हरिभाऊ आपटे यांनी म्हटल्याप्रमाणें, " मोगरे यांच्या काव्यांत गरुडभराऱ्या व चंडोल लकेऱ्या नाहीत. भ्रमरगुंजारव किंवा कोकिलकूजितें आहे (मो. फु. भा. ३ प्रस्तावना). सारांश स्वदेश, स्वधर्म व स्वभाषा ' यांचा अभिमान बाळगून मोगरे यांनीं आपल्या अभिजात काव्याच्याद्वारें अभिनव व अभिमत विचारांचा प्रसार करण्याचें अनन्यसाधारण कार्य आजन्म केलें, यांत शंका नाहीं. म्हणून मोगऱ्यांचीं कविता ही मोगऱ्याच्या फुलाप्रमाणेच विमलमोहक व विलोभनीय आहे. कै. लक्ष्मीसुता यांनी त्यांच्या कवितेचें केलेले,

कवित्व रचना बहू सुगम गोड शब्दावली
वहात सरिता जणूं सहज शांत ती चालली
प्रसाद प्रतिभायुता दिसत ही कवीची सुता
विवाहसमयीं जशी धनकजाचि सालंकृता.

हें वर्णन कुणाला समर्पक वाटणार नाहीं ?

मोगरे यांच्यानंतर वासुदेव वामन खरे या सत्कवीचा उल्लेख करणें क्रमप्राप्त आहे. त्यांनीं लहानपणी मोरोपंताच्या काव्याचा अभ्यास केल्यामुळें त्यांना काव्यरचनेची गोडी लागली. शास्त्रीबुवांनीं इतिहाससंशोधनाचें कार्य पंचवीस वर्षें करून नामांकित इतिहाससंशोधक अशी कीर्ति मिळविली. खरे शास्त्र्यांनीं नाटकें लिहून नाट्यवाङ्मयांतहि उत्कृष्ट भर घातली आहे. तथापि 'यशवंतराय' महाकाव्य हें त्यांच्या काव्यप्रतिभेचें

मधुर फल होय. संस्कृतसाहित्यांतील महाकाव्याचें नियम डोळ्यापुढें ठेवून शास्त्रीबुवांनीं हें काव्य लिहिलें आहे. हें महाकाव्य प्रसादरम्य आहे. म्हणून कै.अनंततनय कवींनीं 'यशवंतराय महाकाव्य' । तया ग्रंथा हें नांव। सोज्ज्वल कविता अभिनव । पहावी वाचोनि आदरें. (हृदयतरंग भा. ३. पृ. ४९). असे उद्गार काढले आहेत. विद्याधर वामन भिडे [१८६१-१९३७]यांनीं 'राघवीय परिवाह' हें महाकाव्य लिहिलें असून अनेक खंडकाव्यें लिहिलीं आहेत. त्यांच्याइतकी क्लिष्ट कविता लिहिणारा कवि मराठी भाषेंत झाला नाहीं. किंबहुना त्यांच्या काव्यांचीं नांवेंहि इतकी दुर्बोध आहेत, कीं त्यांचा अर्थ पाहण्यासाठीं कोशाचें सहाय्य घ्यावें लागतें. नारायण नरसिंह फडणीस यांनीं 'महाराष्ट्र-मुक्तामाला' हें आर्याबद्ध काव्य लिहिलें आहे. प्रो. वासुदेव बळवंत पटवर्धन (इ.स. १८६१-१९२२) यांनीं वैणिक काव्यें (Lyrics) लिहिलीं आहेत. त्यांच्या 'काव्य व काव्योदय' या अभिनवसुंदर प्रबंधावरून त्यांची पहिल्या प्रतीच्या रसज्ञ काव्यकोविदांत प्रामुख्यानें गणना केली पाहिजे. त्यांची कविता संख्येनें थोडी असली तरी ती केशवसुती वळणाची आहे. प्रो. पटवर्धन हें नव्या वळणाचे तर एकनाथ गणेश भांडारे (इ. स. १८६३-१९१९) जुन्या वळणाचे कवि होते. सारांश येथपर्यंत निर्दिष्ट केलेल्या कांहीं कवींनीं संस्कृत काव्यांचीं भाषांतरें, कांहींनीं इंग्रजी काव्यांचीं भाषांतरें व कांहींनीं स्वतंत्र काव्यरचना केली. या कवींनीं, ऋतुवर्णनें, ऐतिहासिक प्रसंग, नीतिबोध, वीरचरित्रें, सांसारिक कथा व सामाजिक प्रसंग हे काव्यविषय निवडले. त्यांनीं प्राचीन काव्याचें विषय सोडले तरी काव्यरीति व वर्णनपद्धति जुन्याच ठशाची अंगिकारिली. यांपैकीं बहुतेक कवींच्या काव्यावर वामनमयूरांच्या संस्कृतप्रचुर भाषाशैलीची चांगलीच छाया पडली आहे. अशाप्रकारें काव्याची प्रगति होत असतां नवीन परंपरा निर्माण करणारा एक क्रांतिकारक कवि महाराष्ट्रांत उदयाला आला. आणि मराठी वाक्सरितेंत भावगीतांचा निर्मल निर्झरौघ आणून सोडण्याचें महत्कार्य

ज्यानें केलें त्या प्रतिभाशाली कवीकडे आतां आपण वळूं.

अर्वाचीन मराठी काव्याच्या अंतर्बाह्य स्वरूपांत क्रांति करणारे हे प्रतिभाशाली कवि म्हणजे केशवसुत हे होत. केशवसुत यांचें सगळे नांव कृष्णाजी केशव दामले हे असून त्यांचा जन्म १८६५ सालीं मालगुंड येथे झाला. केशवसुतांना आपले सगळें आयुष्य दुय्यम शिक्षकाचा स्फूर्तिविनाशक व्यवसाय करण्यांत घालवावें लागलें. किंबहुना त्यांचें आयुष्य दुर्दैव, दुःख व दारिद्र्य यांचें जणूं कांहीं विलासस्थलच होतें. तथापि 'हेम्नः सलंक्ष्यते ह्यग्नौ विशुद्धिः श्यामिकाऽपि वा' या कविकुलगुरूच्या उक्तीप्रमाणें प्रतिभेचें सुवर्ण दुःखाच्या अग्नींतच देदीप्यमान होत असतें. केशवसुतांनीं शेले–वर्ड्स्वर्थ प्रभृति इंग्रजी भाषेंतील कवींच्या काव्यांचा सूक्ष्म अभ्यास केला होता व या पाश्चात्य कवींच्या काव्याचें प्रतिबिंब त्यांच्या काव्यांत पदोपदीं पडलें आहे. केशवसुत हे जितके सहृदय तितकेच संवेदनक्षम व जितके संवेदनक्षम तितकेच सौंदर्यलोलुप होते. 'साध्याहि विषयांत आशय कधीं मोठा किती आढळे' हें तत्त्व डोळ्यापुढें ठेवून त्यांनीं अगदीं साध्या विषयावर कविता लिहिल्या. परिसाच्या स्पर्शानें लोहाला ज्याप्रमाणें कनकत्व प्राप्त होतें त्याप्रमाणें प्रतिभेच्या स्पर्शानें साध्याहि विषयाला कमनीयता प्राप्त होते. केशवसुतांनीं सामान्य विषयांवर कविता लिहिल्यामुळें नाविन्यविद्वेषी समाजाकडून त्यांचा तीव्र उपहास झाला. त्यांच्या काव्यरीतींतहि नाविन्य असल्यामुळें संस्कृतप्रचुर व सालंकार वेषभूषेची अभिरुचि असलेल्या तत्कालीन समाजाला त्यांच्या स्फूर्तिदायक काव्यांतील हृदयहारी सौंदर्य आकलन करतां आलें नाही. ते काव्यसुधारक असूनहि समाजसुधारक असल्यामुळें आगरकरी विचार त्यांच्या काव्यांत प्रगट झाले. त्यामुळें त्यांच्या अप्रियतेंत भर पडली. या सर्व कारणांमुळें जिवंतपणीं त्यांना कीर्तीचा लाभ झाला नाहीं. पण त्यांच्या मृत्यूनंतर त्यांना अपूर्व कीर्तीचा लाभ होऊन आधुनिक कविकुलगुरुत्वाचा बहुमान मिळाला. केशवसुतांनीं

भावगीतें लिहिण्याची प्रथा पाडून त्यांनीं मराठी काव्यांत अद्भुतरम्य संप्रदायाला ( Romantic Age ) प्रारंभ केला. निसर्गरति, प्रणयोत्कटता ध्येयवादित्व, सौंदर्यपिपासा व गूढगुंजन हे त्यांच्या संप्रदायाचें प्रमुख विशेष म्हणून सांगतां येतील. त्यांना आपल्या अलौकिक प्रतिभेविषयी असीम आत्मविश्वास असल्यामुळें त्यांच्या काव्यांत आत्मश्लाघेचें उद्गार आढळतात. परंतु 'काश्मीरजस्य कटुताऽपि नितांतरम्या' या उक्तीप्रमाणे तें समर्थनीयच आहेत. केशवसुतांच्या काव्याची भाषा जितकी खणखणीत व खडबडीत तितकीच दडदडीत व दाठर आहे. तथापि त्यांच्या काव्याचें सौंदर्य भाषा-सौंदर्यांत नसून भावनोत्कटतेंत आहे. पर्वताच्या गगनचुंबित शिखरावर सूर्याचे आरक्त किरण अगोदर पडतात व मग ते इतर ठिकाणीं पसरतात त्याप्रमाणें मराठी काव्यसृष्टींतील नवयुगाचा साक्षात्कार केशवसुतांना अगोदर झाला व मागाहून इतर कवींना त्याची प्राचिति आली म्हणून केशवसुतांनाच सर्वांनीं गुरुस्थानीं मानिले व त्यांच्यावर स्तुतीची सुमनांजलि वाहिली. केशवसुतांच्या संप्रदायाचें आंग्लसाहित्यांतील वर्ड्‌स्वर्थच्या संप्रदायाशीं साद्दश्य आहे. सारांश, केशवसुत हे मराठी काव्यांतील अद्भुतरम्य युगाचें आद्यप्रवर्तक आहेत असें म्हटल्यास त्यांत अतिशयोक्ति होणार नाहीं.

केशवसुतांच्या काव्यांतील '**सरस वाङ्निष्यंद**' सेवन करून त्यांतील सौंदर्य विशद करणारे काव्यसमीक्षक जितके केशवसुतांना लाभले तितके गोविंदाग्रजाव्यतिरिक्त दुसऱ्या कोणत्याहि कवीला मिळालें नाहींत. प्रो. वै. का. राजवाडे, सी. के. दामले, रहाळकर, ना. म. भिडे, रा. प. सबनीस, प्रा. लागू, प्रा. मा. त्र्यं. पटवर्धन, वर्दे, माडखोलकर प्रभृति टीकाकारांनीं केशवसुतांच्या काव्यावर स्वतंत्र निबंध लिहिले आहेत. पण कै. वा. अ. भिडे यांनीं 'मराठी काव्याची उत्क्रांति व केशवसुत' ( काव्यचर्चा ) या निबंधांत केशवसुतांनीं मराठी काव्यांत क्रांति केली हा समज चुकीचा आहे असें मत प्रतिपादन केलें आहे. या मताच्या

समर्थनासाठीं त्यांनीं दोन कारणे दिलीं आहेत. पहिलें असें कीं, केशवसुतांच्या पूर्वींच नव्या युगाचा प्रारंभ झाला होता आणि त्यांच्या काव्यांतील आत्मश्लाघापर दर्पोक्तीमुळें ते क्रांतिकारक कवि आहेत असा समज पसरलेला दिसतो. हीं दोन्ही कारणे समर्पक वाटत नाहीत. कारण केशवसुतांच्या पूर्वी भावगीतांचा संप्रदाय सुरू असला तरी तो सर्वस्वी भाषांतरित आहे. त्यांत जिवंतपणा किंवा जिव्हाळा मुळींच नाहीं. केशवसुतांच्या काव्यांत जी आत्माविष्कृति ( Self-expression ) आहे ती महाजनी-कानिटकरांच्या भावगीतांत आहे काय ? केशवसुतांच्या भावगीतांत जितकी हृदयाची आर्तता दृग्गोचर होते तितकी त्यांच्यापूर्वी होऊन गेलेल्या कोणत्याहि कवीच्या काव्यांत दिसून येत नाहीं. आपल्या अंतःकरणांतील उत्कट भावनांचें सहजरम्य आविष्करण करण्याची प्रथा त्यांनींच पाडली, यांत शंका नाहीं. म्हणून कलात्मक आत्माविष्कृति हाच त्यांचा प्रमुख विशेष आहे. केशवसुतांनीं काव्याच्या विषयांत जसा बदल केला तसाच काव्याच्या रीतींतहि बदल केला. पूर्वीच्या संस्कृत अक्षरगणात्मक वृत्तांची योजना न करितां भावगीताला अनुकूल अशा गेय चालीचा त्यांनीं उपयोग केला. अशाप्रकारें काव्यविषय व काव्यरीति यांत परिवर्तन घडवून आणल्यामुळें त्यांना क्रांतिकारकत्वाचा बहुमान लाभला आहे. केवळ आत्मश्लाघापर दर्पोक्तींनीं तो मिळालेला नाहीं. म्हणून भिडे यांचे दोन्ही मुद्दे समर्पक ठरत नाहींत. प्रेम, निसर्ग व गूढगुंजन या तीन विषयांवरील काव्यांत त्यांचें प्रभावी व्यक्तिमत्व प्रत्ययाला येतें. वर्ड्स्वर्थनें इंग्रजी वाङ्मयांत जी कामगिरी केली तीच केशवसुतांनीं मराठी वाङ्मयांत केली आहे व वर्ड्स्वर्थप्रमाणेंच विषय व रीति यांत सहज सौंदर्य आणलें. साध्याहि विषयावर हृदयंगम भावगीतें लिहितां येतात हे सर्वांच्या निदर्शनाला आणून दिलें. प्रा. वा. ब. पटवर्धन यांनीं म्हटल्याप्रमाणें ' त्यांच्या कवितेंत वैचित्र्य आहे. स्वातंत्र्य आहे, ओज आहे, जोर आहे, आत्मप्रत्यय आहे, आषकाचें वेड आहे,

देशभक्ताचा कळवळा आहे, स्वयंस्फूर्तीचा विलास आहे, तत्त्वान्वेत्यांची भेदकता आहे व वागर्थांची संयुक्तता आहे.' केशवसुतांच्या निसर्गसुंदर कवितेला नादमाधुर्याची जोड मिळाली असती तर ते दुग्धशर्करान्यायानें आल्हादसंवर्धक झालें असतें. तथापि, 'प्रायेण सामग्र्यविधौगुणानां पराङ्मुखी विश्वसृजः प्रवृत्तिः' हें कालिदासानें म्हटलें आहे, तेंच खरें! त्यांच्या काव्याचें बहिरंग रम्य नसलें तरी अंतरंग हृद्य आहे. केशवसुतांच्या काव्याला नभोमंडळांत स्वैर भराऱ्या मारणाऱ्या वैनतेयाची उपमा देतां येईल. सारांश काव्यविषय व काव्यरीति यांत परिवर्तन करून कलात्मक आत्माविष्कृतीला प्राधान्य देणारे केशवसुत हे क्रांतिकारक कवि आहेत. म्हणून, "गात गात तो मावळला । गात गात उदया आला' – असें जें रे. टिळकांनीं वर्णन केलें आहे तें कुणाला यथार्थ वाटणार नाहीं ?

रे. नारायण वामन टिळक हे केशवसुतांच्या पेक्षां एक वर्षानें वडील असले तरी त्यांच्याच संप्रदायांतील असल्यानें केशवसुतांच्यानंतर त्यांचा उल्लेख केला आहे. रे. टिळक (इ. स. १८६५–१९१९) यांनीं तरुणपणीं खिस्ती धर्माचा स्वीकार केला तरी मराठी भाषेचा अभिमान सोडला नाहीं. त्यांनीं इंग्रजी, संस्कृत व मराठी या तीन्ही भाषेंतील काव्याचें सूक्ष्म परिशीलन केलें होतें. त्यांनीं स्फुट काव्यें व खंडकाव्यें अशी दोन्ही प्रकारची विपुल काव्यरचना केली आहे. त्यांची प्रवृत्ति जितकी काव्यात्मकोमल तितकीच तात्त्विक असल्यामुळें त्यांच्या काव्यांत काव्य व तत्त्वज्ञान यांचें सुंदर संमिश्रण झालें आहे. कवीविषयीं त्यांची **'शास्त्रज्ञांच्या तत्त्वज्ञांच्या पलीकडे संचार । दिक्कालानें अप्रतिहत जो ज्याचा स्वैरविहार'** अशी उदात्त आहे. कवीचा शास्त्रज्ञांच्या व तत्त्वज्ञांच्या पलीकडे संचार असतो अशी त्यांची प्रामाणिक समजूत होती. त्यांच्या प्रेम, ईश्वर, निसर्ग व जीवन या विषयांवरील कविता हृदयहारी आहेत. श्री. केळकर यांनीं म्हटल्याप्रमाणें, 'टिळकांच्या कवितेचें माझ्यामतें

मुख्य दोन गुण आहेत एक प्रसाद व दुसरा प्रेमळपणा (प्रस्तावना पृ. ९). टिळकांचें काव्य प्रसाद व प्रेमळपणा यांनीं परिपूर्ण असूनहि त्याला विचारसौंदर्याची जोड मिळाली आहे. टिळक हे परमेश्वराच्या सत्, चित् व आनंद या त्रिविधस्वरूपाची उपासना करणारे तत्त्वज्ञ कवि होते. अधुनिक कवींत टिळक हे आशावादी कवि आहेत. केशवसुतांच्याप्रमाणें निराशावादाचा सूर त्यांच्या काव्यांत दृग्गोचर होत नाहीं. उत्कृष्ट काव्याला सत्य व सौंदर्य यांची उत्कट अभिलाषा असते. टिळकांच्या काव्यांत सत्य व सौंदर्य यांचा मोहक मिलाफ झाला आहे. त्यांच्या काव्यांत अभिनव कल्पनाविलास फारसे आढळत नाहींत, हें खरें. पण त्यांतील सहज सौंदर्यानें आपलें मन मोहून जातें. आधुनिक मराठी कवितेला ज्यांनीं नवीन वळण दिलें व तिच्या पूर्वीच्या स्वरूपांत बदल केला अशा कवींत रे. टिळकांची गणना केली पाहिजे. प्रा. लागू यांनीं म्हटल्याप्रमाणें, 'काव्यप्रदेशांत क्रांति घडवून आणणाऱ्या कवींत जरी बंडाचा झेंडा टिळकांनीं उभारला नसला तरी ते बंडखोरांच्या चळवळीचे एक पुरस्कर्ते होते यांत शंका नाहीं (साहित्यसुवर्ण पृ. ६८).' टिळक हें फुलांमुलांचे कवि होते असें त्यांचें वर्णन केलें जातें व तें योग्यहि आहे. सारांश, रे. टिळक हे आनंदी, आशावादी व अभिजात कवि असून त्यांनीं आपल्या मृदु-मधुर गीतांनीं 'अद्भुतरम्य युगाच्या' प्रगतीला सर्वतोपरी सहाय्य केलें आहे. म्हणून 'एक सुंदर कवि' या कवितेंतील 'फुलांसंगतीं खेळे ओंव्या गाउनि त्या खेळवी, एक विषय ठाउका द्विजाला परमेशाला स्तवी'—हे कविवर्णन त्यांना स्वतःलाच पूर्णपणें लागू पडतें.

रे. टिळक हे केशवसुतांच्या परंपरेंतील तर चंद्रशेखर हे मोगरे यांच्या परंपरेंतील कवि आहेत. चंद्रशेखर शिवराम गोरे (१८७१-१९३७) हे रससिद्ध कवि असून त्यांची काव्याविषयींची तळमळ व तपस्या किती तीव्र होती हे त्यांच्या 'कवितारति' या काव्यावरून दिसून येते. त्यांची

वृत्ति अंतर्मुख नसल्यामुळे केशवसुत-टिळकाप्रमाणे त्यांनीं भावगीतें लिहिलीं नाहींत. त्यांच्या कवितेचे स्वरूप विदग्ध, विचारगंभीर व विलोभनीय आहे. आपल्याच क्षुद्र सुखदुःखांत रंगून उच्छृंखल किंवा उन्मादक प्रसंगवर्णनांत त्यांचीं प्रतिभा आनंद मानत नाहीं; तर भव्योदात्त व भास्वर असे विषयच तिला रुचतात. महाकाव्य लिहिण्याचें सामर्थ्य त्यांच्या ठिकाणीं होते; पण परिस्थितीच्या प्रतिकूलतेमुळें तें त्यांच्या हातून लिहिलें गेलें नाहीं. लेभे व मोगरे यांच्या कवितेपेक्षां चंद्रशेखरांची कविता अधिक चित्तमनोहर, रसमधुर व चारुतर आहे. त्यांच्या काव्यांत पावित्र्य, प्रसन्नता व प्रसाद यांचा त्रिवेणीसंगम झाला आहे. श्री. माडखोलकर यांनीं म्हटल्या प्रमाणे, ‘ त्यांचे ते गंभीर पण प्रसन्न सौंदर्य पाहिलें म्हणजे मुनिमनाशीं स्पर्धा करणाऱ्या, बाणानें वर्णिलेल्या अच्छोद सरोवराची आठवण होतें (चंद्रिका प्रस्तावना पृ. २). किंबहुना चंद्रशेखरांच्या काव्यांत जितकें भाषासौंदर्य आढळते तितके दुसऱ्या कोणत्याहि• अर्वाचीन कवीच्या काव्यांत आढळत नाहीं. माधुर्य हा त्यांच्या काव्याचा मुख्य गुण आहे. चंद्रशेखरांनीं कल्पकतेच्या वेगवंत अश्वावर आरोहण करून गगनमंडळांत भराऱ्या मारलेल्या नाहींत किंवा अद्भुततेच्या अक्षुण्ण प्रदेशांत भ्रमण करून गूढगुंजनात्मक गीतेंहि त्यांनीं लिहिलीं नाहींत. त्यांच्या प्रतिभेच्या आम्रमंजरींतून प्रणयाचे मादक रसबिंदु स्रवत नाहींत किंवा ऐतिहासिक कालांत संचार करून पौरुषोत्साहप्रेरक अशी कवनेंहि लिहिली नाहींत. त्यांना जें मनोज्ञ व मंगल आढळलें त्यांचे त्यांनीं मधुर व मोहक वर्णन केलें आहे. थोडक्यांत सांगावयाचें झाल्यास चंद्रशेखरांची कविता चंद्रिके-सारखी आहे. त्यांच्या काव्यचंद्रिकेंत, उदात्त कल्पनांची शुचिता, ललित भाषेची शीतलता व निर्मल भावनांची शांतता यांचा आढळ होतो. म्हणून चंद्रशेखरांच्या नितांतसुंदर काव्यचंद्रिकेंत स्वच्छंद विहार करितांना कुणाचें हृदयारविंद आनंदोत्फुल्ल होणार नाहीं ?

चंद्रशेखरांच्यानंतर 'माधवानुज' [१८७१–१९१७] यांच्याकडे वळणें क्रमप्राप्त आहे. माधवानुजांच्या काव्यावर केशवसुत व मोगरे या दोघांच्याहि संप्रदायाची छाप पडलेली दिसून येते. काशिनाथ हरी मोडक ऊर्फ माधवानुज हे व्यवसायानें डॉक्टर असून थिऑसॉफीचे सभासद होते. माधवानुज हे केशवसुतांनीं उभारलेल्या झेंड्याखालीं येऊन उभे राहिले व केशवसुतांच्या काव्यांतील नाविन्याचें मर्म ओळखून त्यांनीं त्यांचें अनुकरण केलें. त्यांच्या काव्यावर कारुण्याची दाट छाया पडली आहे व यामुळेंच त्यांची दुष्काळावरील गाणीं हृदयस्पर्शी वाटतात. माधवानुजांची प्रतिभा उज्ज्वल नसली तरी कळकळ व तळमळ यांमुळें त्यांच्या काव्याला मोहकता आली आहे. तत्त्वजिज्ञासेचा अतिरेक हा त्यांच्या मननशील स्वभावाचा विशेष होय. त्यांच्या प्रत्येक काव्यांत कांहीं ना कांहीं तत्त्व सांगितलेलें असावयाचेंच. तत्त्वबोधाचा हव्यास हा त्यांच्या काव्यांतील मोठा दोष होय. कवितेचे तात्पर्य सांगितल्यामुळें त्यांच्या काव्याला पुष्कळवेळां प्रवचनाचें स्वरूप येतें. पण कीट्सने म्हटले आहे, " We hate poetry that has a palpable design upon us. Poetry should be great and unobtrusive." माधवानुजांनीं स्वतंत्रकाव्याप्रमाणेंच भाषांतरात्मक रचनाहि विपुल केली आहे. विशेषतः मधुसूदन दत्त यांच्या 'मेघनादवध' या काव्याचें आर्याबद्ध भाषांतर चांगलें साधलें आहे. माधवानुज हे गंभीर कवि तर श्रीपाद कृष्ण कोल्हटकर [१८७१–१९३४] हे विनोदी कवि होते. कोल्हटकर हे कवीपेक्षां नाटककार, विनोदी लेखक, टीकाकार इत्यादि अनेक दृष्टीनें विख्यात आहेत. पण त्यांची प्रतिभा कामरूपिणी असल्यामुळें तिनें काव्याच्या यक्षभूमींतहि विहार केला आहे. 'गीतोपायन' या पुस्तकांत त्यांच्या कविता संग्रहित केल्या आहेत.* या पुस्तकांत विनोद, चमत्कृति व विद्वत्ता यांचें संमिश्रण झालें आहे. त्याचप्रमाणें केशव विश्वास फणसे (इ. स. १८७१) यांनीं स्फुट कविता बरीच लिहिली असून ती चमत्कृतिजनक आहे.

रे. टिळक हे ज्याप्रमाणें ‘ फुलामुलांचे कवि ’ त्याप्रमाणें विनायक हे राष्ट्रीय कवि आहेत. विनायक [ इ. स. १८७२–१९०९ ] यांच्या मनांत स्वदेश, स्वधर्म व स्वभाषा यांचा नितांत अभिमान होता. त्यांची थोडी कविता उपलब्ध आहे. पण तींत त्यांच्या राष्ट्रीय मनोवृत्तीचें उत्कृष्ट प्रगटीकरण झालें आहे. आपल्या देशाचें यशोवर्णन करण्यांत त्यांनीं आपली वाणी वाहिली. ‘ हतभागिनी ’ या कवितेंत हिंददेवतेच्या हतदैवी स्थितीचें हृदयस्पर्शी चित्र रेखाटलें आहे. त्यांचीं स्फुटकाव्यें, खंडकाव्यें व युवतिरत्नमाला ही स्फूर्तिदायक आहेत. विनायकांच्या काव्यांवर केशवसुतांचा परिणाम झाला आहे व मराठी काव्यांतील अद्भुतरम्य संप्रदाय स्थापन करण्याला केशवसुत, टिळक व विनायक हे तिघेहि कारणीभूत आहेत. देशभक्ति हा त्यांच्या काव्याचा स्थायीभाव आहे. विनायकाप्रमाणें पौरुष व पराक्रम यांना प्रेरणा देणारे प्रभावशाली कवि फारच थोडे आढळतात. पारतंत्र्याच्या या अवनत कालांत प्रणयगीतें गाण्यापेक्षां पराक्रमाची प्रोत्साहक गीतें गाणें अधिक श्रेयस्कर नाहीं काय ? विनायकांच्या काव्यांत स्वातंत्र्याची लालसा व पारतंत्र्याचा तिटकारा पराकाष्ठेचा आढळतो. प्रा. वा. ब. पटवर्धन यांनीं म्हटल्याप्रमाणें, ‘ महाराष्ट्राच्या दिव्य पूर्वेतिहासाची आठवण त्यांनीं महाराष्ट्राला करून दिली आहे आणि महाराष्ट्रांतील स्त्रीवर्गापुढें ओजस्वितेचे आदर्श ठेविले आहेत ( वि. क. प्र. १३ ). यामुळें त्यांना ‘ राष्ट्रीय कवि ’ असें यथार्थतेनें म्हटलें जातें. “ या दृष्टीनें विनायकासारख्या कवींची कविता वाचली असतां महाराष्ट्राच्या व महाराष्ट्रवाङ्मयाच्या भवितव्याविषयीं निराशा होण्याचें कारण उरणार नाहीं ( प्रस्तावना पृ. १४ ).” हे प्रा. पटवर्धन यांचे उद्गार कुणालाहि मान्य झाल्यावांचून रहाणार नाहींत.

साहित्यसम्राट श्री. न. चिं. केळकर हे मुत्सद्दी, वर्तमानपत्रकार, नाटककार, निबंधलेखक, चरित्रकार, टीकाकार व वक्ते या अनेक नात्यांनीं

सर्वपरिचित व सर्वमान्य आहेत. त्यांनीं आजपर्यंत महाराष्ट्र व मराठी वाङ्मय यांच्या सर्वांगीण उन्नतीविषयीं पराकाष्ठेचे परिश्रम घेतले आहेत. केळकर हे जितके प्रतिभाशाली तितकेच प्रज्ञासंपन्न, जितके चतुरस्त्र तितकेच चिकित्सक व जितके समतोल तितकेच सहृदय आहेत. त्यांचा 'गीतोपहार' हा काव्यसंग्रह प्रसिद्ध आहे. त्यांच्या 'वेषभूषा' या कल्पनारम्य गीतांत त्यांची अभिजात रसिकता प्रगट झाली आहे. 'कांटेरी गुलाब' 'माझा आवडता फकीर' या त्यांच्या कविताहि विशेष उल्लेखनीय आहेत. कोल्हटकरांच्या 'गीतोपायना' प्रमाणेंच केळकरांचा 'गीतोपहार'हि चमत्कृतिजनक आहे. प्रा. लक्ष्मण गणेश लेले ( १८७२–१९३६ ) हे विद्वान टीकाकार असून त्यांनीं 'पद्यमंजरी', 'टिळक सुमनांजलि' व 'महाराष्ट्रवंदन' इत्यादि काव्यें लिहिलीं आहेत. त्यांची बरीचशी कविता भाषांतरित असूनहि जुन्या वळणाची आहे. याचठिकाणीं लक्ष्मण रामचंद्र पांगारकर ( १८७२–१९४१ ) यांच्या 'आनंदलहरी' या काव्य संग्रहाचाहि उल्लेख करावयाला हरकत नाहीं.

अत्यल्प कविता लिहून अमूप कीर्तीचा ज्यांना लाभ झाला त्यांत नारायण मुरलीधर गुप्ते ऊर्फ Bee कवि हे अग्रेसर आहेत. Bee हे सर्वस्वी स्वतंत्र कवि असून ते कोणत्याहि परंपरेचे अनुयायी नाहींत. ते प्रतिभाशाली असूनहि प्रसिद्धिपराङ्मुख असल्यामुळें आत्मप्रस्थविस्ताराच्या काळांत ते बव्हंशीं अपरिचितच राहिले. 'फुलांची ओंजळ' या ग्रंथांत त्यांच्या कविता ग्रथित झाल्या आहेत. रे. टिळकाप्रमाणें Bee हे तत्त्वज्ञ कवि असल्यामुळें त्यांच्या काव्यांत तत्त्वज्ञानाचा विलास व तत्त्वज्ञानांत काव्याचा विलास आढळतो. कवीला काव्यस्फूर्ति देणाऱ्या प्रतिभाशक्तीचें त्यांनीं 'वेडगाणें' या कवितेंत यथार्थ वर्णन केलें आहे. अखंड ब्रह्मांडाचें आकलन करणारी, उडुगणांच्या यानांत बसून अनंताची प्रदक्षिणा करणारी प्रतिभा ही विश्वाची राणी आहे. डंका, भगवाझेंडा, आशा–देवीस व तीव्र जाणीव,

या कवनांत त्यांची राष्ट्रीयवृत्ति दिसून येते. त्याचप्रमाणें, कविवंदन, विचार तरंग व काव्यानंद या तीन काव्यांतील विचारवैभव केवळ कविलाच नव्हे तर कोणत्याहि निर्माणक समीक्षकालाहि [Creative Critic] भूषणावह आहे. विशेषतः 'कमळा' हें काव्य अतीव कमनीय आहे. कल्पनेची विशालता हा त्यांच्या काव्याचा प्रमुख विशेष आहे. गुढगुंजन व संस्कृत शब्दांची अतिरिक्त योजना यांमुळें त्यांची कविता क्वचित क्लिष्ट वाटते. तत्त्वज्ञानाचें गांभीर्य, भाषेचें सौंदर्य व कल्पनांचें ऐश्वर्य या दृष्टीनें त्यांच्या कवितेची आंग्ल कवि ब्रेशी करतां येईल. त्यांनीं आपल्या काव्यांत शब्दार्थसौंदर्याचें अद्वैत साधण्यासाठीं अविश्रांत परिश्रम घेतलें आहेत. श्री. अत्रे यांनीं म्हटल्याप्रमाणें, 'कलावंत, तत्त्वज्ञ व सौंदर्यवादी कवि' या नात्यानें अधुनिक मराठी कवींमध्ये Bee यांचें स्थान फार मानाचें आहे [प्रस्तावना पृ. ३६]. सारांश, Bee कवींनीं आपल्या 'अम्लान प्रतिभेची' 'अव्यय लेणीं' लेववून आधुनिक कवितेला अलंकृत केलें आहे.

बाळकृष्ण अनंत भिडे व भास्कर रामचंद्र तांबे हे दोघेहि कवि १८७४ सालीं जन्मले. भिडे यांनीं कवीपेक्षां काव्य-समीक्षक या नात्यानें अधिक कीर्ति मिळविली. त्यांचें मुक्तेश्वर, तुकाराम व इतर निबंध विद्वत्ताप्रचुर व विचिकित्सक असून त्यांच्या समीक्षण चातुर्याचें निदर्शक आहेत. टीकात्मक वाङ्मयाप्रमाणें त्यांची काव्यनिर्मितीहि विपुल आहे. ती जुन्या वळणाची असून तीवर मयूर-वामनाची छाप आहे. त्यांचे 'फुलांचे झेले' हें पुस्तक प्रसिद्ध असून मासिकांतून पुष्कळच कविता विखुरली आहे. भिडे हे गद्य व पद्य हीं दोन्ही प्रसन्नरीतीनें लिहिण्यांत सारखेच प्रवीण होते. भिडे यांची प्रतिभा जितकी कथनात्मक तितकीच तांबे यांची प्रतिभा वैणिक होती. तांबे यांच्या ठिकाणीं नैसर्गिक प्रतिभेला अविरत परिश्रमशीलतेची जोड मिळाल्यामुळें त्यांच्या काव्याला विशेष सौंदर्य प्राप्त झालें आहे. त्यांची प्रतिभा सर्वस्वीं वैणिक असल्यामुळें त्यांनीं हृदयंगम भावगीतें

लिहिलीं आहेत. तांबे हे कलावादी कवि असले तरी त्यांची ईश्वरनिष्ठा निस्सीम होती. त्यांच्या प्रेमगीतांत जितकी उत्कटता तितकीच उदात्तताहि आहे. त्यांच्या काव्यांत वैणिकाला गेयतेची जोड मिळाली आहे. म्हणून त्यांच्या काव्यकलापांत काव्य व संगीत यांचें मधुर मिश्रण झालें आहे. त्यांच्या मते, काव्य हें आत्यंतिक निरुपयुक्ततेंत जनन पावतें. म्हणून तें अत्यंत उपयोगी आहे व ते नीतीविषयीं इतके बेपर्वा असते म्हणूनच साऱ्या नीतीचें सार त्यांत साठविलेलें असतें. तांबे हे वैदर्भी रीतीचे अनुयायी असल्यानें त्यांची भाषा सुलभ आहे. सारांश श्री. तांबे यांच्या काव्योद्यानांतील मृदुमनोहर गीतांचे मनोहर ताटवे अवलोकन करून कुणाचें अंतःकरण आनंदगर्भतल्लीन होणार नाहीं ?

गोविंद त्रिंबक दरेकर ऊर्फ गोविंद [इ. स. १८७४–१९२६] हे विनायकाप्रमाणेंच राष्ट्रीय कवि होऊन गेले. सावरकरबंधूंनी स्थापन केलेल्या नाशिकच्या मित्रमेळ्याचे गोविंद हे चालक असून त्यांनीं त्या व इतर मेळ्यांसाठीं पुष्कळ पदें लिहिलीं होतीं. त्यांपैकीं अत्यंत स्फूर्तिदायक पदें सरकारनें जप्त केलीं व जीं कांहीं उरलीं तीं पुस्तकरूपानें संग्रहित झालीं आहेत. ते स्वतः अपंग होते व त्यांचें सर्व आयुष्य शारीरिक व बाह्य संकटें यांच्याशीं झगडण्यांत गेलें; व त्यांतच त्यांना अकालीं मृत्यु आला. त्यांच्या काव्यांत देशाभिमानाची दीप्ति व काव्याची कमनीयता यांचा सुंदर संकर झाला आहे. सारांश, गोविंद हे महन्मंगला हिंददेवतेची स्फूर्तिप्रद काव्यकुसुमांनीं पूजा बांधणारे राष्ट्रीय कवि होते, यांत संशय नाहीं. गोविंदाप्रमाणेंच दत्तात्रय कोंडो घाटे ऊर्फ दत्त (इ. स. १८७५-१८९९) हेहि प्रतिभाशाली कवि आहेत. तोरुलता दत्त, कीट्स, कलापी या कविप्रमाणें दत्त यांनीं आपल्या अल्पायुष्यांत संस्मरणीय काव्यनिष्पत्ति केली. शृंगार, करुण व वत्सल या तीन रसांचें त्यांच्या काव्यांत आविष्करण झालें आहे. ईशभक्तीइतकीच त्यांची निसर्गरतीहि उत्कट असल्यामुळें या दोन

विषयांवरील त्यांचीं गीतें श्रुतिमनोहर वाटतात. म्हणूनच कविवर्य चंद्रशेखर यांनीं 'श्रुतिमनोहरसा कवितौघ तो। विमल गंगाजलासम वाहतो। कुणिही जो रस त्यांतिल चाखतो। अनुभवी अमृतानुभावास तो'— [ चंद्रिका ३७] असें त्यांच्या काव्याविषयीं समर्पक उद्‌गार काढले आहेत.

दत्तांच्यानंतर कृष्णाजी पांडुरंग लिमये ऊर्फ राधारमण [ इ. स. १८७७-१९२२ ] या कवींचा उल्लेख करणें क्रमप्राप्त आहे. राधारमण यांनीं मोरोपंतांचा प्रभुद्रोह, आर्यभूमातादुःखोद्‌गार, कालचक्र हीं खंडकाव्यें व गजासुरवध व नाना फडणवीस हीं महाकाव्यें लिहिलीं आहेत. हे जुन्या वळणाचे कवि असून यांची कविता संस्कृतप्रचुर आहे. अलंकारांच्या अतिरेकामुळें त्यांचीं काव्यें अत्यंत क्लिष्ट झालीं आहेत. राधारमण हे मराठी व संस्कृत या दोन्ही भाषेंत पद्यरचना करण्यांत सारखेच प्रवीण होते. राधारमणांच्यापेक्षां श्रीपाद नारायण मुजुमदार [ इ. स. १८७७-१९०९ ] यांची कविताहि जुन्या वळणाची असली तरी अधिक उच्च दर्जाची आहे. त्यांनीं हंसदूत, मोहना, वीरमती, द्रौपदी, कपट-विपाक, वसंतचंद्रिका, प्रियोपलब्धि व सुभद्राविवाह हीं कथनपर काव्यें लिहिलीं आहेत. विषयाला सारभूत करण्यापेक्षां तो व्यापक करण्याकडे यांचा अधिक ओढा होता. यांची भाषा संस्कृतप्रचुर असली तरी प्रसादयुक्त आहे. यांच्या आर्या मोरोपंती थाटावर असून श्लोक वामनी वळणावर आहेत. आधुनिक कवींत प्राचीन काव्यांच्या अनुकरणानें यमकानुप्रासमंडित अशी कथनपर काव्यरचना करणाऱ्या कवींत श्रीपाद नारायण मुजुमदार हे वरच्या दर्जाचे कवि आहेत. प्रा. श्रीकृष्ण नीलकंठ चापेकर ऊर्फ श्रीकृष्ण [ इ. स. १८७७-१९४२ ] हे पंडित कवि होते. प्रा. चापेकर हे अभिजात काव्यमीमांसक व अस्खलित वक्ते म्हणून विख्यात असून 'सुवर्ण चंपक' या पुस्तकांत त्यांच्या कविता संग्रहित झाल्या आहेत. त्यांची कविता प्रासंगीक व प्रश्नप्रेरित असून त्यांच्या शारदावंदनात्मक कविताच अधिक

वाचनीय आहेत. विष्णु बाबाजी कुलकर्णी कल्लोळकर (१८७७–१९२३) यांनींहि पुष्कळ स्फुट कविता लिहिली आहे. पण दत्तात्रय अनंत आपटे ऊर्फ अनंततनय [ इ. स. १८८१–१९२८ ] यांच्या काव्यांत नव्याजुन्यांचा मिलाफ झाला आहे, असें म्हणतां येईल. त्यांच्या 'हृदयतरंगा' चे तीन भाग असून 'तिलकविजय' हें ओवीबद्ध काव्यहि प्रसिद्ध आहे. त्यांच्या कवितेंत भक्तिरसात्मकता विशेष आढळते. त्यांच्या काव्यांत कल्पनाविलास फार नसला तरी विषयवैचित्र्य भरपूर आढळतें. अनंततनयांची प्रवृत्ति पुराणप्रिय असल्यानें त्यांची काव्यरचना वामनमयूर यांच्या पद्धतीची झाली आहे. ईश्वरभक्ति, पूर्वजस्मरण, वात्सल्य, विनोद इत्यादि अनेक विषय त्यांच्या काव्यांत आढळतात. अनंततनय हे मोगरे, लेंभे, यांच्या परंपरेतील कवि असूनहि, केशवसुत, टिळकाप्रमाणें वैणिक रचनेचाहि त्यांनीं प्रयत्न केला आहे. सारांश, या परिच्छेदांतील कवींच्या काव्यावरून आधुनिक काव्यांत जुन्या वळणाची काव्यनिर्मिती अव्याहतपणें चालू राहिली होती हें कुणाच्याहि निदर्शनाला येईल.

अप्पाराव धुंडिराज मुरतुले ऊर्फ सुमंत (इ. स. १८८१–१९४०) यांनीं शोकतरंगिणी, माझे दुर्दिन, कन्यादानफल हीं खंडकाव्यें लिहिलीं आहेत. 'मौक्तिकमाला' हा त्यांचा स्फुटगीतांचा संग्रह प्रसिद्ध आहे. सुमंतांच्या भावगीतांत विविधता असून त्यांवर किर्लोस्कर व देवल यांच्या पद्यरचनेची छाप दिसून येते. नरहर शंकर रहाळकर यांच्या 'पुष्पांजलि' या काव्यसंग्रहांत प्रणयाचा परिमळ अधिक दरवळतो. रहाळकर हे केशवसुतांचे शिष्य असून त्यांच्या काव्यावर त्यांनीं विस्तृत प्रबंध लिहिला आहे. सुमंत व रहाळकर यांच्यापेक्षां सावरकर हे श्रेष्ठ दर्जाचे कवि आहेत. सावरकर हे जितके प्रभावशाली वक्ते तितकेच प्रतिभासंपन्न कवि आहेत. अंदमानाच्या कारागृहांत लिहिलेल्या त्यांच्या कविता 'रानफुलें' या पुस्तकांत संग्रहित झाल्या आहेत. त्यांची प्रतिभा आर्ष (epic) असून त्यांच्या

ठिकाणीं महाकाव्यनिर्माण करण्याचे सामर्थ्य आहे. त्यांचे ‘ कमला ’ हें काव्य सुंदर कल्पना, सुललित पदपंक्ति व सालंकार रचना या गुणांमुळें तें मनोभिराम वाटतें. उज्ज्वल हिंदुसंस्कृतीचे उदात्त रहस्य विशद करण्या-साठीं त्यांनीं ‘गोमांतक’ हें वैनायक वृत्तांत विस्तृत काव्य लिहिले आहे. सावरकरांच्या काव्याला संस्कृतशब्दप्रचुर्यामुळें नारिकेलपाकता प्राप्त झाली आहे. गोपाळ गोविंद पाटणकर ऊर्फ साधुदास यांनीं वनविहार, रणविहार व गृहविहार हीं रामायणावर तीन महाकाव्यें लिहिलीं आहेत. त्रुटित भावगीतें लिहिण्याच्या या काळांत साधुदासांचा महाकाव्यें लिहिण्याचा प्रयत्न कौतुकास्पद वाटतो. या तीन काव्यांत साधुदासांचें भाषाप्रभुत्व उत्कृष्टपणे प्रगट झाले आहे. केशवराव छापखाने यांनीं म्हटल्याप्रमाणे, “ साधुदासांचें कवन हें संस्कृत महाकाव्याच्या पाटांतील रसानें भरपूर भिजलेल्या मनोभूमीतील पुष्पवाटिकेप्रमाणें आहे, म्हणूनच तें स्वाभाविक, रम्य व मनोहर उतरलें आहे. या वाटिकेत जी लागवड केली आहे ती प्राचीन कवींनीं पूर्णतेला आणलेल्या रामचरितासारख्या आमोदभरित फुलांचीच असल्यानें कुमार-रघु-किरातांदि प्रसिद्ध कवनांना ज्या कारणांस्तव ‘ महाकाव्य ’ ही पारिभाषिक पदवी व मान्यता देण्यांत येते त्याच कारणां-स्तव या प्राकृतांतील कवनांनाहि तीच पदवी व मान्यता देणें प्राप्त आहे. सारांश, भाषाभेद वगळल्यास या महाकाव्यानें संस्कृत महाकाव्यांची परंपरा चालू पिढीला आणून मिळविली आहे ( गृहविहार प्रस्तावना पृ. १ ).

राम गणेश गडकरी ऊर्फ गोविंदाग्रज [ इ. स. १८८५–१९१९ ] हे केशवसुतांचे शिष्य होत. गडकऱ्यांनीं कवि, नाटककार व विनोदी लेखक या नात्यांनीं मराठी वाङ्मयांत चिरस्मरणीय कामगिरी केली आहे. गोविंदाग्रजांच्या वाङ्मयांत प्रज्ञा व प्रतिभा यांचा रमणीय संकर झाल्यामुळें त्याला इतकी अलौकिक लोकप्रियता लाभली आहे. त्यांच्या काव्य-नाटकांत सालंकार वैदग्ध्य असून चमत्कृति हा त्यांचा प्रमुख विशेष

आहे. म्हणून त्यांची 'वाग्वैजयंती' महाराष्ट्रशारदेच्या कंठांत सदैव विराजमान झाल्यावांचून रहाणार नाहीं. केशवसुतांप्रमाणेंच गडकरी हेही समाजसुधारक होते व त्यांचे सामाजिक विचार घुबड, स्मशानगीत या काव्यांत व्यक्त झाले आहेत. पण त्यांची कीर्ति त्यांच्या प्रेमगीतांवर अधिष्ठित आहे. गोविंदाग्रजांनी आपल्या प्रसन्न वाङ्माधुर्यानें प्रेम या विषयाला प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. त्यांच्या प्रेमगीतांत कल्पकतेप्रमाणेंच कारुण्याच्या कोमल छटा विखुरलेल्या आहेत. त्यांची ईशभक्ति निस्सीम होती. श्री. द. ल. कळेकर यांनीं म्हटल्याप्रमाणें, 'गडकरी यांच्या काव्यलेखनांत निराशेची छटा असली तरी त्यांचा ईश्वराच्या अस्तित्वावरील विश्वास, खलस्वभावपरिवर्तन व इतस्ततः विखुरलेला विनोद यांवरून ते आशावादी होते असें वाटते. (राजाराम हायस्कूल मॅगेझिन फेब्रुवारी १९३३ अंक २ पृ. ५३). गोविंदाग्रजांनी आपल्या प्रेमळ गीतांनीं 'प्रेमाचे शाहीर' ही पदवी मिळविली. त्यांच्या काव्यांत अद्भुत कल्पनांचे रम्यत्व व रम्य कल्पनांचें अद्भुतत्व हीं दोन्ही आढळतात. केशवसुतांचा अद्भुतरम्य संप्रदाय लोकप्रिय करण्याचें श्रेय गोविंदाग्रजांनाच द्यावे लागेल. प्रसादाभाव, दुर्बोधता, उत्प्रेक्षांचा अतिरेक वगैरे दोष त्यांच्या काव्यांत आढळतात हें खरें. पण त्यांच्या काव्यांतील कल्पकतेच्या तरल विलासांनीं कोणीहि आल्हादित झाल्यावांचून रहांत नाहीं. भरधांव सुटलेली गाडी जशी वाटेत धगधगीत निखारे फेकीत जाते, त्याप्रमाणे नवीन शब्द त्यांच्या भावनावेगाबरोबर उसळून बाहेर पडतात. सारांश, गोविंदाग्रजांची काव्य नंदिनी मंदानिलाबरोबर स्वच्छंद विहार करणाऱ्या सुमन-सुगंधिकेप्रमाणें आनंददायिनी आहे असें म्हटल्यास त्यांत अतिशयोक्ति होणार नाहीं.

केशव महादेव सोनाळकर यांचा 'कमल-पराग' हा काव्यसंग्रह प्रसिद्ध आहे. त्यांतील प्रेमपुनर्दर्शन, प्रेममीलन इत्यादि कविता बऱ्या असल्या तरी ते सामान्य दर्जाचे कवि आहेत. सोनाळकरांच्या बरोबरच

यशवंत महादेव गद्रे ऊर्फ कृष्णाग्रज यांचाहि उल्लेख करितां येईल. पण या दोन कवींपेक्षां दुर्गाप्रसाद आसाराम तिवारी यांनीं विपुल कविता लिहिली आहे. तिवारी यांनीं मराठ्यांचीं संग्रामगीतें, महाराणा प्रतापसिंह, कुमुद्वती, नंदिनी, इत्यादि काव्यग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. तिवारी यांना वीररस चांगला साधतो व ऐतिहासिक प्रसंग वर्णन करण्यात ते चतुर आहेत. त्यांनीं विठ्ठल कवीप्रमाणे चित्रकाव्यरचनाहि केली आहे. तथापि या सर्वांपेक्षां रेंदाळकर यांची कविता अधिक उच्च दर्जाची आहे. रेंदाळकर यांचा जीवनपथ दुःख व दारिद्य यांनीं दुःसह झाला होता. त्यांतच त्यांच्या स्वभावांत भावनाशीलतेचा अतिरेक झालेला असल्यामुळें त्यांना तीव्र मनस्ताप सहन करावा लागला. आपल्या आयुष्याच्या अल्पावधींत त्यांनीं निर्माण केलेली काव्यसंपदा अवलोकन करून कुणाचेंहि अन्तःकरण आश्चर्यमुग्ध झाल्यावांचून राहाणार नाहीं. त्यांनीं स्फुट, खंडकाव्यें, भाषांतरित काव्यें अशी विपुल काव्यरचना केली आहे. त्यांनीं निर्यमक कवितेचा धडाडीनें पुरस्कार केला तथापि त्यांनीं निर्यमक कवितेच्या बाबतींत अतिरेक केल्यामुळें त्यांचा तो प्रयत्न फारसा यशस्वी झाला नाहीं. प्रतिभेच्या अंतरालसृष्टींत विहार करून इहलोकींचीं दुःखे विसरल्याचा अनुभव त्यांच्या कवितेंत पुष्कळ ठिकाणीं येतो. रेंदाळकराप्रमाणेच निर्यमक काव्याचा पुरस्कार करणारे दुसरे कवि नागेश हे होत. नागेश यांच्या ‘ वन्यपुष्पांवर ’ रेंदाळकरांची पुष्कळच छाप पडली आहे. सारांश, आधुनिक काव्यांत, निर्यमक कवितेला प्रारंभ जरी घंटय्या नायडू या कवींनीं ‘ मैना ’ या खंड काव्यांत केलेला असला तरी त्यांचा विशेष प्रसार करण्याचें श्रेय रेंदाळकर यांनाच दिलें पाहिजे.

आधुनिक कविपंचकांतील बालकवि हे शेवटचे कवि होत. त्र्यंबक बापूजी ठोमरे ऊर्फ बालकवि ( इ. स. १८९०–१९१८ ) यांना ‘ सृष्टीचें शाहीर ’ असें म्हणणें उचित होईल. बालकवींचें जीवन जितकें दुःखमय

व दारिद्र्यपूर्ण तितकेच तें संवेदनक्षम व सौंदर्यलोलुप होतें. 'आनंदी आनंद गडे । इकडे तिकडे चोंहिकडे' या गीतामुळें जळगांव येथील १९०७ सालच्या कवि-समेलनांत त्यांना 'बालकवि' ही पदवी दिली. बालकवींच्या काव्यांतील श्रुतिसुखद पदलालित्य इतके आल्हादक आहे की तें पाहून कोकिलकूजिताची स्मृति होते. कमलवनांत मरालिका ज्याप्रमाणें लीलेनें विहार करिते त्याप्रमाणे बालकवींची कल्पकता निसर्गांत स्वच्छंद संचार करिते. पुष्प व परिमल किंवा चंद्र आणि चंद्रिका यांप्रमाणे त्यांच्या काव्यांत शब्दार्थांची अभेद्य व्यवस्थिति आहे. मेघमालेंत चमकणाऱ्या विद्युल्लतेच्या दर्शनानें आपले नेत्र दिपून जातात त्याप्रमाणें त्यांच्या काव्यांतील कल्पनाचमत्कृतीमुळें मन मोहून जाते. निसर्गाशीं समरस होऊन इतकी मृदुमधुर गीते गाणारा कवि आधुनिक कविमंडळांत दुसरा नाही. सुमनसंभारामुळे लतिकेला जसे वैभव प्राप्त होते तसे बालकवींच्या कवितेला मृदुल्लित पदपंक्तीमुळें विलोभनीयता आली आहे. म्हणून त्यांच्या कविता रतीच्या ललित लीला अवलोकनांत तल्लीन झालेला रसिक आनंद-साम्राज्याचा अधिकारी झाल्यावांचून रहाणार नाहीं. सारांश, बालकवींची कविता शिरीषकुसुमाप्रमाणें कोमल, शारदीय चंद्रिकेप्रमाणे शीतल व कोकिलकूजिताप्रमाणे मंजुल आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

येथपर्यंत प्रमुख आधुनिक कवींचा विचार झाला. आतां इतर कांही कवींचा उल्लेख करूं. कविभूषण बळवंत गणेश खापर्डे यांच्या काव्यांत गूढगुंजन ( Mysticism ) विशेष आहे. नारायण केशव बेहरे यांची कविता विपुल असून ती 'मोत्यांची माळ' या ग्रंथांत संग्रहित झाली आहे. आनंदराव टेकाडे यांच्या 'आनंदगीतांचे' तीन भाग प्रसिद्ध आहेत. टेकाड्यांच्या काव्यांत कल्पकता नसली तरी गेयता असल्यामुळें त्यांना लोकप्रियता लाभली. माधव केशव काटदरे यांनीं ऐतिहासिक कवनें लिहिण्याचें चातुर्य प्रगट केलें आहे. जयकृष्ण केशव

उपाध्ये यांची 'पोपटपंची' प्रज्ञाप्रेरित असली तरी प्रसन्न आहे. यशवंत, गिरीश व माधवज्यूलिअन या रविकिरणमंडळांतील प्रमुख सदस्यांनी काव्यनिर्मिति व काव्यगायन यांचा अवलंब करून मराठी काव्यवाङ्मयांत चांगली भर घातली आहे. रविकिरणमंडळांतील या तीन कवींनीं विषय व जाति यांत विलोभनीय वैचित्र्य आणलें यांत शंका नाहीं. हरि सखाराम गोखले हे केशवसुती वळणाचे कवि आहेत तर मनोहर यांची कविता गोविंदाग्रजांच्या वळणाची आहे. केशवकुमार यांचीं 'झेंडूचीं फुलें' हा विडंबनात्मक काव्यसंग्रह प्रा. लेले शास्त्री यांनीं म्हटल्याप्रमाणें 'चिमुकला, चटकदार,चातुर्य मंडित व चमत्कृतिजनक' आहे. मुकुंदराय, रणदिवे यांच्या काव्यात प्रसन्न माधुर्य असून इंदुकांत यांच्या कवितेंत पराकाष्ठेची सुश्लिष्टता दृष्टोत्पत्तीला येते. अरविंद, विरकुड, आनंद हे कवि गोविंदाग्रजांच्या संप्रदायातील असून त्यांची कविता आनंदमय आहे. अज्ञातवासी यांच्या काव्यांत जितकी राष्ट्रीयवृत्ति तितकीच विरागी यांच्या 'मधुसंभारांत' गूढगुंजनप्रवृत्ति दिसून येते. निशिगंधांच्या 'निशा-गीत' व 'जोत्स्ना-गीत' या सानसुंदर काव्यांत निशिगंधाचा परिमळ दरवळल्याचा भास होतो. सारांश, या परिच्छेदात उल्लेखिलेल्या कवींनीं १९२० सालानंतर मराठी काव्याची परंपरा अव्याहत रीतीने चालू ठेविली व 'महाराष्ट्र कविपरपरा खंड न पडला इला जरा' हेंवी कवींचे अभिमानोद्गार खरे करून दाखविले.

कवींच्या बरोबरच कांहीं कवयित्रींचाहि उल्लेख करणें क्रमप्राप्त आहे. लक्ष्मीबाई टिळक यांची कविता जितकी प्रसादयुक्त तितकीच लक्ष्मीबाई अभ्यंकर यांची कविता विचारगंभीर आहे. लक्ष्मीबाई अभ्यंकर यांनीं सीताविलाप, महालक्ष्मी इत्यादि स्फुट कविता लिहिल्या असून त्या मनोरंजन, विविधज्ञानविस्तार या मासिकांतून प्रसिद्ध झाल्या आहेत. सौ. शांताबाई फणसे व लक्ष्मीबाई बेहरे यांची कविता वैणिक असून सरस्वतीबाई भिडे यांची कविता कथनपर आहे. मनोरमाबाई रानडे

यांच्या भावगीतांत उत्कटता अनुभवाला येते. या कवयींत्रींच्या काव्यांत प्रतिभेची दीप्ति नसली तरी शालीनता, मार्दव व शुचिता हे गुण त्यांत आहेत. आर्यपतिव्रतांच्या अभिजात वृत्तीचे आल्हादक आविष्करण या कवियींत्रींच्या काव्यांत आढळते. म्हणून त्यांनी अर्वाचीन काव्याच्या प्रगतीला स्पृहणीय हातभार लावला आहे असे म्हटल्यास त्यात अतिशयोक्ति होणार नाहीं.

येथपर्यंत आधुनिक कवींनीं मराठी वाङ्मयांत कोणती भर घातली यांचे संक्षिप्त विहंगमावलोकन केलें. आतां आपण अर्वाचीन कवि व त्यांची कविता यांवर कोणते आक्षेप घेतले गेले आहेत याचा विचार करूं. अर्वाचीन कविता जशी निर्माण होऊं लागली त्यावेळीं पुराणमताभिमानी टीकाकारांनीं प्रखर टीका करण्याला सुरवात केली. विशेषत: १९०६–७ च्या सुमारास अर्वाचीन काव्यावर अजगांवकर प्रभृती टीकाकारांनीं कांही आक्षेप घेतले आहेत: (१) अर्वाचीन कवि हे गुलाम आहेत पण प्राचीन कवि स्वतंत्र होते. (२) प्राचीन कवींचे आचरण शुद्ध होतें. म्हणून त्यांचें काव्य शुद्ध व सरस आहे. अर्वाचीन कवींचे आचरण अशुद्ध म्हणून त्यांचे काव्य अशुद्ध व नीरस आहे. (३) पूर्वीचे कवि ईश्वरभक्ति हे काव्याचे जीवन मानीत; हल्लींचे कवि पशुपक्षी, झाडें झुडुपें यांवर कविता करितात म्हणून हल्लींचे कवि पूर्वीपेक्षां हीन आहेत. (४) पूर्वीचे कवि प्रसिद्धीस्तव किंवा द्रव्यास्तव काव्य करीत नसत, पण हल्लींचे कवि पैशासाठीं व प्रसिद्धीसाठीं काव्य लिहितात. (५) हल्लींचें कवि मेलेल्या बायकोसाठीं रडतात; पूर्वीचे कवि तसें करीत नसत. (६) पूर्वीच्या कवींत प्रसाद आहे; हल्लींच्यांत आढळत नाहीं. पूर्वीच्या कवींत प्रतिभा होती; हल्लींचे कवि मारून मुटकून कवि बनले आहेत. (७) पूर्वी अनेक महाकवि झाले. हल्लीं एकहि नाहीं. (८) प्राचीन कवि एकमेकांशीं सलोख्यानें वागत व अर्वाचीन कवि भांडखोर आहेत. अशाप्रकारचे आक्षेप कै०

आजगांवकर यांनीं 'प्राचीन व अर्वाचीन कवि' या (१९०७ सालचा इंदुप्रकाश) लेखांत घेतले आहेत. पण हे सर्व आक्षेप प्रतिनिविष्ट बुद्धीचे निदर्शक आहेत. प्राचीन कवींचा अभिमान बाळगणाऱ्याने अर्वाचीन कवींचा अधिक्षेपच केला पाहिजे असें नाहीं. या सर्व आक्षेपांना वा. अ. भिडे यांनीं 'काव्यदोहनाच्या' प्रस्तावनेंत समर्पक उत्तर दिले आहे. भिडे लिहितात: "हल्लीं इंग्रजांचें राज्य महाराष्ट्रावर आहे म्हणूनच जर सांप्रतच्या कवींना गुलाम म्हणावयाचे असेल तर गुलाम या नांवाला नामदेव, एकनाथ, दासोपंत, तुकाराम, रामदास यांचाहि हक्क पूर्णपणे शाबीत होतो. कारण त्या कवींच्या वेळींही महाराष्ट्र परतंत्र होता. प्राचीन कवींपैकीं बऱ्याच जणांचे आचरण कोणत्या प्रकारचें आहे हें जाणण्यास कांहींच साधने नाहीत. तेव्हां प्राचीन व अर्वाचीन कवींच्या आचरणांची व मतांची तुलना करावयाची म्हणजे आपले लक्ष आपल्यापुढे असलेल्या त्यांच्या काव्यांनीच मर्यादित केले पाहिजे व त्यांवरूनच निकाल लावला पाहिजे. शिवाय अर्वाचीन सबंध कविवर्गावर दुराचरणाचें सरसहा दूषण लावणें हे फार अविचाराचें साहस आहे. हल्लींचे कवि मेलेल्या बायकोसाठीं रडतात हा आक्षेप वाचून आम्हांला तर हसूं येतें. कां कीं, मेलेल्या बायकोसाठीं रडणे हे जर कवित्वाला बाधक असेल तर वाल्मिकी-व्यासांपासून तों लेंभे भांडाऱ्यापर्यंत दरोबस्त कवींपैकीं कोणीहि या दोषांतून सुटून उपरिनिर्दिष्ट टीकाकारांच्या कविकसोटीला उतरेल असे वाटत नाहीं. काव्यासंबंधीं 'प्रसाद' हा शब्द योजिला असता त्याचा साहित्यशास्त्रांत रचनेचा सरळपणा, सुबोधता असा अर्थ होतो. या अर्थानें हा शब्द योजिला असतां अर्वाचीन कवींसंबंधीं प्राचीन कवींहून विशेष तक्रार करण्यास मुळींच जागा नाहीं. परंतु पूर्व कवींसंबंधानें 'प्रसाद' हा शब्द योजिला असतां त्याचा अर्थ 'ईश्वरी प्रसाद', 'ईश्वरी स्फूर्ति' असा करण्याचा टीकाकाराचा सामान्यतः रोख आढळतो. पण हा अर्थ घेतला

म्हणजे 'प्रसाद' व 'प्रतिभा' यांत वस्तुतः कांहींच भेद रहात नाहीं. मग प्राचीन कवींची प्रतिभा तेवढी ईश्वरनिर्मित व अर्वाचीन कवींची ईश्वरनिर्मित नाहीं. अशी अद्भूत कल्पना या टीकाकाराच्या माथ्यांत कशी भरली यांचें आम्हांस राहून राहून नवल वाटतें. महाकवि म्हणजे महाकाव्याचा कर्ता असा असेल तर महाकाव्याची लक्षणें ज्यास लागू पडतात अशीं काव्यें अर्वाचीन कवींनीं लिहिलीं आहेत. (काव्यदोहन प्रस्तावना पृ. १९–२२) म्हणून प्राचीन कवींची स्तुति करून अर्वाचीन कवींना दूषण देणें हें अनुचित व असमंजसपणाचें आहे. परिस्थिति-विशेषानें काव्याच्या स्वरूपांत कितीहि फरक झाला तरी आल्हादप्रदता हें त्याचें वैशिष्ट्य कायम आहे. म्हणून 'पुराणमित्येव न साधु सर्वं न चापि काव्यं नवमित्यवद्यम्' ही कालिदासोक्ति टीकाकारांनीं सदैव डोळ्यापुढे ठेवणें योग्य आहे.

अर्वाचीन कवींनंतर अर्वाचीन काव्यांवरील आक्षेपांचा विचार करणें हेंहि अवश्यक आहे. प्रा. श्री. नी. चापेकर यांनीं अनंततनयांच्या हृदय-तरंगाच्या दुसऱ्या भागाला प्रस्तावना लिहिली असून त्यांत काव्याची तात्त्विक मीमांसा केली आहे. त्यांत त्यांनीं अर्वाचीन कवि 'बिंदुस्रावी' असल्यामुळें त्यांची कविता त्रुटित असते व अर्वाचीन काव्यांत भाषा-वैभवाचा अभाव आहे असे आक्षेप घेतले आहेत. पण हे दोन्ही आक्षेप समर्पक वाटत नाहींत. कारण अर्वाचीन कविता त्रुटित होऊं लागली हें दूषण होऊं शकणार नाहीं. कारण ती वैणिकस्वरूपाची असल्यानें त्रुटित-पणा दोष नसून उलट गुणच आहे. पुन्हां असें की काव्याचें सौंदर्य संख्येपेक्षां सौंदर्यावर अवलंबून असतें व भावगीतें ही लघुता व लालित्य यांनींच अधिक खुलून दिसतात. चंद्रशेखर, लेंभे, मोगरे प्रभृति कवींची कविता भाषेच्या दृष्टीनें किती वैभवशाली आहे हें पाहिलें म्हणजे त्यांचा दुसरा आक्षेप निर्मूल ठरतो. श्री मांडखोलकर यांनीं अर्वाचीन कविता

ही प्रणयप्रधान अर्थात् स्त्रैण आहे असा आक्षेप घेतला आहे ( अर्वाचीन मराठी साहित्य पृ. ११–१३ ). पण हें त्याचें मत सदोष आहे. कारण अर्वाचीन कवींनीं प्रणयगीतांबरोबर इतर प्रकारची कविताहि विपुल लिहिली आहे. आधुनिक काव्यांत निसर्ग वर्णन, तत्त्वचिंतन, पौराणिक कथा, ऐतिहासिक कथा, प्रदीर्घ काव्यें, विनोदीं व वैलापिक काव्ये असे अनेक काव्यप्रकार आढळतात. म्हणून केशवसुतांनी प्रवर्तित केलेले युग हे केवळ प्रणयप्रधान असें मानणे हें अन्यायमूलक नाही काय? श्री. न. चिं. केळकर यांनीं १९२१ सालच्या बडोदें येथील साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षीय भाषणांत अर्वाचीन कवितेच्या दूषकांना समर्पक उत्तर दिलें आहे. त्यांत ते म्हणतात: ' आधुनिक कवितेचे हें वैचित्र्य जसे चमत्कृतिजनक तसेंच आनंददायक आहे (समग्र केळकर खंड १० पृ. १६ ). सारांश, आधुनिक काव्याच्या त्रुटितपणाबद्दल दूषण देणें किंवा प्रणयलोलुपतेबद्दल उपहास करणे हे केव्हांहि असमंजसपणाचें व अप्रयोजक आहे.

येथपर्यंत अर्वाचीन कवींच्या काव्यांविषयीं उहापोह केला. अर्वाचीन कवींत प्रामुख्यानें तीन प्रकार आढळतात. पहिला संस्कृत भाषांतराचा (पंडित कवि ), दुसरा जुन्या-नव्या वळणाचा ( सांप्रदायिक कवि ) व तिसरा वैणिक पद्धतीचा ( भावकवि ) होय. गोडबोले–चिपळूणकर यांनीं अध्यात्माकडून मराठी कवितेचें लक्ष संस्कृत काव्यांच्या भाषांतराकडे वळविले. आणि गीर्वाण वाणींतील रसनिर्झरिणीचा प्रवाह मराठी वाक्सरितेंत आणून सोडला. कीर्तिकर व महाजनी यांनीं इंग्रजी काव्याचीं भाषांतरें केलीं. लेंभे, मोगरे व चंद्रशेखर यांनीं प्राचीन काव्याचें वळण न सोडतां इंग्रजी काव्याचे विशेष ग्रहण करून नव्या जुन्या वळणाची कथनपर कविता लिहिली. केशवसुतांनीं ' अद्‌भुतरम्य युगाची ' स्थापना करून भावगीतें लिहिण्याची परंपरा निर्माण केली. निसर्ग, सौंदर्य, प्रेम, राष्ट्राभिमान व गूढगुंजन हें या केशवसुतीय युगाचें प्रमुख विशेष म्हणून सांगता येतील.

अंतरंगाप्रमाणें बहिरंगांतहि बदल झाला. अक्षरगणात्मक वृत्तरचना मागें पडून संगीत नाटकाचा चटका कानाला लागून त्यांतील कर्णमधुर पदांच्या गोड चालीवर मराठी कविता निर्माण होऊं लागली. अशारीतीनें केशवसुतांच्या या अद्भुतरम्य युगांत मराठी कवितेला स्फुट, ललित व सहजोद्गारी असें स्वरूप प्राप्त झालें. त्याप्रमाणेंच समाजसुधारणा, दलित वर्गाविषयीं सहानुभूति व विधवांची दुःस्थिति हे विषय अर्वाचीन काव्यांत येऊं लागले. रे. टिळकांनीं फुलामुलांचीं गीतें गाईलीं तर विनायकांनीं राष्ट्रीय काव्यें निर्माण केलीं. गोविंदाग्रजांनीं प्रेमगीतें लिहिलीं तर बालकवींनीं निसर्गगीतें लिहिलीं. एकाच वाक्यांत सांगावयाचें झाल्यास या युगांतील कविता आत्मलक्षी (Subjective) आहे. व या आत्मलक्षीपणांत तिची अलौकिक मोहिनी अंतर्भूत झाली आहे. आत्मश्लाघा, भाषेच्या बाबतीत निरंकुशत्व, गूढगुंजनामुळें येणारी निरर्थकता व अनुकरणात्मक प्रवृत्ति हे या युगाचे दोष म्हणून सांगतां येतील. सारांश, अर्वाचीन काव्याचें स्वरूप प्राचीन काव्यापेक्षां कितीहि वेगळें असलें तरी त्यांत रसवत्ता व रंजनप्रदता ही कमी झालेली नाहींत. श्री. कृ. कोल्हटकर यांनीं म्हटल्याप्रमाणें केशवसुत, मोगरे, लेंभे, टिळक, विनायक, घाटे, गोविंदाग्रज, बालकवि, माधवानुज व रेंदाळकर इत्यादि गत व अनेक विद्यमान आधुनिक निवडक कवींच्या वेंचक कवितांचा संग्रह प्रसिद्ध होण्याची वेळ आता आली आहे. तो संग्रह भारतीयासच केवळ नव्हे तर परदेशस्थासहि आदरणीय वाटेल अशी खात्री आहे. (काव्यचर्चा पृ. ३२). तात्पर्य, मराठी काव्यांतील हें "अद्भुतरम्य युग" जितकें वैणिक ( Lyrical ) तितकेंच वैचित्र्यपूर्ण आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

———o———

# प्रकरण पांचवें

## मराठी काव्यांतील रस–विलास

रतरीतवसना प्रियेव शुद्धापि वाङ्मुदे सरसा ।
अरसा सालंकृतिरपि न रोचते शालभंजीव ।।

—गोवर्धनाचार्य – आर्यासप्तशती.

संस्कृत साहित्यांत काव्यविवेचनास प्रारंभ फार प्राचीन काळीं झाला. यास्काचार्यांच्या निरुक्तांत अलंकारांच्या व्याख्या आढळतात व पाणिनी-काळीं तर अलंकाराचा बराच उत्कर्ष झाला होता असें अष्टाध्यायींतील उल्लेखावरून आढळतें. साहित्यशास्त्रांत प्रारंभीं अलंकाराला प्राधान्य होतें आणि अलंकारामुळेंच हें काव्यविवेचनाचें शास्त्र प्रथम उदयास येऊन त्याला 'अलंकारशास्त्र' हे नांव रूढ झालें. भामहानें आपल्या ग्रंथांत प्रामुख्याने अलंकारांचें विवेचन केलें आहे. दण्डीनें 'काव्यादर्शांत' गुण व अलंकार यांचें सोदाहरण विवरण केलें आहे. तथापि काव्याचें मूल तत्त्व कोणतें याचा विचार सुरू झाल्यानंतर निरनिराळे सिद्धांत पुढें येऊ लागले. कुंतलानें 'वक्रोक्तिजीवित' या ग्रंथांत वक्रोक्ति हें काव्याचें मूलतत्त्व आहे. असा सिद्धांत मांडला. वामनानें रीतीचा पुरस्कार केला असून क्षेमेंद्रानें औचित्यावर भर दिला आहे. यानंतर आनंदवर्धनांनीं ध्वनि सिद्धांताला महत्त्व व मान्यता आणून दिली. महाकवीच्या वाणीमध्यें वाच्य अर्थाहून भिन्न असा 'प्रतीयमान' किंवा 'व्यंग्य' अर्थ दिसून येत असतो. 'प्रतीयमानं-पुनरन्यदेव वस्त्वस्ति वाणीषु महाकवीनाम् । यत्तत्प्रसिद्धावयवातिरिक्तं विभाति लावण्यमिवाङ्गनासु (ध्वन्यालोककारिका ४) असें आनंदवर्धनानें म्हटलें आहे. या ध्वनीचेहि वस्तुध्वनि, अलंकारध्वनि व रसध्वनि असे तीन भेद केले आहेत. अभिनवगुप्त लिहितात: 'रसेनैव सर्वं जीवति काव्यम् ।

नहि तच्छून्यं किंचिदस्ति । रस एव वस्तुतः आत्मा । वस्त्वलंकारध्वनि तु सर्वथा रसं प्रतिपर्यवस्येते ' रस हेच काव्याचें जीवन होय. रसाविरहित असें कांहीं नाहीं. वस्तुतः रस हाच काव्याचा आत्मा आहे. वस्तुध्वनि व अलंकारध्वनि यांचे पर्यवसान रसध्वनींतच होतें. शेवटी विश्वनाथाची काव्यात्म्याची रस विषयक उपपत्ति हीच सर्वमान्य होण्याजोगी आहे. त्याने ' वाक्यं रसात्मकं काव्यं '– अशी काव्याची व्याख्या केली असून राजशेखरानेंहि काव्याच्या देहात्मरूप वर्णनांत रसालाच काव्याचा आत्मा मानिलें आहे. सारांश, सहृदय रसिकांचें चित्त आनंदगर्भतल्लीन करणारा रस हाच काव्याचा आत्मा आहे, यांत मुळींच शंका नाहीं.

रस हा काव्याचा आत्मा आहे हे सिद्ध झाल्यानंतर त्याची निष्पत्ति कशी होते याचा विचार करणे हे ओघानेंच येतें. या बाबतींत भरतानें पुढील दंडक घालून दिला आहे : ' विभावानुभावस्य व्यभिचारीसंयोगाद्रसानिष्पत्तिः । को दृष्टान्तः । यथाहि गुडादिभिर्द्रव्यंव्जनैरोषधिभिश्च षाडवादयो रसाः निर्वर्त्यन्ते तथा नानाभावोपगता अपि स्थायिनोभावा भवन्ति ( नाट्यशास्त्र अ. ६ श्लोक ३२ नंतरची वृत्ति ) — विभाव, अनुभाव व व्यभिचारी भाव यांच्या संयोगाने रसोत्पत्ति होते. याला दृष्टांत काय तो हा ज्याप्रमाणें अनेक प्रकारच्या औषधी, द्रव्यें व तोंडीं लावणी यांनीं षाडव आदि रस निष्पन्न होतात त्याप्रमाणेच नानाप्रकारच्या भावांनीं स्थायीभाव रसरूप पावतात. संस्कृत ग्रंथकारांनीं मानवी भावनांचें स्थायीभाव व व्याभिचारी भाव असें वर्गीकरण केलें आहे. रति, हास, शोक, क्रोध, उत्साह, भय, जुगुप्सा, विस्मय व शम हे आठ स्थायी व निर्वेद, औत्सुक्य इत्यादि ३३ व्यभिचारी भाव सांगितले आहेत. जगन्नाथानें स्थायी व व्यभिचारी भाव यांतील भेद दर्शविण्याचें उत्कटता हें स्वतंत्र तत्त्व मांडलें आहे. जो मनोविकार उत्कटतेप्रत जाऊं शकेल त्यालाच रसत्व प्राप्त होईल व ज्या भावनांच्या अंगीं उत्कटतेप्रत पोंचण्याचें सामर्थ्य असेल त्यालाच स्थायी

ही संज्ञा देण्यांत यावी उत्कटतेप्रमाणेंच आस्वाद्यता हें दुसरें तत्त्व होय. विश्वनाथ लिहितो कीं, 'आस्वादांकुरकंदोऽसौ भावः स्थायीति संमतः' (३. १७४)–ज्या मनोवृत्तींत आस्वाद्यमानता बीजरूपानें स्थित आहे तीं मनोवृत्ति स्थायी होय. या भावना नेहमींच जागृत नसतात व त्यांना चेतना आणण्यासाठीं अनेक कारणें असतात, त्यांपैकीं विभाव हे प्रमुख होत. विभावाचें आलंबनविभाव व उद्दीपनविभाव असे दोन वर्ग केले आहेत. हे स्थायीभाव मनुष्यामध्यें प्रगट व्हावयाचे असल्यानें नायकादि व्यक्ति आलंबनविभाव समजल्या जातात. हा रस उद्दीपित होण्यास नायकनायिकादिकांच्या चेष्टा, देशकालपरिस्थिति इत्यादि कारण असल्यानें त्या उद्दीपनभाव मानल्या जातात. उदाहरणार्थ वसंतऋतु, कोकिलगायन, उद्यान, चंद्रोदय या गोष्टी शृंगाररसाच्या उद्दीपनभाव होत. या विभावांचा परिणाम म्हणून नायकनायिकादिकांच्या शरीरावर ज्या क्रिया दिसून येतात त्यास अनुभाव असें म्हणतात. रोमांच, वेपथु इत्यादि अष्टसात्विकभाव यांतच येतात. यापेक्षांहि ज्या मनोवृत्ति एकाच रसास कधीं चिकटून असत नाहींत त्यांना व्यभिचारी भाव किंवा संचारी भाव असें म्हणतात. या सर्वांच्या सुंदर संयोगानें वाचकांच्या मनांत जीं आनंदमय चित्तवृत्ति उत्पन्न होते तीसच रस असें म्हणावयाचें. सारांश, 'रस्यते आस्वाद्यते असौ रसः' हेंच खरें; व कोणत्याहि रसाचा परिणाम आनंदस्वरूपींच असला पाहिजे हा मात्र मुख्य सिद्धांत आहे.

रस हें काव्याचे नियामक तत्त्व असलें तरी त्याच्या संख्येंत भरपूर मतवैचित्र्य आढळतें. भरतमुनींनी शृंगारादि आठ व नववा शांत असे नऊ रस मानले व संस्कृत साहित्यकोविदांनीं याच संख्येला मान्यता दिली आहे. कालिदासानें विक्रमोर्वशीय नाटकांत इंद्राच्या दरबारांत नाटक-प्रयोग करून दाखविण्यासाठीं ऊर्वशीला जें बोलावणें आलें तत्संबधींच्या श्लोकांत सदरहू नाटक 'अष्ट रसाश्रय' आहे असें म्हटलें आहे. त्यावरून

कालिदासाला आठ रसच मान्य होते असें म्हणावयास हरकत नाहीं. मंमट, विश्वनाथप्रभृति काव्यकोविदांनीं शृंगार, वीर, करुण, हास्य, रौद्र, भयानक, बीभत्स व शांत असे नऊ रस मानले असून ते रति, हर्ष, शोक, क्रोध, उत्साह, भय, जुगुप्सा, विस्मय व निर्वेद या नऊ स्थायीभावांवर अधिष्ठित आहेत. तथापि या नऊ रसांचा अंतर्भाव चारांत होऊं शकेल असे भरतानेंच सांगितल्यामुळे पुढें मतभेद निर्माण झाले. त्यानें शृंगार, वीर, बीभत्स व रौद्र या चार रसांनाच प्राधान्य दिलें आहे. शृंगारप्रकाशकारानें एका शृंगारालाच रससंज्ञेचा मान दिला आहे तर साहित्यदर्पणकारांचे प्रपितामह नारायण यांनीं हा मान अद्‌भुतरसाला द्यावा असें मत व्यक्त केलें आहे. भवभूतीनें 'एको रसः करुणमेवनिमित्तभेदात्' या ओळींत करुणरसाला प्राधान्य दिलें आहे. कांहींजण शांतरस मानत नाहींत. विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं सृष्टींतील भव्योदात्त दृश्यांच्या वर्णनाला 'उदात्त रस' असें कल्पिलें आहे. सारांश, रससंख्या किती मानावी यांविषयीं काव्यशास्त्रज्ञांचें एकमत आढळून येत नाहीं.

प्रा. श्री. नी. चापेकर यांनीं काव्यचर्चा या ग्रंथांत रसविचारांचे अभिनव दिग्दर्शन केलें आहे. प्रा. चापेकर यांच्या या उद्‌बोधक लेखानें मराठी साहित्यांत रसमीमांसेला प्रारंभ झाला असें म्हणावयास हरकत नाहीं. त्यांत त्यांनीं रसाचा उगम रति अथवा उत्कट भावनाविष्कार असें सांगून रसांचे एका अभिनव दृष्टीनें वर्गीकरण केलें आहे. शृंगार, वीर व करुण हे तीन रसच प्रमुख मानले आहेत. करुण हा स्त्रियांच्या मृदुलवृत्तीचा निदर्शक असून हा वीर पुरुषाच्या पौरुषप्रदर्शक प्रवृत्तीचा द्योतक आहे; व शृंगार हा स्त्री व पुरुष यांना स्वतःसिद्ध, सहजगम्य व सर्वसामान्य आहे. बीभत्स, रौद्र व भयानक या रसांचा त्यांनीं वीररसांतच अंतर्भाव केला असून हास्याला त्यांनीं स्वतंत्र रसपदवी नाकारली आहे. जुन्या मराठी वाङ्मयाचें भक्तिरसात्मकता हें वैशिष्ट्य असल्यानें तितक्यापुरतें भक्ति हा

रस मानणें अवश्य व इष्ट आहे असें आपले मत व्यक्त केले आहे. सारांश, प्रा. चापेकर यांनीं "श्रृंगार, वीर व करुण या तीन मूळ रसांतच यथायावत् भावनामय मानवी जातीचे त्रिविध प्रवृत्त्यात्मक जीवित प्रतिबिंबित झालें आहे आणि सर्व रसांचा उपसंहार व अंतर्भाव एकाच शांत रसांत होतो असा सिद्धांत प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला आहे. श्री. कृ. कोल्हटकर यांनीं 'विदर्भवीणा' या पुस्तकाच्या प्रस्तावनेत रसविषयक नवविचार ग्रथित केले आहेत. त्यांत ते लिहितातः—रस किंवा भाव याचा अर्थ मनःक्षोभ हा असून विकारित्व व चढउतार हे त्यांचें लक्षण होय. वर्ण्यव्यक्तीचा प्रमुख चिंतनविषय स्वतः अगर स्वेतर असेल त्याप्रमाणें रसाचे अंतर्मुखदृष्टिमूलक व बहिर्मुखदृष्टिमूलक असे दोन भेद होऊं शकतात. पुनः चिंतनविषय श्रेष्ठ, समान व कनिष्ठ असेल त्या मानानें तीन व तो सुखप्रद व दुःखप्रद असेल त्या मानानें प्रत्येकाचे दोन असे बहिर्मुखदृष्टि-मूलक रसाचे सहा प्रकार होतात. अंतर्मुखदृष्टिमूलक रसाचेहि चिंतनविषय श्रेष्ठ व सुखप्रद अगर कनिष्ठ व दुःखप्रद असेल त्या मानानें दोन प्रकार होतात. काव्याचे विषय सुंदर व उदात्त हे दोनच असून श्रृंगार रसाचा विषय सुंदरवस्तु हा आहे व बीभत्साशिवाय इतरांचा उदात्तवस्तु हा असतो. तात्पर्य, कोल्हटकरांनीं सौंदर्य (Beautiful) व उदात्तता (Sublime) या दृष्टीनें रसमीमांसा केली आहे व शेवटीं 'काव्यांचें विषय उदात्त व सुंदर असे द्विविधच होऊं शकतात हें भारतीयांनीं जरी ओळखलें नव्हतें तरी त्यांच्या साहित्यशास्त्रीय परिभाषेवरून त्यांची त्यांस अंधुक कल्पना होती असे उद्गार काढले आहेत.

प्रा. चापेकर यांच्या रसविषयक उपपत्तीवर प्रा. जोग यांनीं जे आक्षेप घेतले आहेत त्यांचाहि आतां उल्लेख करणें क्रमप्राप्त आहे. ते लिहितात: 'प्रा. चापेकर यांची ही उपपत्ति थोडीशी अपूर्व व थोडीशी चुकीची आहे. रसाची उपपत्ति स्त्रीपुरुषविषयक भावनांवर अधिष्ठित

करावयाची व या उपपत्तीस एक तत्त्व मिळवून द्यावयाचें हें कार्य त्यांनीं केलें हें खरें; परंतु हेंच तत्त्व जेवढें पुढें न्यावयास पाहिजे तेवढें त्यांनीं नेलें नाहीं. म्हणून त्यांची उपपत्ती अपूर्ण राहिली. त्यांनी केलेलें भावनांचें वर्गीकरण स्त्रीपुरुषविषयक संबधांवर रचले गेलें असल्याने तें अव्यापक झालें आहे. भावनांचें संघ पुढीलप्रमाणें आहेत: Joy, Sorrow, Fear, Anger या चार मुख्य व Disgust, Repungnce, surprise, Curiosity व Wonder, या गौण होत. शेवटले चार प्रकार मूलभूत व स्वतंत्र असले तरी पहिल्या चारांइतके पुनः पुन्हा व्यक्त होत नसल्यानें त्यास थोडें गौणत्व आलें आहे. या भावनांच्या वर्गीकरणाचा आधार घेऊन आपल्या रसांच्या वर्गीकरणाकडे पाहिल्यास पुढील गोष्टी आपणांस दिसून येतील. आपल्या लोकांनींहि या रसास मूलभूत असे आठ स्थायीभाव कल्पिले आहेत. ते पुढील प्रमाणें: रति (शृंगार), उत्साह (वीर), शोक (करुण), क्रोध (रौद्र), हास (हास्य), भय (भयानक), जुगुप्सा (बीभत्स) व विस्मय (अद्‌भुत). यांतील निदान पांच तरी वर्गीकरणांतील मूलभूत भावनास जुळतील असे वर वर पाहणाऱ्यासहि दिसून येईल. ते असे: शोक हा Sorrow, भय हा Fear, क्रोध हा Anger, जुगुप्सा हा Disgust व विस्मय हा Surprise यांशीं अनुक्रमें समान आहेत. तेव्हां या पांच स्थायी भावांना व त्यांच्या रसांना स्वतंत्र स्थान देण्यास पाश्चात्य मानसशास्त्राचीहि हरकत नाही. प्रा. जोग हे प्राथमिक भावनांची कसोटी गृहित धरत असल्यामुळें शृंगाररसाच्या बाबतींत अडचणींत आले आहेत. प्रा. जोग यांनीं मूलभूतता व सार्वत्रिकता ही रसाची कसोटी मानली आहे. तर प्रा. द. के. केळकर यांनीं उत्कटता व आस्वाद्यमानता ही कसोटी मान्य केली आहे. भावना जरी मूलभूत नसली तरी आस्वाद्यमान असेल तर तिच्या आविष्कारांत मन रंगून जातें म्हणजेच रसप्रतीति होते. प्रा. केळकर यांनीं भक्तिरसाचें समर्थन करून काव्यालोचनांतील 'रसचर्चा' या सुंदर प्रकरणाची परिसमाप्ति केली आहे.

प्रा. पटवर्धन यांनी 'रसव्यवस्थेचें वैय्यर्थ्य' या लेखांत प्राचीन रस-व्यवस्था कशी सदोष आहे हें सांगून प्राचीन रसव्यवस्थेचें वैय्यर्थ्य सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. प्रा. पंगु यांना प्राचीन व्यवस्था मान्य असून त्यांनीं भक्तिरसाला विरोध केला आहे. डॉ. वाटवे यांनीं 'रसविमर्श' या ग्रंथांत नवरसांची मानसशास्त्राच्या दृष्टीनें सूक्ष्म मीमांसा केली आहे. भारतीय रसमीमांसा ही आधुनिक मानसशास्त्राच्या दृष्टीनें कशी समर्पक आहे हे दाखवून भक्तिरसाचें समर्थन केलें आहे. श्री. न. चिं. केळकर यांनीं 'हास्यविनोदमीमांसा' या ग्रंथांत हास्यरसाचें सर्वांगीण विवेचन केलें आहे. प्रा. रद्दीशास्त्री यांनीं 'रसामोद' [साहित्य तोरण] या लेखांत रसापासून आनंद कसा होतो यांचें विवरण केलें आहे. प्रा. रा. श्री. जोग यांनीं 'सौंदर्य शोध व आनंद बोध' या ग्रंथांत सतरा व अठरा या दोन प्रकरणांत रसमीमांसा केली आहे. सारांश ही सर्व रस-चर्चा वाचल्यानंतर भारतीय रसव्यवस्था किती सूक्ष्म व सुंदर आहे याची कुणालाहि प्रचीति आल्यावांचून रहाणार नाहीं.

येथपर्यंत निरनिराळ्या साहित्यकोविदांनीं केलेल्या रसमीमांसेचें विहंगमावलोकन केलें. त्यावरून त्यांत किती मतवैचित्र्य आहे याची वाचकांना कल्पना येईलच. ललित व उदात्त हे दोनच काव्याचे विषय होऊं शकतात. ललितवस्तूंच्या दर्शनानें वैचित्र्यमूलक सुख होतें तर उदात्त-वस्तूंच्या दर्शनानें विस्मयमूलक सुख होतें. या दृष्टीनें रसाचें ललित व उदात्त असे दोन भेद पाडतां येतील. शृंगार, अद्‌भुत, हास्य, शांत व भक्ति यांची गणना ललितरसांत व वीर, करुण, बीभत्स, भयानक व रौद्र यांची गणना उदात्त रसांत करितां येईल. श्री. कृ. कोल्हटकर म्हणतात त्याप्रमाणें प्रेम हा शृंगाररसाचा स्थायीभाव करून त्याचे संभोग, विप्रलंभ व विमल असें त्रिविध वर्गीकरण करितां येईल; व विमल शृंगारांत वात्सल्याचा अंतर्भाव करितां येईल. म्हणून शृंगार, वीर, करुण, अद्‌भुत,

हास्य, भयानक, रौद्र, भक्ति, शांत व बीभत्स हें दहा रस मानून त्यांचे ललित व उदात्त असे भेद करावयाला हरकत नाहीं. अशाप्रकारें रस-मीमांसेंत मतभेद असले तरी रस हा काव्याचा आत्मा आहे यांत मतैक्य आहे. काव्यांतील चैतन्य व चारुता ही त्यांतील रसाविष्कारावर अवलंबून आहे. म्हणून 'नियतिकृतनियमरहित' अशी आल्हादक सृष्टि निर्माण करणाऱ्या कवीचें श्रेष्ठत्व रसनिष्पत्तींतच असतें. सारांश, रस हाच काव्याचें सौंदर्यसर्वस्व व आल्हादनिष्कर्ष आहे यांत यत्किंचितहि संशय नाहीं.

येथपर्यंत रसांचें तात्त्विक समालोचन केले. आतां आपण शृंगाराचें विवेचन करूं. सर्व रसांत शृंगाररसालाच अग्रपूजेचा मान दिला जातो. रघुनाथ पंडितांनीं 'जो माझा सरसावला नवरसामाझारि शृंगारसा' असें म्हटलें असून वामनपंडितांनीं 'शृंगाररूप पहिला रस चाखवीला' असें सीतास्वयंवरांत म्हटलें आहे. खाडिलकरांच्या 'मानापमान' या नाटकांत खाडिलकरांनीं 'शृंगारराजा नवरसदल ल्याला' असें नायकाच्या मुखांतून वदविलें आहे. स्त्रीपुरुषांच्या संयोगमूलक भावनांचें या रसांत आविष्करण होत असल्यामुळें त्याला इतकी सुखप्रदता व सुसेव्यता आली आहे. सर्व ऋतूंत कुसुमाकर, ग्रहमालिकेंत प्रभाकर, त्याप्रमाणें रसमंडलांत शृंगार होय. शृंगाराचे संभोग व विप्रलंभ असे भेद केले आहेत. संभोगशृंगारांत परस्परानुरक्त स्त्रीपुरुषांच्या संयोग-सान्निध्याच्या अवस्थेंतील त्यांच्या सुख-विलासविहारादिकांचें वर्णन केलेलें असतें. साहित्यदर्पणांत, 'दर्शन स्पर्शनादीनि निषेवेते विलासिनौ । यत्रानुरक्तावन्योन्यं संभोगोऽयमुदाहृतः' असें संभोग शृंगाराचें वर्णन केलें आहे. विप्रलंभ शृंगारांत परस्परानुरक्त स्त्रीपुरुषांच्या संयोगपूर्व किंवा संयोगोत्तर होणाऱ्या अभिलाष, आर्तता, विरह, वियोगादि अवस्थेंतील चेष्टाव्यापारांचें वर्णन केलेलें असतें. साहित्य-दर्पणकारांनीं 'यत्र तु रतिः प्रकृष्टा नाभीष्टमुपैति विप्रलम्भोऽसौ' -जेथें रतीला तिचा अभीष्ट विषय प्राप्त होत नाहीं तेथें विप्रलंभशृंगार जाणावा

असें म्हटलें आहे. पंडित विश्वनाथांनीं तो पूर्वराग, मान, प्रवास व करुणा या चार निमित्तांच्या अनुरोधानें चार प्रकारचा होतों असें सांगितलें असून मम्मटांनीं, अभिलाष, विरह, ईर्ष्या, प्रवास व शाप या पांच निमित्तांच्या अनुरोधानें पांच प्रकारचा होतो असें म्हटले आहे. उज्ज्वलनीलमणि-कारांनीं दोन तरुण प्रणयीजनांच्या संयोगाचा अभाव किंवा संयुक्त असून जेथे अन्योन्यांच्या आलिंगनादिकांच्या अप्राप्तीमुळें हर्ष पावतात तेथे विप्रलंभ शृंगार जाणावा असें म्हटलें आहे. सारांश, परस्परानुरक्त स्त्रीपुरुषांच्या मधुरमीलनामुळेंच मानवी जीविताला इतकी मनोज्ञता प्राप्त झाली आहे. म्हणून स्त्रीपुरुषांच्या आसक्तीच्या या भावनेला इतकी उत्कटता आली आहे. त्यांना वाटणाऱ्या उत्कट आसक्तीचा आविष्कार श्रृंगारसांत होत असल्यामुळे त्याला रसमालिकेत अग्रपूजेचा मान लाभावा यांत काय नवल? मानवाच्या प्राथमिक अवस्थेत या संयोगविषयक भावनेचें स्वरूप पाशवी होतें पण पुढें प्रणय-प्रियाराधन इत्यादि विविध रूपे त्याला प्राप्त होत चाललीं. यामुळे शृंगाररसाचें आविष्करण विविधप्रकारें होऊं लागलें. तात्पर्य, रतीची भावना सार्वत्रिक व स्वतः सिद्ध असल्यामुळें शृंगाररसालाच सर्व कालांत व सर्व भाषांत केव्हांहि अग्रपूजेचा मान मिळाल्यावांचून रहाणार नाहीं.

मराठी काव्यांत श्रृंगाररसाचा आविष्कार कसा झाला आहे याचा आतां विचार करूं. महानुभाव पंथीय ' शिशुपालवध ' या काव्यांत श्रीकृष्ण व रुक्मिणी यांच्या संवादांत शृंगाररस आढळतो. मुकुंदराजाचे ग्रंथ तात्त्विक असल्यामुळें त्यांत या रसाला वाव नाहीं. त्याचप्रमाणें श्रीज्ञानेश्वरी या ग्रंथांत देखील शृंगाररसाचा परिपोष आढळत नाहीं, हें खरें. पण त्यांत शांतरस मूर्धाभिषिक्त असला तरी ज्ञानेश्वरींत उपमा व दृष्टांतांच्या मिषानें शृंगाराच्या रुचिर छटा ठिकठिकाणीं विखुरल्या आहेत. नामदेव प्रभृति संतकवींच्या कृष्णलीलापर अभंगांतून क्वचित् हा रस अस्फुटतेनें प्रत्ययाला येतो. एकनाथांच्या ' रुक्मिणीस्वयंवर ' यांतील मुग्धशृंगार

वेदांताच्या दडपणाखालीं गुदमरून गेला आहे. मराठी भाषेंत नवरसात्मक अशी प्रसन्न रचना करणारे कवि म्हणजे मुक्तेश्वर हेच होत. त्यांनीं वेदांताला गौणत्व देऊन आपल्या महाभारतांत रसाला प्राधान्य दिलें आहे. त्यांनीच म्हटल्याप्रमाणें त्यांची वाणी 'नवरसें सुगारिणी । तृप्त करी सुखभोजनीं श्रवणद्वारें संतांते' अशी आहे. मुक्तेश्वरांच्या आदिपर्वांत श्रृंगाररसाचा मनोज्ञ विलास प्रत्ययाला येतो. आदिपर्वाच्या पंधराव्या अध्यायांत मेनका–विश्वामित्र यांच्या प्रणयविलासचे वर्णन फार बहारदार रीतीने केले आहे. उदाहरणार्थः 'आतां शंका सांडोनि मना । गंतव्य करावे ममाज्ञा । मेनका आली कौशिक वना । सालंकार सुवस्त्री ॥१३२॥ विश्वामित्रासि करूनि नमन । त्याचेच दृष्टीपुढें जाण । क्रीडाकौतुकें सुनर्तन । दाविती झाली विनोदें ॥१३३॥ वस्त्र ठेविलें सरोवरपाळीं । स्नान सारोनि कासारजळीं । नग्न असोनि वस्त्राजवळी । येतां साशंक विलोकीं ॥१३४॥ गंधवायुनें विनोदें तेथें । वस्त्र उडवोनि नेले परौते । येरीं धावोनि धरी हातें । तव तें वेगीं नाटोपें ॥ १३५ ॥ रातोत्पळ इंदीवर । आच्छादिजे तेवि सुकुमार । वामकरें कामागार । कवळोनि धांवे नग्नांगी ॥ १३६ ॥ यागतपाच्या पुण्यकोटीं । मोलें घ्यावया लागे पाठीं । अमोल्य नेदीं स्वल्पासाठीं । म्हणोनि मुष्टीं धरी वस्त्र ॥ १३७ ॥ धरोनि धांवे चपलांगीं । सलज्जा अंग झाकी वेगें । मुखें निंदित म्हणे 'आगी । पडे रे पवना पापिष्ठा ॥ १३८ ॥ नाभीतळींची रोमरेखा । सिंह मध्यें अति नेटका । देखतां ऋषीच्या विवेका । भ्रष्ट केलें मन्मथें ॥ १३९ ॥ भंगला नेमाचा तडाग । नकळत उडाला कौपीनभाग । मेनका चंदनतरूचे अंग । भुजभुजंगीं वेष्टिले ॥१४२॥ गौरजानु पयोधर कटी । अवलोकिता उटाउटी । धैर्य पळालें बारावाटीं । नाहींच झाला विचारु ॥ १४३ ॥ धांवोनि प्रमदेचे कंठीं । बाहुपंजरें घातली मिठी । सुरतसंगीं गाठीं । जी वैराग्यें सुटे ना ॥१४४॥ चुंबन आलिंगन मैथुन । ग्रंथिग्रयीं गुंतलें मन । कारितों काय मी

कवण । हे आठवण असेना ॥ १४५ ॥ (आदिपर्व अ. १५). अशाप्रकारें विश्वामित्राच्या कामनदीच्या कल्लोळाला पूर लोटला व 'सुरकार्य साधुनी सुरयुवती । जाती झाली सुरसदना' त्याचप्रमाणें आदिपर्वाच्या १६ व्या अध्यायांत लावण्यदीपिका शकुंतला व भोगाभिलाषी दुष्यंतभूप यांच्या गांधर्वविवाहवर्णनांत शृंगाररसाचा आविष्कार झाला आहे.

यापेक्षांहि मुक्तेश्वरी भारताच्या आदिपर्वाच्या १९ व्या अध्यायांत शृंगाररसाची उत्कटता अधिक आढळते. लावण्यखाणी शर्मिष्ठा ही पति-भोगाविरहित कामिनी होती. पुरुषसंगावांचून स्रक्‌चंदनादि सर्व उपभोग तिला खदिरांगारसमान वाटत होते; म्हणून ती जलविहीन कासाराप्रमाणें भ्रतारावांचून रात्रंदिवस तळमळत होती. अशी शर्मिष्ठेची प्रणयविह्वळ स्थिति झाली असतां एके दिवशीं ययाति तिच्या घरीं आला. त्यावेळीं तिला अत्यंत आनंद झाला व तिनें—"उदक ठेविलें दासीजनीं । शर्मिष्ठेनें स्वहस्तें करोनि । नृपतीस अभ्यंग घालोनी । क्षीरोदक नेसविला ॥ १६ ॥ षड्रस अन्न निपजवून । दिधलें रायासी भोजन । दिव्य मंचकीं आरक्तसुमन । करी नरेंद्रा ॥ १७ ॥ वेळा कर्पूर सुगंधयुक्ता । तांबूल अर्पी धारिलोनाथा । मग संतोषोनि अवलोकिता । राजा वदन तियेचें ॥१८॥ जैसी सुवर्णचंपक-कळी । कीं ओतली मन्मथपुतळी । अती तारुण्यभरें लवली । परी विनत सुकुमार ॥१९॥ विराजे राजवदन चंद्रिका । भाळीं रेखिला कस्तुरी टिका । आकर्णपर्यंत कज्जलरेखा । नयन तेणें शोभती ॥ २० ॥ दृढ बिल्व पीनस्तन । वरी मुक्ताजाळीं विराजमान । हृदयीं पदक देदीप्यमान । तेज फांके हृदयातळीं ॥२१॥ करि शावक शुंडादंड । तैसे सरळ भुजदंड । कंकणें रुणझुणती प्रचंड । मदनातें चेतवावया ॥२२॥ हरिणकटीवरी शोभे कसी । उभी राहे सन्मुख गोरटी । नृपातें व्यंकट दृष्टीं । लक्षीतसे वेल्हाळी ॥२३॥ ऐसी देखितां मृगशावकनयना । मनोभवें नहुषनंदना । भुलविलें मग बोले वचना । शर्मिष्ठेसी आदरें ॥ २४ ॥ म्हणे परिसे नृपनंदिनी । तूं

ळावण्यचिंतामणीची खाणी । तुझा अंगसंग व्हावा वनीं । हे बहुकाळ वसे माझिया ॥२५॥ परी संधी मातें नच पावें । ते आज साधिली निजदैवें । देवोनि अंगसंग विझवावें । कामानळा माझिया ॥२६॥ येरी म्हणे जी प्रजापाळा । जै शुक्रकन्या वरिली वेल्हाळा । तै म्यां मनपंकजाची माळा । तुझिया गळां घातली ॥२७॥ ऐसें ऐकतांचि वचन । नृपति व्यापला मदनें करून उठोनि दिधलें आलिंगन । सुरतसुखें रमला पै ॥२९॥ ( आदिपर्व अ. १९). आदिपर्वाच्या बावीसाव्या अध्यायांत शांतनु व गंगा यांच्या प्रणयाचें उत्कट वर्णन केलें आहे. पंचविसाव्या अध्यायांत कुंती व सूर्य यांच्या विलासाचें वर्णन केलें आहे. मूळ कथानकांत यथोचित फरक करून शृंगाररसाची खुलावट किती मनोहर रीतीनें होऊं शकतें हें मुक्तेश्वरी भारतावरून प्रत्ययाला येते.

मुक्तेश्वरांनीं शृंगारकरुण व शृंगारवीर या रसाचा संकर करण्याचेंहि प्रशंसनीय चातुर्य प्रगट केलें आहे. आदिपर्वाच्या २८ व्या अध्यायांत शृंगार व करुण या दोन रसांचा संकर झाला आहे. पंडुराजानें वनांत एकदां एक मृगमृगी मैथुन करण्यांत रममाण झालें असतां त्यांना ठार केलें. त्यावेळीं तो कुरंगरूप तपस्वी राजा जवळ आला व म्हणाला कीं 'भोजनपानीं व स्त्रीमैथुनीं' कुणाचाहि वध करूं नये. असें असतांना माझा वध करून तूं क्षत्रिय धर्म बुडविला आहेस. म्हणून तूंहि माझ्या-प्रमाणेंच मरण पावशील असा त्या कुरंगानें पंडुराजाला शाप दिला. तें शापवचन ऐकून पंडुराजा अत्यंत उद्विग्न झाला व उभय पत्नीसह तो वनांत राहण्याला गेला. एकदां वनांत ऋतुराज वसंत आला व त्यानें पंडुंचा कंदर्प-सर्प जागृत केला; कारणः- 'बहुकाळ भोगाची अप्राप्ती । सुंदर वनिता एकांती । कामानळ प्रज्वळे पुरुषचित्तीं । मग विचार कायता ॥१५॥ निकट मद्र-राजकुमारी । सुवर्णलतिका अति साजरी । कोमळ कर्दळीचिये परी । पयोधर वाढले ॥१६॥ गौर ते कर्दळीस्तंभ जानू । नितंब-

मध्य नाभिस्थानु। त्रिवली रेखा नव्हे ते भानू। काळ ज्यानें विंधिला॥१७ पुरुष देखोनि कामविकारी। अंगना सरके माघारीं। सवे धांवोनी कर-पंजरी। आकर्षिली लगबगा॥१८॥ पतंग कवळी दीपकळिका। भ्रमर झेपावे चंपका। विवर भावुनी सर्पमुखा। मूषक जैसा प्रवेशी॥ १९॥ वामहस्तकीं कवळूनि वधू। सव्य आसंडू निरीबंधू। विवस्त्रा करूनी कामांधु। बळें मैथुना संघटे॥२०॥ हा हा नाना विचार युक्ती। वारिता मातला भद्रजाती। माद्रीरका पर्णहस्ती। सहसा न वचें लोटिता॥२१॥ नाभीशी नाभी उदरसी उदर। हृदयाशीं हृदय कामातुर। मेळवूनि अधरा अधर। चुंबनपाना भूलला॥२२॥ खेळ खेळतां मैथुन खेळां। प्राण हृदयी झाले गोळा। गात्रीं विकळता नेत्रयुगुळा। पांडुरता पातली॥ २३॥ सहचरीच्या हृदयशयनीं। वीर्यस्खलन होता क्षणीं। देह त्यागुनी पंच-प्राणी। गमन केलें तात्काळीं॥२४॥ मुखे मुख पाहे युवती। कुंठित श्वोसोच्छ्वास गती। दीर्घ स्वरें रोदन करिती। "हा! हा! काय म्हणोनी ॥२५॥ (आदिपर्व अ. २८) आदिपर्वाच्या ४४ व्या अध्यायांत वीर व शृंगार यांचा संकर झाला आहे. कौरव व पांडव यांचें युद्ध चाललें असतां—"मरणभय घेऊनि पोटीं। कौरव पळाले दावूनि पाठी। भीमें कोपे धरूनि मुष्टि। स्वस्थानांतें थोकला॥१११॥ पांडव-प्रताप पुरुष तरणा। नव वधू कौरव सेना। शृंगारिली परिसंघट्टना। युद्धसुरता न थारवे॥११३॥ गळालें अभिमानाचे वास। अधैर्याचे मोकळे केस। रणशय्यासनीं त्रास। पावोनिया पळाली॥११४॥ कर्ण सैंधव पयोधर पीन। मर्दिता झाले आरक्त वर्ण। शकुनी कंचुकी आवर्ण। पडिलें कोठें नेणवे॥११६॥ शस्त्रधारा तीक्ष्ण दांती। चुंबिता मुख आंतले क्षिती। झाली रूपाची उपहती। कौरव-सेना-वधूची॥११७॥ [आदिपर्व अ. ४४].
सारांश, मुक्तेश्वर हे रसाविष्करणाप्रमाणेंच रससंकर करण्यांतहि सारखेच कुशल आहेत.

याच ठिकाणीं मुक्तेश्वरांनीं प्रणयी-युगुलांच्या क्रीडा करण्याच्या रमणीय स्थळांचें ठिकठिकाणीं वर्णन केले आहे त्याचाहि उल्लेख करावयाला हरकत नाहीं. आदिपर्वाच्या ३७ व्या अध्यायांत भीमसेन व हिडिबा हे कुंतीच्या आज्ञेवरून क्रीडा करण्यासाठीं कोठें गेले आहेत पहाः– ' गुहा गव्हरीं पर्वतमौळीं । नाना रमणीक वनस्थळीं । नदी पुलिनी गंगाजळीं । क्रीडा करी मनेच्छा ॥७१॥ द्रोणाचळी चंद्राचळीं । मंदिराचळीं विंध्याचळीं । मलयाचळीं हिमाचळीं । सुखसंमेळीं क्रीडती ॥७२॥ कनक मेरूचे रत्न-शिखरीं । शीतल हिमालय परिसरीं । रजतचळाचे पाठारीं । सुरतोपचारीं क्रीडती ॥७३॥ सोमकांत शीतळतळीं । सूर्यकांत काश्मीराचळीं हेमभूमिकें रत्नस्थळीं । सुखसंमेळीं क्रीडती ॥७४॥ कर्पूर कर्दळीचें वनीं । कुंकुम-केशर उद्भवस्थांनीं । सुरतानंदें क्रीडती दोन्ही । मद्यपानीं मनइच्छा ॥७५॥ मानससरोवरहंसतडागीं । सुवर्णपंकजवनपरागीं । प्रवालवल्लीच्या सुरंगीं । सुख संभोगीं क्रीडती ॥७६॥ भक्ष्य भोज्य पिशितासनें । नाना रसांचीं रसपानें । फळें तांबूल सुगध सुमनें । भोगोपचारें ओळगे ॥७७॥ "— नवपरिणित वधूवरांनीं मधुचद्रिकेसाठीं (Honey-moon) सुंदर स्थळी जाण्याची कल्पना मुक्तेश्वरांच्या आदिपर्वांत पुष्कळ ठिकाणीं आढळते.

वामनपंडितांनीं भागवती प्रकरणांत–विशेषतः रासक्रीडा इत्यादि काव्यांत शृंगाररसाचें आविष्करण केलें आहे व आनंदतनय प्रभृति कवींनीं देखील भागवती प्रकरणांत व पदांत राधाकृष्णाच्या प्रणयविलासाचीं वर्णनें केलीं आहेत. पण तीं पुष्कळ ठिकाणीं अश्लीलतेनें दूषित झालीं आहेत. श्रीधरांच्या पांडवप्रतापांतील शृंगाररसावर मुक्तेश्वरांची छाप पडली आहे. तथापि मुक्तेश्वरानंतर मोरोपंतांनींच शृंगाररसाचें मनोज्ञ आविष्करण केलें आहे, असें म्हणतां येईल. हरिवंशांतील प्रद्युम्न-प्रभावती विवाह (अ. २५-३६), उषा-अनिरुद्ध विवाह (अ. ४), कृष्णविजयांतील रासक्रीडा (अ. २९-३३), मंत्रभागवतांतील कृष्णाची रासक्रीडा

(१०-३७६-४०७), ऊर्वशीकृत अर्जुनविलोभन (वनपर्व अ. ३, ४७-७२). शर्मिष्ठा–ययाति कथा ( आदिपर्व अ. ११), दुष्यंतशकुंतला आख्यान ( अ. १२ ) इत्यादि प्रकरणांत शृंगाररसाचा विलास प्रत्ययाला येतो. प्रद्युम्न व प्रभावती यांच्या प्रणयमीलनाचें वर्णन मोरोपंतांनीं किती बहारदार केलें आहे पहा–" सखि नारीचा धीर प्रद्युम्नातें विलोकितां गळतो। स्त्रीजन मीनचि वाटे, त्याचा रूपादि सुगुण जो गळतो ॥६४॥ हें कार्य कराया त्या प्रभुसूनुकडे तुवांचि सखि जावें । राशीनेंहि देवा जीवन गणानुगेसि न खिजावें ॥७६॥ " प्रद्युम्न आज प्रदोषकाळीं तुला भेटेल अशी तिची सखी जी हंसी तिने सांगितल्यावर प्रभावती म्हणते–" ती त्या हंसीस म्हणे मज मत्सदनांत धीर दे वस ये । प्रथम समागम भीते मन कीं तो वीर धीर देव सये ॥ हंसी म्हणे सये मी सोडिन तुज पळहि न सदना चाल । भय काय तुम्हां दोघे पाठवि नवसंग रसद नाचाल । मग प्रद्युम्नाची एकांतांत गांठ पडल्यावर," प्रद्युम्नातें पाहुनि वाढे सहसा प्रभावतीकाम । विधुतें विलोकुनि जसा सागर अद्भुत तसेंचि तें धाम ॥७०॥ राजात्मजा सलज्जा होऊनि उभी अधोमुखी राहे । साहे तेज न बाळा मदनोंत तीर्यगीक्षणें पाहे ॥७१॥ स्पर्शे स्मर देखाया मुख बदवाया प्रभावती हनुतें । रोमांचरूप कंचुक तो त्याचा स्पर्श लेववी तनुतें ॥७२॥ करुनि अधोमुख मुखसखि मजसी कांहींच तूं न कां बदसी । या दासाची उक्ति स्वीकारी काय चंद्र घे न दशी ॥७३॥ न करी उपमर्द वदन शशिशोभेचा स्वयेंचि दाटून । कष्टोत न ओष्ठांच्या प्रांता लोचनचकोर चाटून ॥७४॥ पुढें प्रद्युम्न–प्रभावतीचा विवाह झाल्यानंतर त्यांचें मनोरथ पूर्ण झाले व " दक्षिण कर धरूनि स्मरशयनीतें बैसवी तिला अंकीं । चुंबी मुख आलिंगीं मदनीं सुख बहु धनें जसें रंकी ॥ ८२ ॥ रमवी प्रद्युम्न बहु प्रेमें पाहोनि तदधिकार तितें । करि सुरत नवोढेसी जे हे तत्कालिन तदाधिका रातितें ॥८३॥ प्रातःकाळीं कष्टें प्रद्युम्नातें प्रभावती

सोडी । गोडी लावुनि जाय; क्षणदा घटिका तशी गमे थोडी ॥८४॥ प्रेमें वेडचि लावी प्रद्युम्नास प्रभावती राया । त्या रसतरंगिणीचा लागो दे न प्रभाव तीरा या ॥८५॥ मार्कंडेय पुराणांतील मदालसेच्या अख्यानांतहि शृंगाररसाचा परिपोष झाला आहे. ऋतुध्वज व मदालसा यांच्या प्रथम भेटीच्या प्रसंगीं ऋतुध्वजानें आपली हकीगत सांगितली त्यावेळीं "श्रवण असें होतां ती हर्षे लाजे मदालसा कन्या । वदनीं सस्मित राहे पाहे स्वसखी मुखाकडे धन्या ॥४२॥" मग त्यांचा विवाह झाल्यावर, "क्षितिपर्यटन करुनि तो स्वजनीं कारि अमृतवर्ष वीरमणी । क्रीडुनि रम्योपवनीं मणि-भवनीं बहुत हर्षवी रमणी ॥६५॥"

मोरोपंतांनीं संभोगशृंगाराप्रमाणें विप्रलंभ शृंगारचेंहि आविष्करण केलें आहे. गोपींना झालेल्या विरहावस्थेतील वर्णनांत व रामास सीतेविषयीं झालेल्या वर्णनांत विप्रलंभ आहे. शृंगाररसांतर्गत ईर्ष्यामानाचें वर्णन हरिवंश अध्याय ३६ यांत सत्यभामेचा रुसवा व कृष्णानें तिचें केलेलें सांत्वन या प्रसंगीं चांगलें आहे. नारदानें कृष्णास दिलेलें पारिजातकुसुम त्यानें आपणांस न देतां रुक्मिणीस दिलें. त्याबद्दल सत्यभामा क्रुद्ध झाली व 'ऐकुनि अपमान, करी जाणों परिहारयत्न हा रमणी । फाडी वस्त्र क्रोधें, विखरी तोडुनि रत्नहारमणी ॥२१॥ बांधुनि शिर, शून्य गृहीं निजली नेसूनि शुभ्र पातळ ती । संवाहनकामा परि धाकें दासी पदा न आतळती ॥२४॥ सत्यभामा रुसली हें ऐकून तिचें सांत्वन करण्यासाठीं कृष्ण तिच्या मंदिरांत गेले. 'प्रभु विश्वकर्मनिर्मितसदनद्वारांत दारुका ठेवी । जाय हळूच न कळतां जेथें ती खिन्नमानसा देवी ॥२७॥ दुरुनि भीतभीत श्रीपति कुपिता मनःप्रिया पाहे । मृदुचरणांगुष्ठनखें उकरीत क्षोणितें सखी पाहे ॥२८॥ लीला कमलदलातें सुनखांही लेशलेश तोडून । जोडून स्वमुखीं ते ती हांसे श्वास उष्ण सोडून ॥२९॥ ठेउनि वामकरतळीं मुख धरुनि ध्यान, तें पुन्हां सोडी । शयनीं पळ निजुनि, उठे, लागे कोठेंहि नच जिला गोडी ॥३०॥" अशा

क्रुद्ध स्थितींत सत्यभामा असतांना श्रीकृष्ण तेथें आले व त्यांनीं तिच्यावर चामर ढाळण्याला सुरवात केली. त्यावेळीं अधिकच रागानें सत्यभामा म्हणते:– " प्रभुतें पाहुनि भाषा देवी भगवत्प्रिया म्हणे 'युक्त' । पाहे अन्यत्र निघे एक मुहूर्त न तिच्या मुखें उक्त ॥३७॥ नेतें भवाब्धिच्या जे ध्यातयासि पलिकडील कांठीं तें । श्रीमुख रागें पाहे; ती घालुनि भोंवयांत गाठीतें ॥३८॥ मग 'बहु शोभसि' ऐसें म्हणुनि वदन वामकरतळीं ठेवी। होऊनि अधोमुखी स्फुरदधरा, लागे रडावया देवी ॥३९॥ अंभोजदळापासुनि शुद्ध हिमसलिल नृपा! जसें गळतें । स्रवलें त्या भामेच्या नेत्रापासूनि जें तसें जळ तें ॥४०॥ वरच्येवरि हस्ताही धरुनी प्रभुवर उर:स्थळीं जिरवी। मिरवी स्नेहातिशय प्रीति श्रीजानिची नव्हे हिरवी ॥४१॥ यापुढें श्रीकृष्णानें सांत्वन करून तिचें हृदय समुल्लासित केलें. मुक्तेश्वरांच्या रसाविष्कृतींत उत्कटता तर मोरोपंताच्या रसाविष्कृतींत संयम हा गुण दिसून येतो. मुक्तेश्वर क्वचित्प्रसंगीं मर्यादेचें उल्लंघन करतील पण मोरोपंतांचा संयम केव्हांहि सुटावयाचा नाहीं. शाहिरांचें लावणी वाङ्मय हें जणूं कांहीं शृंगाररसाची तरंगिणी आहे असें म्हणावयाला हरकत नाहीं. रामजोशी, प्रभाकर व होनाजीबाळ यांच्या लावण्यांत क्वचित् अश्लीलता असली तरी त्यांत शृंगाररसाचें विविध विलास प्रगट झाले आहेत.

येथपर्यंत प्राचीन काव्यांतील शृंगाररसाचें अवलोकन केलें. आतां अर्वाचीन काव्यांतील शृंगाररसाचें समालोचन करूं. अर्वाचीन काव्याचें स्वरूप वैणिक असल्यानें प्रेमगीतांतूनच शृंगाररसाचा परिपोष झाला आहे. केशवसुतांच्या प्रेमगीतांत मुग्धशृंगाराचें मनोज्ञ आविष्करण झालें आहे. त्यांच्या प्रणयकथन, स्मरण आणि उत्कंठा, रुष्ट सुंदरीस या कविता प्रणयात्मक आहेत. गोविंदाग्रजांच्या प्रेमगीतांतहि शृंगाररस आढळतो. त्यांच्या 'मुरली' या कवनांत शृंगार व शांत या रसांचा संकर झाला आहे. त्यांतील 'श्वासें मज हृदयीं भरवी । नादें कीं ओढुनि नेई ।

चुंबनेंच कीं मज बनवी । तव ओठावरली लाली ( वाग्वैजयंती पृ. १०३) या ओळी हृद्य वाटतात. 'स्वानंद । कमल-मकरंद । सुधानिस्यंद ' अशा पहिल्या चुंबनाचेंहि त्यांनीं बहारदार वर्णन केलें आहे. तांबे यांच्या प्रेम गीतांतहि शृंगाररसाची उत्कटता प्रत्ययाला येते. उदाहरणार्थ पुढील ओळी पहा. " अलसाकुंचित ते मधुरेक्षण लज्जास्मित तें मधुवदनीं । मृदुमधु बोलुनि नेलि यामिनी जागत कामिनी ये स्मरणीं । करिं कर घालुनि अधिकच अवलुनी तृप्त न झालों जे स्वमनीं । कोमल अधरीं दाबुनि अधरा जेव्हां रमलों सुखसदनीं । लीलावति ती सुदतीं युवती स्मृति ती करिते स्थिर नयनीं (पृ. ७३). यशवंत व माधवज्यूलियन यांच्या प्रेमगीतांतूनहि शृंगाराचा परिपोष झाला आहे. सारांश, प्राचीन काव्यांतील शृंगाररस पौराणिक कथांच्या द्वारें आविष्कृत झाला आहे व आधुनिक काव्यांतील शृंगार प्रणयगीतांच्या द्वारें प्रगट झाला आहे. आधुनिक काव्यांतील शृंगारांत शाहिरी काव्यांतील उत्कटता आहे पण उत्तानता नाहीं; व एकदरींत, कांहीं अपवाद वगळले असतां अर्वाचीन काव्यांतील शृंगाररसाच्या आविष्काराचें स्वरूप मुग्ध व मर्यादित आहे असें म्हणावयाला हरकत नाहीं.

शृंगाररसानंतर वीररसाचा विचार करणें हें ओघानेंच येतें. शृंगार व वीर हे परस्परपोषक रस आहेत. उत्साह हा वीररसाचा स्थायीभाव असल्यामुळें रणांगणावर मानवी पौरुषाचें व पराक्रमाचें प्रदर्शन प्रत्ययाला येतें. प्राचीन मराठी काव्यांत वीररसाचेंहि प्राचुर्यानें आविष्करण झालें आहे. श्रीज्ञानेश्वरींत योगमार्गाशीं युद्ध परिभाषेच्या उपमानांचें अभेदत्व दर्शवून योग्यास योद्धा कल्पून त्यांनीं जीं रूपकें केलीं आहेत त्यांत वीररस आढळतो. उदाहरणार्थः- ' मग आणिक ते अर्जुना । साविया बहुवा जन्ना । पंचप्राण मना । पाढाऊ घेउनी ॥२१२॥ बाहेरी यमानियमांची काढी लाविली । आंत वज्रासनाची पौळी पन्नासिली । वरी प्राणायामाची मांडिलीं । वाहाती यंत्रें ॥२१३॥ तेथ उल्हाटशक्तीचेनि उजिवडे । मन पवनाचेनि

सुरवाडे । सतरावियेचे पाणियाडे । बळाविलें ॥२१४॥ तेंव्हां प्रत्याहारें ख्याती केली । विकारांची संपली बोहली । इंद्रियें बांधोनि आणलीं । हृदयांआंत ॥२१५॥ तंव धारणावारु दाटिले । महाभूतातें एकवाटिलें । मग चतुरंगसैन्य-निवटिलें । संकल्पांचें ॥२१६॥ तयावरी जैत रे जैत । म्हणोनि ध्यानाचें निशाण वाजत । दिसे तन्मयतेचें झळकत । एक छत्र ॥२१७॥ पाटीं समाधिश्रियेच्या अशेखा । आत्मानुभव राज्यसुखा । पट्टाभिषेक देखा । समरसें जाहला ॥२१८॥ (ज्ञानेश्वरी अ. ९). त्याचप्रमाणें श्रीज्ञानेश्वरींत अध्याय १२, ओव्या ४५ ते ४७, अध्याय, १५, २५८–२६२, अध्याय १८, १०४७ ते १०९० या ठिकाणींहि वीररस आविष्कृत झाला आहे. श्रीज्ञानेश्वरांची वागीश्वरी रसनिर्भर असल्यामुळें त्यांनीं ज्ञानेश्वरीसारख्या तत्त्वज्ञानात्मक ग्रंथांतहि नवरसांचे निर्मल निर्झरौघ खेळविले आहेत.

ज्ञानेश्वरांच्यानंतर नवरसावर प्रभुत्व गाजाविणाऱ्या कवींत मुक्तेश्वरांचा उल्लेख केला पाहिजे. मुक्तेश्वराच्या आदिपर्वांत शृंगाराप्रमाणेंच वीररसाचाहि उत्कटतेनें परिपोष झाला आहे. एकदां कौरवपांडवांची सेना पांचाळपति जो द्रुपद त्याच्या नगरावर चालून गेली; त्यावेळीं:—
"वाद्यें वाजूं लागलीं अपार । बळें चालिलें कौरवभार । हडबडलें पांचाळ-पुर । वार्ता पुढें परिसोनि ॥५॥ कडकडाटे वीरभारीं । पांचाळ पातला बाहेरी । उभयतांचें झुंजारीं । रणकल्लोळ माजला ॥८॥ बळें दुर्धर पांचाळ-दळ । लोटलें जैसें समुद्रजळ । कौरवसेना वडवानळ । धडधडीत प्रतापें ॥१५॥ कुंजरावरी कुंजरभार । राउतावरी अश्वस्वार । नानाशस्त्रीं पायीच वीर। घोर कंदना मिसळले ॥१७॥ शंख, भेरी, मृदंग काहाळीं । गोंधळ माजे पांचाळदळीं । महावीरांची आरोळीं । जयजयकार प्रवर्तला ॥२१॥ गदा घेवोनि उतावीळ । पुढें धाविन्नला भीम सबळ । जेंवि मांडिला प्रळयकाळ दंडपाणी भूतांतें ॥४०॥ तिमिंगल जैसे समुद्रजळीं । तैसा भीम पांचाळ-दळीं । बळें मिसळता खळबळीं । सेना यज्ञसेनाची ॥४२॥ असंख्यात

कुंजरथाट। स्रवती मदोदकांचे थाट। त्यावरी उठावला बलिष्ट। गदाघायीं ताडित ॥४३॥ येरीकडे विजयी पार्थ। पुरवावया गुरूची आर्त। द्रुपद लक्षुनिया रथ। वातवेगें प्रेरिला ॥ ५० ॥ अश्वरथकुंजरभार। विभांडित रणझुंझार। रथयोद्धे शतसहस्र। बाणधारा खंडिले ॥५१॥ बाणधारा अकस्मात। शिरे उडती मुकुटासहित। शस्त्री उभारिले हात। ते नभांत उसळती ॥ ५३ ॥ अशुद्धनदीचे खळखळाट। पुसती सागराची वाट। मार्ग दावावया नीट। आपार वेगें चालती ॥५५॥ हाहाकार माजला प्रबळ। फुटले पांचाळाचें दळ। एक म्हणती प्रळयकाळ। अत्यद्भुत मांडिला (आदिपर्व अ. ३२). मुक्तेश्वरी आदिपर्वाच्या अ. ३०-३१ यांत कर्णार्जुन व दुर्योधन भीम यांच्या मल्लयुद्ध वर्णनांत आणि सभापर्वाच्या अ. ७ यांत भीम व जरासंध यांच्या मल्लयुद्धवर्णनांत वीररस आढळतो. त्याचप्रमाणें किर्मीर व भीम यांचें युद्ध व विराटपर्व अध्याय हें यांत भीम व कीचक यांचें युद्धवर्णन वीररसाच्या दृष्टीनें उल्लेखनीय आहे. श्रीधरांच्या ‘ पांडवप्रताप ’ या ग्रंथांत वीररसाचा परिपोष झाला आहे. नरहरी मोरेश्वरानें उद्योग, भीष्म, द्रोण व कर्ण हीं चार पर्वे लिहिलीं असून त्यांत वीररसाचा आविष्कार झाली आहे. समर्थांच्या रामायणावरील ‘ युद्ध–कांडांत ’ वीररसदर्शक वर्णनें आढळतात.

मोरोपंतांच्या आर्याभारतांत वीररसाची पुष्कळ उदाहरणें दृष्टोत्पत्तीला येतात. किरातार्जुन युद्धप्रसंग ( वनपर्व ), भीष्मभार्गवयुद्ध ( विराट पर्व ), भीष्मपर्वांतील अर्जुनाचें युद्धचातुर्य व द्रोण पर्वांतील द्रोण, कर्ण, भीम, अर्जुन, अभिमान्यु व घटोत्कच यांचें युद्धप्रसंग हे भाग वीररसात्मक आहेत. कर्णार्जुनाचें भीषण युद्ध कसें चाललें तें पहा:–“ वर्षति अन्योन्यांवरि कर्णार्जुन ते घनावरी घनसे। पुरुहूतदूतवातद्युमणिकरां शरगृहांत रीघ नसे ॥३॥ जेवी दिनांतीं पक्षी व्यापिति वृक्षास रचितनीडास। तेवि तयांचे तें शर भासति अहि घेति धांवुनी डास ॥४॥ अर्जुन तव्हां

कोपें क्षालाया शत्रुदारासिंदूर । न्हाणाया निजविजयप्रभावाश्रुकरूनि कुलपतींदूर ॥ वातें जेंवि कसपटें कुरुकटकें दूर उडविलीं पार्थें । भुजलीलासंपादितदुर्घटजंभारिमुखनिर्लिपार्थें ॥ कर्णवधार्थें पार्थें तेव्हां अत्युग्र योजिलें अस्त्र । रवि झांकला शरांनीं भीतावरि काय घातलें वस्त्र ॥ शिक्षोत्साहबळांनें कोणी कोणासि त्यांत आटेना । देवां विचक्षणासहि एक उणा एक अधिक वाटेना ॥ योजिति अस्त्रें शस्त्रें एकाहुनि एक अधिक बळ होतीं । उभयरता विजयश्री न टिके एकत्र एक पळ हो ती ॥ तेव्हां शरजाळांनीं पाडिति दोघेहि अंधकारातें । भूतें म्हणति ' अकाळीं प्रळय नसो पाव अंधकारातें ॥ साधु म्हणति त्या दोघा युद्धचमत्कार पाहतां अमर । कीं नाहींच कधीहीं त्यांहीं तै.ा विलोकिला समर ॥ कर्णार्जुन युद्धाप्रमाणेंच शल्य पर्वांतील शल्ययुद्धवर्णनहि वीररसपरिप्लुत आहे. कृष्णाच्या युद्धपाटवाचें वर्णन करितांना, योजिलेली ' भट-मुकुट-रत्न-कैट-भरिपु-पटुशर-पटलपट रणीं फांके । कां केवळ कटकाचि ? सखि घटजठरीं दीपसम रवी फांकें ( कृ. वि. अ. ८३-१४४ ) ही आर्या ओजस्वी वाटते. मोरोपंतांच्या आर्याभारताप्रमाणेंच त्यांच्या रामायणांतहि वीररसाचीं स्थळें आहेत. सारांश, प्राचीन कवींत मुक्तेश्वर, श्रीधर व मोरोपंत यांनीं वीररसाचें आविष्करण करण्याचें कौशल्य व्यक्त केलें आहे.

शाहिरांनीं लिहिलेल्या लावण्यांत जसा शृंगार तसा पोवाड्यांत वीर रस दृष्टोत्पत्तीला येतो. पोवाड्यांतील वीररस हा पौराणिक कथानकांच्या आधारें उत्पन्न झाला नसून ऐतिहासिक प्रसंगाच्या आधारें निर्माण झाला आहे. लावण्यांत महाराष्ट्राच्या विलासी वृत्तीचें प्रदर्शन झालें असून पोवाड्यांत त्याच्या वीरवृत्तीचें प्रगटीकरण झालें आहे. शाहिरांनीं पोवाड्यांतून प्रतापशाली वीरांच्या पराक्रमांचीं वर्णनें केलीं आहेत व त्यांत वीररसाचें प्रलोभनीय आविष्करण झालें आहे. खर्ड्याच्या लढाईवर दहा पोवाडे उपलब्ध आहेत. त्यांत प्रभाकराच्या पोवाड्यांतील पुढील ओळी पहा:—

" काय फलटणच्या फैरा झडती । पर्ज्यन्यापरि गोळया पडती । शिरकमळें कंदुकवत् उडतीं । छिन्नभिन्न किती होउनि रडती । कितीक पाण्याविण तडफडती । कितीक प्रेतांमधींच दडती । वीर विराशी निसंग भिडती । सती सारखे विडे उचलती । [ चाल ] पाउल पाउल पुढें सरकती । घाव चुकावून शूर धडकती । सपुत वाघापरी गुरकती । हत्यार लाउन मागें मुरकती । खुणेनें शत्रुवर तरकती । जिवबादादा मनीं चरकती । अरर शाबास बापानो ॥ ( चाल ) सुटती तोफा धुंद दणादण । गुंगत गोळे येती छणाछण । सों सों करिती बाण छणाछण । खालिल घोडे उडति टणाटण । टापा हाणति दुरुनि ठणाठण । नौबती झांझा झणति झणाझण । एकचि गर्दी झालि धुराची । ( चाल ) थोर मांडली रणधुमाळी अगदींच बसली मग कंठाळीं । फौज पसरली रानोमाळीं । लाखोलाख तरवार झळाळी । होळकरांची फिरति पाळी । जीवबांची मर्दुमकी निराळी । मोंगलाची केलि टवाळी । सबळ पुण्य श्रीमंत प्रभूचें ॥ " खर्ड्यांची लढाई मराठ्यांनी अभिमानास्पद वाटते. मी त्या खर्ड्यांच्या लढाईच्या स्वारींत होतों असें छातिला हात लावून अभिमानानें मराठी शिलेदार सांगतो " असें ग्रँट डफनें लिहिलें आहे. म्हणून या लढाईवर इतके पोवाडे उपलब्ध असावेत यांत नवल नाहीं. तुळशीदासाचा 'तानाजीचा' पोवाडाहि वीर-रसप्रचुर आहे. अप्पा यशवंत या शाहिराचा 'खर्ड्यांचा' पोवाडा चांगला आहे. त्यांतील सातवा चौक पहा:—" झाला हुकुम तोफखान्याला किल्लि जिवबादादाचे हातीं । कपुची झडती । लईन गोळे जणु गारा वर्षति । भोंसला शर्थ बाणांची केली । गर्दी लावून बती टाकिली । फौज भाजून मोंगल येतो काकुळती । [ चाल ] नानाचा हुकुम झाला । तोफावर घोडे घाला । चहूकडून उठला हल्ला । एकदांच हरहर केला । गर्दी पाहून घाबरा झाला । मग नवाब मागें सरला । खर्ड्यांचा सुमार धरला । जाउन किल्यांत शिरला ॥ [ चाल ] बेजार मार मारून मोंगल

केले। पेंढार पळा देईना उभे भोंवताले। घेति लुटून मारितीं घणाघण भाले। लागले पाठि रे पाठीं। तोफा भरून तलवार. ( मराठ्यांचे पोवाडे पृ. २३५ ). श्री. य. न. केळकर यांनीं म्हटल्याप्रमाणें हा 'सातवा चौक म्हणजे वीररस फेसाळून टाकीत झपाटून जाणाऱ्या वावधणाचा झोतच आहे कीं काय असा भास होतो. [ मराठ्यांचे पोवाडे पृ. २२८ ] सारांश, शाहीरांच्या पोवाड्यांत वीररसाचा स्फूर्तिदायक आविष्कार झाला आहे, यांत शंका नाहीं.

अर्वाचीन मराठी काव्यांत वीररस फारसा आढळत नाहीं. तथापि साधुदास यांच्या 'रणविहार' या काव्यांत वीररस आहे. लक्ष्मण-मेघनाद यांच्या युद्धांचें वर्णन या दृष्टीनें उल्लेखनीय आहे. उदाहरणार्थः-"कीं परस्पर पराक्रमास ते बाणमान पसरूनि मोजिती। कीं परस्पर शरीरबंधना बाणपाशरचना नियोजिती ॥९४॥ कोपविस्खलित रोम काय ते, मृत्यु-सूचक निरोप काय ते। कीं परस्पर धनुर्घनातले कृष्णवर्ण चपलौघ वाहते ॥९५॥ बाण सूसणण घोर वाजती कमुकें घननिवास गाजती। गाहुनी रणमदांत माजती वीर ते तरि समान साजती ॥९६॥ व्यापिली प्रथम सायकीं मही मागुती गगन सर्व रोधिलें। जाहले मग समस्त मिश्र ते बाण सर्व विपिनांत कोंदलें. ( सर्ग १२ पृ. ८ ). कृष्णाजी नारायण अठल्ये यांचें 'भीमकर्मा राघोबा' हें काव्य वीररसात्मक आहे. पानपत-युद्धाच्या पराजयामुळें राघोबाला अत्यंत त्वेष आला व दुराणींचा सूड उगवण्याचा त्यानें निश्चय केला. त्यावेळीं मराठे व दुराणी यांचें भीषण युद्ध झालें; त्यावेळीं, "तोफेचा लाल गोळा वरिवरि निघतां झांपडी येत डोळा। खंडें होउनि सोळा गगनिं उसळती कैक जैसा धुरोळा। कोणाचे हात बोटें तुटुनि भळभळा थोर वाहे अशुद्ध। गेली अंगांत गोळी जरि तरि न कळे सांडलीं शुद्धबुद्ध ( अर्वाचीन कविता पृ. ३९७ ). राधारमण यांच्या 'पानपतचें युद्ध' या काव्यांत पानपतच्या रणांगणावर, "सणाणती

बाण रणीं अपार। खणाणती खड्ग सुतीक्ष्ण धार। चकाकती भट्टिश भोंवताले। भरारती भासुर तेंवि भाले॥ जशी झरारा झड पावसाची। तशीच शस्त्रास्त्रसमुच्चयाची। रणांगणा वृष्टि अखंड हाणी। सुटे परी मृत्युमुखासि पाणी'॥ (काव्यदोहन पृ. १२५-१२६). असें घनघोर युद्ध झालें असें वर्णन केलें आहे. वा. अ. भिडे यांच्या विद्युलानुशासन व खरेशास्त्री यांच्या 'यशवंतराय' या महाकाव्यांत वीररसदर्शक स्थळें आढळतात. तथापि एकंदरीनें, अर्वाचीन मराठी काव्यांत वीररसाचा आविष्कार विरलतेनें झाला आहे असें म्हटल्यास तें चुकीचें ठरणार नाहीं.

रसमालिकेंत शृंगाराला जरी अग्रपूजेचा मान असला तरी पुष्कळ प्रकृतिकोमल रसज्ञांना करुणरसच अधिक श्रेष्ठ वाटतो. भवभूतीनें 'एको रस: करुणमेव' असें म्हटलें असून शेलेच्या "Our sweetest songs are those that tell of saddest thought' या वचनांतहि हीच कल्पना ग्रथित झाली नाहीं काय? संस्कृत साहित्यशास्त्रज्ञांनीं मृत्यु हें करुणरसाचें आधिदैवत मानलें आहे व प्रिय जनाच्या मृत्यूमुळें होणाऱ्या विरहानें आपलें मन जितकें दु:खाकुल होतें तितकें दुसऱ्या कोणत्याहि प्रकारच्या विरहानें होत नाहीं, करुणरसाचा आविष्कार प्रामुख्यानें मृत्युमूलक दु:खांतच होत असतो. प्राचीन मराठी काव्यांत स्वतंत्र अशी करुणरसात्मक रचना फारसी आढळत नाहीं. परंतु ज्ञानेश्वरांच्या मृत्यूनंतर त्यांच्या भेटीसाठीं नामदेवांनीं जो शोक केला तो करुणरसात्मक आहे. ज्ञानेश्वरांचे वडील बंधू निवृत्तिनाथ यांचें हृदय ज्ञानेश्वरांच्या समाधीमुळें विव्हल झालें व ते म्हणतात:—" निवृत्तिदेव म्हणे करितां समाधान। कांहीं केल्या मन रहात नाहीं। बांधिल्या तळ्याचा फुटलासे पाट। ओघ बारा वाट मुरताती। बांधिल्या पेंडीचा सुटलासे आळा। तृण रानामोळा पांगलासे॥, मोरोपंतांच्या काव्यांत करुणरसाची अनेक स्थळें आहेत. मंत्ररामायणांतील सीताशोक, (युद्ध. २२२, २२३, ३५०, ३५१) हरिश्चंद्राख्यानांतील

शोक, वनपर्वातील नलदमयंती कथा, द्रोणपर्वातील अभिमन्यू वधानंतर पांडवांनीं केलेला शोक व स्त्रीपर्व हीं प्रकरणें करुणरसाचीं उदाहरणें आहेत. अभिमन्यूच्या मृत्यूमुळें सुभद्रेची कशी स्थिति झाली पहा:— " ऐकुनि म्हणे सुभद्रा, 'हा वत्सा! काळ काय हा निधना' । जाली कशी अकस्मात् धनलुब्धाच्या समूळ हानि धना ॥ शोकीं कसें बुडविलें माजे असु, उत्तरासुसह सारे । जालासि स्वप्नीचा निधिसा तूं दृष्टनष्ट सहसा रे ॥ हा वत्सा! धैर्यनिधे! हा वत्सा! जनमनोहराकारा! । हा वत्सा! कुलतिलका! हा वत्सा! सर्वसद्गुणाधारा!" ॥ विशेषतः स्त्रीपर्व हें करुणरसाचें आगरच आहे. श्रीधरांच्या पांडवप्रतापांतील ५५ अध्याय कौरवस्त्रियांच्या विलापपर असल्यानें कारुणपूर्ण आहे. शाहिरांनीं लिहिलेल्या 'भाऊसारखा पंचीप्यारा । आम्हावरि कां रुसला न्यारा; दख्खनचा दिवा मालवला हिरा हारपला काय गुपित घाला केला नारायणाला', आणि 'कमि नव्हतें पृथ्वींत अवांतर प्राणी न्यायाला । आयुष्य कमी कसें वाटलें सवाइमाधवरायाला' हे पोवाडे करुणरसात्मक आहेत. सारांश, प्राचीन कवींत मोरोपंत, श्रीधर, प्रभाकर यांनीं करुणरसाचें आविष्करण करण्याचें चातुर्य व्यक्त केलें आहे.

आधुनिक कवींत मोगरे यांनीं करुणरसात्मक पुष्कळ काव्यें लिहिलीं आहेत. महाराष्ट्रांत त्यांच्यावेळीं होऊन गेलेल्या प्रमुख व प्रख्यात व्यक्तींवर त्यांनीं शोकगीतें लिहिलीं आहेत. मोगरे यांच्या शोककाव्यांत रसोत्कटतेपेक्षां भाषासौष्ठवच अधिक प्रत्ययाला येतें. या दृष्टीनें लेंभे यांचें 'शोकावर्त' हें काव्य हृदयंगम आहे. त्याचप्रमाणें डॉ. कीर्तिकर यांच्या 'विलापलहरींत'-ही करुणरसाचा सहजरम्य परिपोष झाला आहे. रे. टिळक यांच्या 'बापाच्या अश्रूंत' तत्त्वजिज्ञासा असून त्यांत मानवी संसाराचें वर्णन आलें आहे. आगाशे यांचीं काव्येंहि शोकपूर्ण असून गोविंदाग्रजांचें 'राजहंस माझा निजला' हें गीत अनुपमेय आहे. Beeच्या कमला काव्यांतील

पांचव्या चौकांत वर्णिलेली तिच्या हृदयाची तीव्र तळमळ पराकाष्ठेची कारुण्यपूर्ण वाटते. सारांश आधुनिक काव्यांतील करुणरस वैलापिक काव्यांत दृष्टोत्पत्तीला येतो व पुढील एका प्रकरणांत वैलापिक काव्याचें विवेचन करावयाचें असल्यामुळें त्याचा येथें धावता उल्लेख केला आहे.

प्रा. चापेकर यांनीं रौद्र, बीभत्स व भयानक यांचा वीररसांतच अंतर्भाव केला आहे. कारण, "वीररसाची आधाररूप अशी जी वीराच्या ठिकाणीं असणारी वृत्ति ती जेव्हां भीषण धृत्युत्कट व भीषण कार्यप्रवर्ती होते तेव्हां रौद्ररसाचा आविष्कार होतो आणि या एकंदर वीररसात्मक व भीषण दृश्याचा हीनवीर्य किंवा वीरभावशून्य अशा लोकांवर जेव्हां भीतीचा व व्याकुलतेचा परिणाम होतो तेव्हां भयानकरस प्रतीत होतो. तुमुल युद्धाच्या—वीररसाच्या अत्युग्र आविष्काराचे साहजिक परिणामरूप आहेत. ते प्रत्यक्ष पाहणाऱ्याच्या किंवा त्यांचीं वर्णनें ऐकणाऱ्यांच्या मनांत किळस व भीति यांचा व क्वचित्प्रसंगीं करुणरसाचाही प्रादुर्भाव होतो. म्हणजे भयानक रसाप्रमाणेंच बीभत्स हाहि वीररसाचाच परिणामरूप व तत्कार्यनिष्ठ आहे (काव्यचर्चा पृ. १५८). सारांश, रौद्र, बीभत्स व भयानक हे वीररसाचे तीन प्रवाह आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं. भरतानें, 'तेषामुत्पत्तिहेतवश्च चत्वारो रसाः। तद्यथा श्रृंगारो वीरो रौद्रो बीभत्स इति' हें सूत्र सांगून बीभत्स व रौद्र यांना श्रेष्ठ स्थान दिलें आहे. पण कोणत्याहि अभिजात कवीनें आपल्या काव्यांत बीभत्स व रौद्र या रसांना प्रमुख स्थान दिलेलें नाहीं हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. म्हणून रौद्र, भयानक व बीभत्स यांना दुय्यम रस मानणेंच युक्त होय. ज्ञानेश्वरींत आसुरी प्रकृतीवरील रूपकांत, (अ. ९-१७९ ते १८५) रौद्र व बीभत्स यांचें मिश्रण झालें आहे. मुक्तेश्वरांच्या आदिपर्वांत युद्धवर्णनप्रसंगीं रौद्र, बीभत्स व भयानक तीनही रस आढळतात. मोरोपंतांच्या कुशलवोपाख्यान अ. १३, ५, १०, हरिवंश अ. ४८ देवदैत्यांचा भीषण समर, कर्ण

पर्वांतील भीमदुःशासनाचें भयानक युद्ध-या प्रकरणांत रौद्र व भयानक रस आढळतो. विराटपर्वांत उत्तरगोग्रहण युद्धारंभीं शंख वाजविला तेव्हां "ऐसे वदे करीं मृदुपूर्वजलजवादनीं मग जवा जी। तेव्हां त्या कुरुकटकीं हगले मुतले समस्त गज वाजी ॥ केलेलें हें वर्णन बीभत्सरसात्मक आहे. अर्वाचीन कवींपैकीं साधुदासांच्या रणविहारांतील १२ व्या सर्गांतील ५१, ७२, ७३, ७४ या श्लोकांत बीभत्स व भयानक हे रस आढळतात. शेवटीं बीभत्स, भयानक व रौद्र यांच्या त्रिवेणी संगमाचें पुढील उदाहरण देण्याजोगें आहे:— "भीम पुन्हां दुःशासनरक्तें अंजलि भरोनिया डोले। मिटक्या देऊनि, पाहुनि कर्णसुयोधनमुखाकडे बोले ॥२२॥ पीतो हें रक्त तुझें हासत होतास मज जसा भणगा। दुःशासना! तसा तूं पुनरपि गौ गौः स्व आननें म्हण गा ॥२९॥ ऐसें बोलत हासत शत्रुरुधिरदिग्धपाणिमुख विकट। प्रगट महाभैरवसा नाचत गेला जयाच्युतानिकट ॥३०॥

हास्य हा अत्यंत आल्हादजनक रस आहे. हा रस बाल, तरुण, वृद्ध, गरीब व श्रीमंत या सर्वांना सारखाच प्रिय वाटतो. श्री. न चिं. केळकरांनीं हास्याला रसराज मानलें आहे व त्याला त्यांनीं दोन कारणें दिलीं आहेत. तीं अशी [१] मनुष्याच्या आयुष्यांत सर्व काळीं अनुभवक्षम असतो. [२] हास्योत्पत्तीला कारण असें असंबद्धतादि विभाव जगांत पदोपदीं आढळतात. भरतमुनींनें आत्मस्थ व परस्थ असे हास्याचे दोन प्रकार सांगितले आहेत. हास्य हा मनुष्याच्या वाणीला रमणीयता आणणारा रस आहे यांत शंका नाहीं. महानुभवी वाङ्मयांत भास्कर भट्ट बोरकिर याच्या 'शिशुपालवध' या काव्यांत अभिजात विनोद आढळतो. कळलाव्या नारदाचा उद्धवानें केलेला उपदेश, भीतीनें पळणाऱ्या नारदाचें वर्णन, रुक्मिणीची श्रीकृष्णानें केलेली थट्टा—हे भाग हास्यरस दर्शक आहेत. ज्ञानेश्वरींत उपमादृष्टांतांच्या द्वारें हास्यरस आढळतो. (अ. ५ ओवी १७५-७६). एकनाथांच्या वाङमयांत विनोदस्थळें

अधिक आढळतात. रुक्मिणीस्वयंवरांतील १४ व्या प्रसंगांत द्वारकेबाहेर निघालेल्या वऱ्हाडाचें वर्णन विनोदरम्य आहे. यांपेक्षां त्यांच्या भारुडांत विनोदी स्थळें अधिक आढळतात. यांसाठीं, वैद्य, कापडी, डौर, बाळ-संतोष, महाबळ, इत्यादि रूपकें उदाहरणार्थ देतां येतील. मुक्तेश्वरांच्या वनपर्वांत दुर्वासऋषीच्या भोजनाचें वर्णन वांचून हसूं येणार नाहीं असा वाचक विरळा. तुकारामांच्या अभंगांत विनोदस्थळें विपुल आढळतात. व त्यांत त्यांचें लोकव्यवहाराचें सूक्ष्म निरिक्षण दिसून येतें. उदाहरणार्थः– ‘ परिसे गे सूनबाई । नको वेंचूं दूध दहीं ॥ अवा चालली पंढरपुरा । वेशीपासुनी आली घरा ॥ ऐके गोष्टी सादर बाळे करी जतन फुटकें पाळें ॥ माझ्या हातींचा कलवडू । मज वांचोनीं नको सांडू ॥ बळकट क्षीरीचें लिंपण । मज वांचोनी नको फोडूं ॥ उखळ मुसळ जातें । माझें मन गुंतले तेथें ॥ भिक्षुक आल्या घरां । सांग गेली पंढरपुरा ॥ सून म्हणे बहुत निकें । तुम्ही यावें जावें सुखें ॥ सासुबाई स्वहित जोडा । सर्व मागिल आशा सोडा ॥ सून मुखीचें वचन कानीं । ऐकुनि सासू विवंची मनीं ॥ सवतीचे चाळे खोटे । म्यां जावेंसें इला वाटे ॥ आतां कासया यात्रे जाऊं । काय जाउनि तेथें पाहूं ॥ मुले लेंकरें घरदार । माझें येथेंचि पंढरपूर ॥ तुका म्हणे ऐसे जन । गोवियेलें मायें करून ॥ ” मोरोपंतांच्या ‘ कृष्ण-विजय ’ अ. ८६ यांत सुभद्रेला पाहून यतिरूप अर्जुनाची भोजनाच्या वेळीं जी स्थिति झाली तिचें वर्णन हास्योत्पादक आहे. मंत्ररामायण युद्धकांडांतील कुंभकर्ण–झोप ( मोरोपंती वेंचे पृ. ८२ ) हें प्रकरण अत्यंत हास्यकारक आहे. शाहिरांच्या कांहीं लावण्यांत हास्यरस आढळतो. आधुनिक कवींत, मोगरे, श्री. कृ. कोल्हटकर, केळकर, अनंततनय, माधवज्यूलियन, गोविंदाग्रज, केशवकुमार व जयकृष्ण उपाध्ये या कवींनीं हास्यरसाचें आविष्करण करण्याचें चातुर्य प्रगट केलें आहे.

संस्कृत साहित्यकोविदांनीं अद्‌भुताची रसमालिकेंत गणना केली

आहे. सत्यसृष्टींतील अपूर्णतेमुळें असंतुष्ट मनाला अद्भुत सृष्टींतील आनंदाचा आस्वाद घेण्याची अभिलाषा उत्पन्न होते. काव्य-प्रकाशांत ‘ विस्मयश्चित्तविस्तारो वस्तुमाहात्म्यवर्णनात् ’ असें त्याचें लक्षण दिलें आहे व त्याचें ‘ चित्रं महानेष वतावतारः क्व कान्तिरेषाऽभिनवैव भाङ्गि । लोकोत्तरं धैर्यमहो प्रभावः काऽप्याकृतिर्नूतन एष सर्गः (उल्लास ४ श्लोक ४४). हें उदाहरण दिलें आहे. या ठिकाणीं वामन हें आलंबन, कांतिगुणातिशय हे उद्दीपनभाव, स्तवादि हे अनुभाव व मतिधृतिहर्ष इत्यादि व्यभिचारीभाव आहेत. अद्भुतरसांत वस्तूच्या महात्म्यदर्शनानें चित्तवृत्तींचा विकास होतो. श्रीज्ञानेश्वरींतील ११ वा अध्याय हा अद्भुत व शांत यांच्या मीलनाचें मनोज्ञ उदाहरण आहे. या अध्यायाच्या प्रारंभींच त्यांनीं ‘ जेथ शांताचिया घरां । अद्भुत झाला पाहुणेरा । आणि येरांहि रसा पांतिकरा, जाला मान ( अ. ११ ओ. २ ) असें म्हटलें आहे. हा सर्वच अध्याय अद्भुतरसाच्या दृष्टीनें बहारदार आहे. त्यांतील ‘ पश्य मे पार्थ रूपाणि । या ५ व्या श्लोकावरील पुढील ओव्या किती अद्भुतरम्य आहेत पहा:– “ एकें जननविलासें । एकें पालनशीलें लालसें । एकें संहारके सावेशें । साक्षीभूतें एकें ॥१३०॥ एवं नानाविधें परि बहुवसें । आणि दिव्य तेजप्रकाशें । तेवीचि एक एका ऐसें । वर्णही नव्हे ॥१३१॥ एकें तातले साडे पंधरें । तैसें कपिलवर्णें अपारें । एके सर्वांगीं जैसें सिंदुरें । उतरलें नभ ॥१३२॥ एकें शुद्ध स्फटिक सोज्वळें । एकें इंद्रनीळसुनीळ । एकें अंजनवर्ण सकाळें । रक्तवर्णें एकें ॥१३४॥ एक लसत्कांचनसम पिवळी । एक सजलजलद शामळी । एकें चापेगौरी केवळी । हरितें एकें ॥१३५॥ एकें अतिलावण्यसाकारें । एकें स्निग्धवपुमनोहरें । शृंगाराश्रियेची भांडारें । उघाडिलीं जैसी ॥१३८॥ ( अ. ११ ) मुक्तेश्वरांच्या सभापर्वांतील मयसभेचें वर्णन अद्भुतमनोहर आहे. मयासुर हा शिल्पविद्येचा अपरब्रह्मा होता. म्हणून त्यानें श्रीकृष्णाच्या

आशेवरून प्रेक्षणीय मयसभा निर्माण केली. ती मयसभा कशी होती पहा:–" सप्तरंगी विशाळ शिळा। कोरीव टेंकिल्या अंतराळा। त्याबाहेर जनांच्या डोळया। चित्रविचित्र भासती ॥२४॥ घोटीव पाचूचे पाषाणीं चौक सांधिला मंडपांगणीं। ढाळोनी सोनियाचें पाणी। कमळवेली रेखिल्या ॥३०॥ कौस्तुभमणी सीमंतिणी। खेवणी जडिली खणोखणीं। यालागीं प्रवर्तल्या रजनीं। काज नाहीं दीपाचें ॥३८॥ सुदृढ सुवर्णाच्या भिंती। चतुर्दशभुवनांची आकृती। कुसरिये जडली रत्नदीप्ती। साच कीं चित्र लक्षे ना ॥४४॥ सोमकांताच्या पाषाणीं। विचित्र वापिका पुष्करिणी। माजी पुष्करें नानावर्णी। विकासतीं सुवासें ॥५१॥ सुगंधोदकें खंडकुलिया रत्नें बाणलीं मंचकीं शय्या। आसनें वितानें गादिया। इंद्रगोपवर्णाची ॥५४॥ द्राक्षी फळांचें मंडप दाट। तळीं वाहती रसांचें पाट। अमृत निश्चळ सुस्वादिष्ट। हेमजंबू डाळिंबी ॥६५॥ चंपकवनें दवनवनें। कृष्णागुरु हरिचंदनें। कर्पुरकेशरकर्दळींविपिनें। कनक केतकी शोभती ॥६७॥ असो ऐसी सुरवाडभरित। सभा निर्मिली अद्‌भुत। उपमे तुळिता गगनांत। स्वर्गपारडे वरुतें ॥६९॥ (सभापर्व अ. २ ). श्रीधर व मोरोपंत यांचेंहि मयसभेचें वर्णन उल्लेखनीय आहे. केशवसुतांच्या 'समुद्रतीरीं उभी असलेल्या तरुणीस' या कवितेंत अद्‌भुतरसाचें आविष्करण झालें आहे. सारांश, अद्‌भुतरसाचें आविष्करण सदैव आल्हादक वाटेल यांत शंका नाहीं.

अद्‌भुतरसानंतर शांतरसाचा विचार करूं. साहित्यशास्त्रज्ञांनीं शांतरसाच्या बाबतींत संशय व्यक्त केला आहे. दशरूपक म्हणतो:–"शममपि केचित्प्राहु: पुष्टिर्नाटयेषु नैतस्य [ ४–३५ ] शांतरस कोणी मानतात. पण त्याचा नाटकांत परिपोष होऊं शकत नाहीं. अभिनवगुप्तानें शांतरसाचें समर्थन केलें असून तो मोक्षफलप्रद असल्यानें सव रसांत श्रेष्ठ आहे असें म्हटले आहे. त्याचप्रमाणें ध्वन्यालोककारांनीं शांतरसाला मान्यता दिली आहे. व मम्मटांनीं 'निर्वेदस्थायिभावोऽस्ति शान्तोऽपि नवमो

रसः– निर्वेद हा ज्याचा स्थायीभाव आहे असा शांत हा देखील नववा रस आहे अशी कबुली दिली आहे. ज्ञानेश्वरीच्या नवव्या अध्यायांत शांतरसाचा कसा शुचिरुचिर आविष्कार झाला आहे पहाः– " तरी जयांचें चोखटें मानसीं । मी होऊनि असें क्षेत्रसंन्यासी । जया निजेल्यानें उपासी। वैराग्य गा । जे ज्ञानगंगें नाहाले । पूर्णता जेऊनि धाले । जे शांतीसि झाले । पल्लव नवे ॥१९०॥ जे परिणामा निघाले कोंभ । जे धैर्यमंडपाचे स्तंभ । जे आनंदसमुद्रीं कुंभ । चुबुकळोनि भरिलें ॥१९१॥ जयां भक्तीची एकुली प्राप्ती । जे कैवल्यातें परते सर म्हणती । जयाच्यिये लीलेमाजीं प्रीति । जियाली दिसे ॥१९२॥ जे आघवींचि करणी । लेइजे शांतीचें लेणीं । जयाचें चित्त गवसणी । व्यापका मज । ( १९३ अध्याय ९ ) मोरोपंतांच्या केकावलि, आर्याकेकावलि, अंबरीषाख्यान या काव्यांत आढळतो. विषयसुखाच्या तिरस्कारबुद्धीस निर्वेद असें म्हणतात; व हाच शांतरसाचा स्थायीभाव आहे. पुण्यक्षेत्रें, ऋष्याश्रम, सत्पुरुषसमागम, सत्कथाश्रवण इत्यादि कारणांमुळें हा निर्वेद होतो. प्राचीन मराठी कवि संसाराच्या संमोहांतून मुक्त होऊन ईशचरणीं रममाण झालेले होते, त्यामुळें त्यांच्या काव्यांत शांतरसाचा परिपोष उत्कटतेनें आढळतो. आधुनिक काव्यांत गोविंदाग्रजांच्या ' मुरली ' या काव्याचें पर्यवसान शांतरसांत झालें आहे. पाळंदे, अनंततनय, तांबेप्रभृति फारच थोड्या कवींनीं शांतरसात्मक कविता लिहिली आहे.

नवरसाशिवाय, प्रेयान्, वत्सल व उदात्त हे रस कांहीं जण मानतात. मित्रविषयक स्नेहास प्रेयान् असें म्हणतात व पुत्रबंधु इत्यादिकांच्या स्नेहास वत्सल असें म्हणतात. निसर्गांतील रम्य दृश्यांचें जेथें वर्णन केलें असेल तेथें उदात्तरस मानावा असें विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं म्हटलें आहे. तथापि हे रस सर्वांना अभिमत नसल्यानें त्यांचा येथें विचार न करितां पुढें या रसविषयक काव्याचें समालोचन करावयाचें योजिलें आहे.

येथपर्यंत नवरसांचा उहापोह केला. आतां भक्तिरसाचा विचार करूं. भक्तीला रस न मानतां भाव मानण्याकडे संस्कृत साहित्यकोविंदांची प्रवृत्ति आहे. " सा ( भक्तिः ) परानुरक्तिरीश्वरे ' ( शांडिल्यसूत्र २ )– ईश्वराच्या ठिकाणी निरातिशय प्रेम म्हणजे भक्ति होय. तथापि ईशभक्तीची भावना हा स्वतंत्र रस मानावा कीं नाहीं याविषयीं एकमत नाहीं. जगन्नाथ पंडित म्हणतातः–"अथ कथमेतत एव रसाः । भगवदालम्बनस्य रोमाञ्चाश्रुपातादिभिरनुभावितस्यहर्षादिभिः परिपोषितस्य भागवतादिपुराणश्रवणसमये भगवद्भक्तैरनुभूयमानस्य भक्तिरसस्य दुरपह्नवत्वात् । भगवदनुरागरूपा भक्तिश्चात्र स्थायिभावः । न चास्तै शान्तरसेऽन्तर्भावमर्हति । अनुरागस्य वैराग्यविरुद्धत्वात् । उच्यते–भक्तदेवादिविषयरतित्वेन भावान्तर्गततया रसत्वानुपपत्तेः । रतिर्देवादिविषया व्यभिचारी तथाञ्जितः । भावः-प्रोक्तस्तदाभासा ह्यनौचित्यप्रवर्तितः ॥ इति हि प्राच्यं सिद्धान्तात् । नच तर्हि कामिनीविषयाया अपि रतिर्भावत्वदस्तु, रतित्वाविशेषात्, अस्तु वा भगवद्भक्तेरेव स्थायित्वं कामिन्यादिरतीनांच भावत्वम्, विनिगमकाभावात्; इति वाच्यम् । भरतादिमुनिवचनानामेवात्र रसभावत्वादिव्यवस्थापकत्वेन स्वातंत्र्यायोगात् । अन्यथा पुत्रादिविषयाया अपि रतेः स्थायिभाव त्वं कुतो न स्यात् । न स्यात् वा कुतः शुद्धभावत्वं जुगुप्साशोकदीनां इत्यखिलदर्शनव्याकुली स्यात्; रसानां नवत्वगणनाच मुनिवचननियंत्रिता भज्येत, इति यथाशास्त्रमेव ज्यायः" ॥ ( रसगंगाधर पृ. ४५–४६ ). सारांश, रसादि भावादिकांच्या बाबतींत भरतमुनींचेच प्रमाण असल्यामुळें स्वतंत्र विचारास स्थान नाहीं; असे म्हणून जगन्नाथ पंडितांनीं युक्तिवाद नाकारला आहे. तात्त्विक विवेचन नाकारून केवळ मुनिवचनावर भिस्त ठेवल्यामुळें जगन्नाथपंडितांचें मत प्रत्योत्पादक वाटत नाहीं. डॉ. जॉन्सन हा आंग्ल साहित्यपंडित लिहितोः– Contemplative piety or the intercourse between God and the human soul, cannot be poetical. Man

admitted to implore the mercy of his Creator and plead the merits of his Redeemer, is already in a higher state than poetry can confer. ...; The essence of Poetry is invention such invention as, by producing something unexpected, surprises and delights. The topics of devotion are few. Poetry pleases by exhibiting an idea more grateful to the mind than things themselves afford. This effect proceeds from the display of those parts of nature which attract, and the concealment of those which repel the imagination, but the religion must be shown as it is suppression and addition equally corrupt it, and such, as it is, it is known already. Whatever is great, desirable, or tremendous, is comprised in the name of the Supreme Being. Omnipotence cannot be exalted; infinity cannot be amplified, perfection cannot be improved. The employments of pious meditation are faith, thanksgiving, repentence and supplication. Faith invariably uniform cannot be invested by fancy, with decorations. Thanksgiving the most joyful of all effisious, yet addressed to a Being without passions is confined to a few modes, and is to be felt rather than expressed. Repentence, trembling in the presence of the Judge, is not at leisure for cadences and epithets. Supplication of man to a man may diffuse itself through many topics of persuasion: but supplication to God can only cry for mercy ( life of Waller ). डॉ. जॉन्सन यानें भक्तीचे विषय मर्यादित आहेत, ईश्वराचे गुण अधिक उठावदारपणें वर्णन करणें अशक्य आहे, भक्त काव्यापेक्षां उच्चतम वातावरणांत पोहोंचलेला असतो–हे भक्तिरसाच्या विरुद्ध आक्षेप घेतले आहेत. श्री. हिंगणेकर यांनीं 'भक्ति ही विचारशीलतेची विलीनावस्था आहे' असें म्हणून भक्तिरसाला विरोध केला आहे. प्रा. जोग यांनीं मूलभूततेच्या मुद्यावर विरोध केला आहे. प्रा. पंगु यांनीं निर्जीव व जड देवमूर्तीशीं सजीव अशा मनुष्यप्राण्याची समान वर्गताच्या अभावीं रसपरिपोषाला अवश्य असणारी उत्कट तन्मयता होणें

अशक्य असल्यामुळें व या नवीन भक्तिरसाला अनुभाव व व्यभिचारी भाव यांची जोड नसल्यामुळें तेथें भक्तिरस न होतां भक्तिभावच सिद्ध होतो' असें आपलें मत व्यक्त केलें आहे.

भक्तिरसाला प्रतिकूल असणाऱ्यापेक्षां अनुकूल असणारे काव्यकोविद अधिक आढळतात. गोस्वामीनें भक्तिरसाचें समर्थन केलें आहे. प्राचीन कवि भक्तिरस मानणारे होते. वामनपंडित 'कंसवध' या काव्यांत म्हणतात:-दे मल्ला रस रौद्र, अद्भुत नरा शृंगार नारीजना। गौळ्या हास्य, नृपास वीर करुणा मात्यापित्यांच्या मना। कंसालागि भयानकाख्य रस दे बीभत्स मूढा भ्रमें। संता शांतरस स्वभक्ति रस तो दे यादवा या क्रमें॥ (कंसवध श्लो. ५). वामनपंडितांनीं या श्लोकांत भक्ति हा दहावा रस मानला आहे. प्रा. चापेकर यांनीं भक्तिरसाला मराठी वाङ्मयापुरती मान्यता दिली आहे. ते लिहितात:- 'अर्थात्, मराठींत भक्तीला स्वतंत्र रस कल्पिण्यास कांहीं हरकत नाहीं; इतकेंच नाहीं तर इतर कोणत्याहि भाषेंतील वाङ्मयाहून आंग्लपूर्व मराठी भाषेचें वैशिष्ट्य दर्शविण्यास त्याच्या भक्तिरसात्मक लक्षणाचा निर्देश करणें विशेष कार्यकारी आहे (काव्यचर्चा पृ. १४३). प्रा. द. के. केळकर लिहितात:- "शृंगारादि इतर मनोविकार कल्पनेंत घोळवीत बसण्यांत जसा आनंद होतो तसा ईश्वरप्रेमाची भावनाहि घोळवीत बसण्यांत उत्पन्न होतो. यास्तव भक्तीची भावना रसपदवीस पात्र आहे असें मानणें युक्त आहे. प्रा. बनहट्टी व डॉ. वाटवे यांनीं 'मयूरकाव्यविवेचन' व 'रसविमर्श या ग्रंथांत भक्तिरसाला मान्यता दिली आहे. इंग्रजी लेखकांत जॉन केबल [John keble] यांनीं 'Sacred Poetry' या निबंधांत भक्तिरसाचें समर्थन केलें आहे. या निबंधांत त्यांनीं डॉ. जॉन्सनच्या आक्षेपांचें खंडन करून इंग्रजी काव्यांतील आध्यात्मिक काव्यांचें समर्थन केलें आहे. त्या निबंधांत ते लिहितात:-"In all ages of our literary history it seems

to have been considered almost an essential part of a poet's duty give up some pages to scriptural story or to the praise of his Maker how remote soever from anything like religion the general strain of his writings might to ( English critical Essays. 19th Cen. p. 210 ),— कोणत्याहि काळांत ईशस्तुतिपर कांहीं लिहिणें हें कवि आपलें कर्तव्य मानतात हें विधान मराठी वाङ्मयालाहि लागू पडेल. अरविंद घोष यांनीं आपल्या ' Future Poetry ' या प्रबंधांत भावी कविता ही विश्वाच्या बाह्य सौंदर्याचें वर्णन न करितां, किंवा मानवी भावनांचें सूक्ष्म पृथःकरण न करितां ब्रह्मानंदांतच रममाण होईल असा सिद्धांत मांडला आहे.

एकंदरींत, भक्तीची भावना मूलभूत किंवा सार्वत्रिक नाहीं असें मानण्याचें कारण नाहीं. मानवी संस्कृतच्या बाल्यावस्थेप्रमाणेंच तिच्या परिणतावस्थेंतहि परमेश्वराचें स्तवनसंकीर्तन करण्यांत मानवी प्रतिभेला आनंद वाटत आला आहे. रति, क्रोध व उत्साह इत्यादि भावनांप्रमाणेंच ईशभक्तीची भावनाहि अत्युत्कट, आस्वाद्यमान व आल्हादप्रद आहे. या जगांत असा क्वचित एकादा मनुष्य आढळेल कीं ज्याला सर्व आयुष्यांत ईश्वरी लीलेचें स्मरण होऊन त्याच्याविषयीं आदराची भावना निर्माण होणार नाहीं. म्हणून ईश्वरभक्ति ही भावना जगाच्या आरंभापासून तो अंतापर्यंत मानवी अंतःकरणांत कायम राहील. म्हणून त्रिविधतापांनीं तप्त व त्रस्त झालेल्या मानवाला तुष्ट करणारा भक्ति हा मूर्धाभिषिक्त रस आहे असेंहि म्हणावयास हरकत नाहीं.

प्राचीन मराठी भाषेंतील संतकाव्य हें भक्तिरसात्मक आहे. त्यांच्या अभंगांत भक्तीरसाचा अत्युत्कट आविष्कार आहे मराठी संतकवींच्या अभंगरचनेवरून भक्तिरसाचा आविष्कार किती विविधरीतीनें होऊ शकतो हें पुढील उदाहरणांवरून दिसून येईलः—

आम्ही किरण तूं सूर्यो । आम्ही अस्तु तू उदयो ॥
कैसी देहीं दिवो दिवटा । परा पश्यंती चारी वाटा ।
आम्ही कळा तूं चंद्रमा । तूं अमृत आम्ही गरिमा ॥
आम्ही विधि तूं विधान । आम्ही तूं ध्येय तूं साधन ।
निवृत्ति उपरति वाहे । हृदयीं कृष्णनाथ ध्याये ॥

—निवृत्तिनाथ [ संतवचनामृत भाग २ पृ. १३ ]

घनुवाजे घुणघुणा वारा वाजे रुणझुजा ।
अवतारकु हा कान्हा वेगीं भेटवा कां ॥
चांद वो चांदणें चापे वो चंदन ।
देवकीनंदनेवीण नावडे वो ॥
चंदनाची चोळी माझे सर्व अंग पोळी ।
कान्हो वनमाळी वेगीं भेटवा कां ॥
सुमनाची शेज सीतळ वो निकी ।
पोळे आगीसारिखी वेगी विझवा कां ॥
तुम्ही गातसा सुस्वरें ऐको नेदावीं उत्तरें ।
कोकिळें वर्जावें तुम्ही बाइयानो ॥
दर्पणीं पाहतां रूप न दिसे वो आपुलें ।
बाप रखुमादेवर विठ्ठलें मज ऐसें केलें ॥

—श्रीज्ञानेश्वर ( सं. व. पृ. ३३ )

सागरीचें तोय जगा निवारीत । मागुतें भरत पूर्णपणें ॥
तैसें आम्ही दास तुजमाजीं उदास । तूं आमुचा निवास सर्व देवा ।
तुज माजीं विरो सुखदुःख विसरो । तुझ्या नामें तरो येचि जन्मीं ।
सोपान निकट बोलोनि सरळ । तुष्टला गोपाळ अभय देत ॥

—सोपानदेव [ सं. व. पृ. ६० ]

अवघाचि संसार केला आम्ही गोड । झाडें आणि झूड ब्रह्मरूप ॥
माता आणि पिता गण आणि गोत । कन्या आणि सुत ब्रह्मरूप ॥

वापी कूप सिंधू आणि सरोवर । दरे आणि खोरें ब्रह्मरूप ॥
हत्ती आणि घोडे बैल आणि रेडे । मुंगे आणि माकुडें ब्रह्मरूप ॥
आनंदाचें लेणें मुक्ताबाई ल्याली । पालवूं लागली चांगयासी ॥

—मुक्ताबाई ( सं. व. पृ. ६४ )

आनंदवनीं भ्रमर होता । झुंकारें उडाला गेला केउता ॥
नाम नाहीं रूप नाहीं । पाहूं गेलों तव कांहींच नाहीं ॥
रुंझी राहिली शब्द निमाला । वटेश्वरी चांगा विस्मित जाला ॥

—चांगदेव ( सं. व. पृ. ६७ )

तुझें रूप माझ्या दाखवी मनातें । मग तुझ्या चरणातें न विसंबे ॥
कां मज शिणविशी थोडिया कारणें । काय तुझें उणें होईल देवा ॥
चातकाची तहान पुरवी जळधर । काय त्याचें सरे थोरपण ॥
चंद्र चकोराचा पुरवी सोहळा । काय त्याच्या कळा न्यून होती ॥
कूर्मी अवलोकी आपुलिया बाळा । काय तिच्या डोळां दृष्टी नासे ॥
नामा म्हणे देवा तुझाचि भरंवसा । अनाथा कोंवसा होसी तूची ॥

—नामदेव (सं. व. पृ. ७७ )

निर्गुणाचें संगीं भेटी आलों सगुणासंगें । तंव झालों प्रसंगें गुणातीत ॥
मज रूप नाहीं नांव सांगूं काई । झाला काई बाई बोलूं नये ॥
बोलतां आपुली जिव्हा पैं खादली । खेचरी लागली पाहतां पाहतां ॥
म्हणे गोरा कुंभार नाम्या तुझी भेटी । सुखासुखी मिठी पडली कैसी ॥

—गोरा कुंभार (सं. व. पृ. १११ )

कां बा रुसलासी कृपाळु बा हरी । तुजवीण दुसरी भाकू ती कोण ॥
दीन रंक पापी हीन माझी याती । सांभाळी श्रीपती पांडुरंगा ॥
मोह आशा माझ्या लागलीसे पाठीं । काळक्रूर दृष्टि पाहत असे ॥
सावंता म्हणे देवा नको ठेऊं येथें । उचलोनी अनाथा न्यावें मज ॥

—सावंता माळी (सं. व. पृ. १३५)

नाम फुकाचें फुकाचें । देवा पंढरीरायाचें ॥
नाम अमृत हें सार । हृदयीं जपा निरंतर ॥
नाम संतांचें माहेर । प्रेमसुखाचें आगर ॥
नाम सर्वांमध्यें सार । नरहरी जपे निरंतर ॥

—नरहरी सोनार (सं. व. पृ. १३७)

हीन याति माझी देवा । कैसी घडेल तुझी सेवा ॥
मज दूर दूर हो म्हणती । तुज भेटूं कवण्या रीती ॥
माझा लागतांचि कर । सितोडा घेताती करार ॥
माझ्या गोविंदा गोपाळा । करुणा भाकी चोखामेळा ॥

—चोखामेळा (सं. व. पृ. ११९)

गंगा गेली सिंधूपाशीं । त्याणें आव्हेरिलें तिशीं ॥
तरी ते सांगावें कवणाला । ऐसे बोले बा विठ्ठला ॥
जळ काय जळचरा । माता आव्हेरी लेकुरा ॥
जनी म्हणे शरण आले । अव्हेरितां ब्रीद गेलें ॥

—जनाबाई (सं. व. पृ. १४४)

धन्य धन्य दिन । तुमचें झालें दरुषण ॥
आजि भाग्य उदया आलें । तुमचें पाऊल देखिलें ।
सेना म्हणे झाला । धन्य दिवस आजी भला ॥

—सेना न्हावी (सं. व. पृ. १५३)

दीन पतित अन्यायी । शरण आले विठाबाई ॥
मी तो आहे यातीहीन । न कळे कांहीं आचरण ॥
मज अधिकार नाहीं । भेटी देई विठाबाई ॥
ठाव देई चरणांपाशीं । तुझी कान्होपात्रा दासी ॥

—कान्होपात्रा (सं. व. पृ. १५५)

तुम्ही कृपाळू जी देवा । केली सेवा आवडी ॥
करुनि सडा संमार्जन । पाळिलें वचन प्रमाण ॥
उगाळूनि गंध पुरविले । सोहाळे केले दासांचे ॥
ऐसा अपराधी पतित । एका जनार्दनीं म्हणत ॥

—एकनाथ ( सं. व. पृ. २०७ )

दीनांचा दयाळू कीर्ति ऐकियेली । म्हणूनी पाहिली वाट तुझी ॥
अनाथांचा नाथ होशील कैवारी । म्हणूनियां हरी बोभाईलें ॥
तुजवीण कोण जाणें हे अंतर । कोणासी जौजार घालूं माझा ।
दास म्हणे आम्ही दीनाहूनि दीन । करावें पालन दुर्बळांचें ॥

—रामदास ( नवनीत पृ. १५४ )

भेटीलागी जीवा लागलीसे आस । पाहे रात्रंदिवस वाट तुझी ॥
पौर्णिमेचा चंद्र चकोरा जीवन । तैसें माझें मन वाट पाहे ॥
दिवाळीच्या मूळा लेकी आसावली । पाहातसे वाट्ली पंढरीची ॥
भुकेलिये बाळ अतिशोक करी । वाट पाहे परी माउलीची ॥
तुका म्हणे मज लागलीसे भूक । धावुनि श्रीमुख दावी देवा ॥

—तुकाराम ( नवनीत पृ. ७३ )

वर उद्धृत केलेल्या अभंगांवरून भक्तिरसाचें आविष्करण किती प्रकारें होऊं शकतें याची कुणालाहि प्रचीति येईल. प्राचीन संतकवींत विशेषतः नामदेव व तुकाराम यांच्या अभंगांत पराकाष्ठेची उत्कटता व अकृत्रिम सहजता हे गुण आढळून येतात.

प्राचीन कवि मंडळांत पांडित्यांत अग्रेसर असलेले वामनस्वामी हे परम भगवद्भक्त होते. यामुळे त्याच्या काव्यांत भक्तिरस विपुलतेनें आढळतो. त्यांचीं 'ध्यानमाळा', 'विष्णुध्यान' ही काव्यें भक्तिरसप्रचुर असून त्यांचें 'ब्रह्मस्तुति' हें विस्तृत काव्य ईशस्तुतीलाच वाहिलें आहे. त्यांच्या काव्यांतील वेदांतविवेचनामुळें भक्तिरसाचा प्रवाह क्वचित मंदगतीनें

वाहतो. त्याचप्रमाणें विठ्ठल, आनंदतनय, अमृतराय व दयाळनाथ यांची स्फुट पद्यरचना भक्तिरससंभृत आहे. मोरोपंतांच्या 'आर्या केकावलि', 'श्लोक केकावलि', 'भीष्मभक्तिभाग्य', 'भक्त-भूषण', 'सुदामचरित्र' इत्यादि काव्यें भक्तिरसाचीं उदाहरणें म्हणून सागतां येतील. भीष्मकृत श्रीकांत स्तुतींतील पुढील आर्या पहा:- "सरस तमालश्यामल रविकर गौरांबरद्वयें युक्त। जो विश्वमनोहर त्या मुक्ति त्यागूनि वांछिति मुक्त ॥१२४॥ ऐसें जेणें धरिलें अतिरुचिर शरीर ज्यांत मुखपद्म। शोभे अलक मधुपकुल परिवृत करुणाविभूतीचें सद्म ॥१२५॥ त्या विष्णूच्या सख्या श्रीहरिच्या ठायिं अहैतुकीं स्व-रती। राहो सदा कदापि न हो क्षणहि त्यजुनि तत्पदा परती ॥१२६॥ कृष्णविजयाच्या ८७ व्या अध्यायांतील श्रुतदेव ब्राह्मणानें केलेल्या श्रीकृष्णपूजेचें वर्णनहि भक्तिरसपरिपूर्ण आहे. सारांश, तन्वंगीच्या अंगप्रत्यंगांतून लावण्याच्या रुचिर छटा उसळतात त्याप्रमाणें प्राचीन काव्य-तरंगिणींतून भक्तिरसाच्या विमल लहरी उंचळतात, असें म्हणावयास हरकत नाहीं.

मराठी काव्याच्या अद्भुतरम्य (Romantic) युगांत भक्तिरसाचा फारसा आविष्कार आढळत नाहीं. प्राचीन कवींची वृत्ति जितकी भक्तिप्रवण होती तितकी आधुनिक कवींची नाहीं हें याचें एक प्रमुख कारण आहे. पाश्चात्य वाङ्मयाच्या परिचयानें व परिस्थितीच्या परिवर्तनामुळें विषयवैचित्र्याची वृद्धि झाली. या कारणामुळें आधुनिक कवींची प्रतिभा एका भक्तिरसांत रममाण न झाल्यास त्यांत काय नवल? 'आधुनिक महिपती' असें ज्यांना यथार्थतेनें म्हणतां येईल असा दासगणु याच्यासारखा सर्वस्वी भक्तिरसप्रधान काव्यनिर्मिती करणारा कवि अर्वाचीन काळांत क्वचित आढळतो. आधुनिक कवींत पाळंदे यांनीं पद्यात्मक व वृत्तात्मक अशी भक्तिरसमय कविता लिहिली आहे. त्यांत परमेश्वराविषयीं आदर व अन्तःकरणाची आतुरता हे गुण आढळतात. त्यांच्या

काव्यावर आनंदतनय, विठ्ठल व अमृतराय यांच्या पद्यात्मक रचनेची छाप दिसून येते. उदाहरणार्थ, " अनलस मी तुज नित्य भजावें ॥धृ०॥ नित्य भजावें, नित्य नमावें, नित्य शरण तुज यावें ॥ तव पदकमलीं अलिसम दीनें आनंदांत निजावें ॥ नश्वर येथें सौख्य सकळही हें पुरते समजावें ॥ नित्य सुखाचा लाभ तव पदीं सत्वर हें उमजावें ॥ भक्तिलतेचें देवा माझ्या चित्तीं बीज रुजावें " ( अर्वाचीन कविता, पृ. ४१ ). रे. टिळकांची ' अभंगांजलि ' व गोविंदाग्रजांचे ' अनामिकाचे अभंग ' यांचाहि येथें उल्लेख करितां येईल. अनंततनय कवींनीं भक्तिरसात्मक कविता पुष्कळच लिहिली असून त्यांचा ' सुधास्यंद ' आनंददायक वाटतो. प्रा. चाफेकर यांनीं म्हटल्याप्रमाणें, " प्रासंगिक प्रार्थना, निरनिराळ्या देवतांचीं स्तोत्रें व श्रीरामकृष्णपरमहंस यांच्या वाक्सुधेच्या अनुषंगानें झालेला ' सुधास्यंद ' हीं इतकीं सरस व भक्त्युत्कट प्रकरणें आहेत कीं, तीं स्तोत्रांदाखल किंवा जुन्या प्रासादिक संतांच्या नीतिपर पदांप्रमाणें मुखोद्गत करून त्यांचें आस्थायुक्त पठण अथवा गुंजन केल्यास त्यायोगें कोणाहि सहृदय मनुष्यास खरोखर अपूर्व आल्हाद, समाधान व शांति वाटल्यावांचून राहणार नाहीं ( हृदयतरंग भाग २ ). याचप्रमाणें गोविंदराव कानिटकर, तांबे, प्रा. वा. भा. पाठक, साधुदास व मुकुंदराय, या कवींनींहि भक्तिरसात्मक काव्यरचना केली आहे. पण या अर्वाचीन कवींची कविता कितीहि सरस असली तरी प्राचीन संतांच्या काव्यांत जो जिव्हाळा व जिवंतपणा आहे तो या आधुनिक कवींच्या या भक्तिरसात्मक काव्यांत आढळणें शक्य नाहीं. कारण ईशभक्ति हेंच संतकवींचें जीवनसर्वस्व असल्यामुळें त्यांची भक्तिरसात्मक कविता ही उत्कट मनोहर आढळते. सारांश, मराठी काव्याच्या आध्यात्मिक युगाप्रमाणें अद्भुतरम्य युगांतील काव्यांत भक्तिरसोत्कटता नसली तरी त्यांत या चित्सुखशांतिदायक रसाची अगदींच उपेक्षा झालेली नाहीं.

येथपर्यंत मराठी काव्यांतील रसविलासाचें समालोचन केलें. त्यावरून मराठी काव्यांतील रस संपदेची कुणालाहि कल्पना येईल. ज्ञानेश्वरी हा ग्रंथ तात्त्विक असला तरी त्यांत उपमादृष्टांतादि अलंकारांच्या मिषानें नवरसांचा परिपोष झाला आहे. मुक्तेश्वर, मोरोपंत व श्रीधर हे सर्व रस आविष्कृत करण्यांत कुशल आहेत. नामदेव, एकनाथ, तुकाराम व रामदास यांनीं प्रामुख्यानें भक्तिरसाला प्राधान्य दिलें आहे. प्राचीन कवींनीं पौराणिक कथांच्या अनुषंगानें रसपरिपोष केला असून अर्वाचीन कवींनीं स्वतंत्र भावगीतांच्याद्वारे रसाविष्कार केला आहे. शाहिरांच्या काव्यांत शृंगार व वीर यांचा संकर झाला आहे. मुक्तेश्वर व वामन हे रसाविष्कारांत संयमाचें उल्लंघन करितात व मुक्तेश्वरांचे 'शुकरंभासंवाद' व वामनांचें 'राधाभुजंग' हीं काव्यें त्यांच्या ठिकाणीं असणाऱ्या संयमाभावाचीं निदर्शक आहेत. या दृष्टीनें मोरोपंतांच्या काव्यांतील संयम व सदभिरुचि हे गुण स्पृहणीय वाटतात. अर्वाचीन कवींत केशवसुत, गोविंदाग्रज व तांबे यांच्या काव्यांत मुग्धशृंगाराचे चित्रण झालें आहे; व शाहीर कवींपेक्षां आधुनिक कवींची अभिरुचि शुद्ध व शुचितर आहे. तथापि मुक्तेश्वर व मोरोपंत यांच्याप्रमाणें नवरसवर्णनाचें चातुर्य आधुनिक कवींत फारसें आढळत नाहीं. मराठी काव्याच्या आध्यात्मिक युगांत भक्ति व शांत; अभिजात युगांत शृंगार व वीर; व अद्भुतरम्य युगांत शृंगार व करुण हे रस प्रामुख्यानें दृग्गोचर होतात. प्राचीन कविता कथनपर असून अर्वाचीन कविता गीतकात्मक असल्यामुळें पूर्वोक्त काव्यांत उत्तरोक्त काव्यांपेक्षां रसोत्कटतेची तीव्रता अधिक आढळते. कारण प्रदीर्घ रचना ही रसाविष्काराला अनुकूल असते. सारांश, भक्तिरसात्मकता हें मराठी काव्याचें आनन्यसामान्य वैशिष्टय असून भक्तीबरोबर इतरहि नवरसांचा मराठी काव्यांत आल्हादक आविष्कार झाला आहे असा एकंदरींत, निष्कर्ष काढल्यास तो चुकीचा ठरणार नाहीं; असा आम्हांला दृढ विश्वास वाटतो.

शेवटीं वामनपंडितांचें ‘ कंसवध ’ हें नवरसनिदर्शक काव्य उद्धृत करून हें प्रकरण पुरें करूं:—

नवरसें भव-रोग-रसायनें । करि हरी करिती मुनि गायनें ।
किमपि कंसवधीं रस देखिले । कथिन जें मनि वामनिं रेखिलें ॥१॥

वधुनि दारवटांचि महाकरीं । उभय दंत सहा गज घे करीं ।
गज वधूनि मृगांत जसा हरी । त्वरित मल्लदळांत निघे हरी ॥२॥

सर्वांग शृंगाररसासि नेत्रीं । कीं रंग दावूनि कुरंगनेत्री ।
अनंगरंगाबुधिच्या तरंगीं । रंगीं करी व्याकुल अंतरंगीं ॥३॥

रणांगणीं लक्षुनि कैठभारी । वज्राहुनी मानिति मल्लभारी ।
ऐसा हरी रौद्ररसासि दावी । कथा रसाची रुचि हे वदावी ॥४॥

भोजराज विगतप्रभ झाला । श्रीपती नृप गमे मनुजाला ।
दाखवी सुरस अद्भुत लोकीं । कीं असें जन मला अवलोकीं ॥५॥

शरीररक्तांकित दंत हस्ती । येतो कसा डोलत मत्त हस्ती ।
म्हणोनि जे हासति सख्यभावें । गोपाळ हा हास्यरस प्रभावें ॥६॥

घेऊनियां याच नृपासनातें । करील आम्हांवरि शासनातें ।
वाटे असें दुःख नृपासि भारी । वीराख्य दावी रस कैटभारी ॥७॥

कृष्ण हा परमदेवदेवकी । हें स्मरे न वसुदेव देवकी ।
लेकरूं म्हणुनि वर्षती दया । दाखवी हरि दया-रसोदया ॥८॥

कृष्ण हीनबळ बाळ लेंकरूं । मल्ल मारितिल काय मी करूं ।
ये रिती करिति खेद दंपती । स्फुंदती रडति आणीक कांपती ॥९॥

द्विरददंत जसे उपडूनि घे । रस भयानक कंसप्रती निघे ।
मनिं म्हणे निमिषें वधिला करीं । मजहि मारिल याचरि लौकरी ॥१०॥

अनंत शक्तीसही अज्ञ लोकीं । अशक्त मानूनि कृपावलोकीं ।
निरूपिला खेद बहु प्रकारें । बीभत्स केला रसनिर्विकारें ॥११॥

श्रीमूर्ति देखूनि महाविभूती । संता गमे स्वात्मसुखानुभूति ।
ते देखती शांत निजस्वरूपीं । दावी हरी शांतरस स्वरूपी ॥१२॥

नवरस कवि गाती हेंचि वर्णूनि जाती ।
निजचरितरसीं त्यां दाखवी दिव्य जाती ।
दशमरस अनन्य प्रेमभक्तीस लोकीं ।
यदुपति हरि ती दे यादवां स्वावलोकीं ॥१३॥

इष्टसर्वेहि अभीष्ट असेना ।
कृष्णरूप सचराचरसेना ।
वामनास सकळात्मक लाहो ।
कीर्तनप्रिय असा फळला हो ॥१४॥

———o———

# प्रकरण सहावें

## मराठी काव्याची वेषभूषा

हें शब्दब्रह्म अशेष । तेचि मूर्ति सुवेष ।
तें वर्णवपु निर्दोष । मिरवत असें ॥

—श्रीज्ञानेश्वर

मागील प्रकरणांत मराठी काव्यांतील रसविलासाचें समालोचन केलें. रस हा काव्याचा आत्मा असल्यामुळें त्याचें विवेचन अगोदर करणें आवश्यक होतें. तथापि रस हा काव्याचा आत्मा असला तरी रीति, गुण व अलंकार यांचा काव्याच्या वेषभूषेंत समावेश होतो. शब्दार्थांचें अद्वैत साधल्याखेरीज हृदयंगम रसाविर्भाव होऊं शकत नाही. प्रत्येक रसाचें यथोचित आविष्करण करण्यासाठीं कवीजवळ शब्दभांडार असावें लागतें. म्हणून समर्थांनीं 'शब्दसृष्टीचा ईश्वर' असे कवीचें वर्णन केलें आहे. रससिद्ध कवीलाहि शब्दसृष्टीवर प्रभुत्व मिळविण्यासाठीं अविश्रांत परिश्रम करावें लागतात. मिल्टन, टेनिसन, चंद्रशेखर यांसारख्या शिल्पी कवींच्या काव्यांत श्रुतिसुखद शब्दांच्या सुभग सजावटीमुळें इतकें सौंदर्य प्रत्ययाला येतें. याच्या उलट शब्दश्री अनुकूल नसल्यामुळें केशवसुतांच्या काव्यांत एकप्रकारचा दडदडीतपणा आढळतो. यामुळें प्रतिभाशाली कवीच्या प्रज्ञाकोशांत जोमदार, मर्मभेदक, तीक्ष्ण, मृदु, गंभीर व कर्कश अशा सर्वप्रकारच्या शब्दांचें वैभव ओतप्रत भरलेलें असतें. तुकारामांनीं "आम्हां घरीं धन शब्दांचींच रत्नें । शब्दांचींच शस्त्रें यत्नें करूं" असें उद्‌गार काढलें आहेत. सारांश, प्रस्तुत प्रकरणांत आपणांला मराठी काव्याच्या वेषभूषेचें अवलोकन करावयाचें आहे.

काव्याच्या वेषभूषेचा विचार करतांना प्रारंभीं रीतीकडे वळलें पाहिजे. 'रीतिरात्मा काव्यस्य'– काव्याचा रीति हा आत्मा आहे. असें

वामनानें म्हटलें आहे. वामन हा रीतीचा पुरस्कर्ता असून त्यानेंच प्रथम हा शब्द उपयोगांत आणला असें म्हणावयाला हरकत नाहीं. भोजानें म्हटल्या-प्रमाणें रीति म्हणजे जाण्याची पद्धति किंवा मार्ग किंवा तऱ्हा होय (भोज. स. कं. २, २७). वामनानें 'विशिष्ट पदरचना रीतिः' –काव्यांतील शब्दांची एक विशिष्ट तऱ्हेची मांडणी अशी रीतीची व्याख्या केली आहे. रचनेची विशिष्टता ही गुणावर अवलंबून असते असें वामनानें म्हटलें आहे. प्रा. जोग यांनीं म्हटल्याप्रमाणें 'रीति' या काव्यार्थाचें नुसतें मार्ग आहेत असें नसून त्या काव्याच्या शब्दार्थरूपी शरीराशीं अगदीं निकटत्वानें संबद्ध आहेत; म्हणूनच त्यांचें काव्यविचारांत महत्त्व आहे (अ. का. प्र. पृ. ८२). रीतिविचारांत योग्य शब्दांचें महत्त्व असतें. पण काव्यांत शब्दांच्या विशिष्ट मांडणीइतकेंच त्यांची योग्यता व औचित्य यांकडेहि लक्ष द्यावें लागतें. रीतींची संख्या किती आहे याविषयीं एकमत नाहीं. दंडीनें रीति अनेक आहेत असें सांगून वैदर्भी व गौडी या दोन रीतींचेंच वर्णन केलें आहे. वामनानें वैदर्भी, गौडी व पांचाली अशा तीन रीति सांगितल्या आहेत. ओज व प्रसाद या गुणांनीं मंडित ती वैदर्भी, ओज व कांति यांनीं समन्वित ती गौडी व माधुर्य सौकुमार्यादि गुणांनीं विभूषित ती पांचाली असें सांगून या तिन्हींपैकीं वैदर्भी रीतीचा कवींनीं स्वीकार करावा असें त्यानें सांगितलें आहे. भामहाच्या मतें वैदर्भी व गौडी या शब्दांवर भर देण्यांत अर्थ नाहीं. भाषा हा भावनेचा पोषाक असल्यानें जशी भावना बदलेल त्याप्रमाणें भाषेचें स्वरूप बदलतें. म्हणून सर्वांनीं एकाच प्रकारच्या रीतीचा स्वीकार करावा असें म्हणणें आग्रहमूलक आहे. शृंगार, वीर इत्यादि सर्व रसांना अलंकारिक, प्रौढ व अर्थपूर्ण भाषा असावी हें म्हणणें भावार्थानेंच घेतलें पाहिजे. शिवाय 'Style is the man' या उक्तीप्रमाणें व्यक्ति तितक्या रीति निर्माण होऊं शकतील. विश्वनाथानें या तीन रीतींत 'लाटी' या नवीन रीतीची भर घातली

आहे. रुद्रट व विश्वनाथ यांनीं चार रीति मान्य केल्या असून भोजानें अवंती व मागधी यांची अधिक भर घातली आहे. रीतींचीं हीं नांवें निरनिराळ्या देशांवरून पडलीं असावींत हें उघड आहे. रसाला अनुकूल अशी रम्यार्थप्रतिपादक शब्दयोजना करणें हीच ध्येयभूत रीति होय. प्रतिभाशाली कवि हा स्वतःच्या अभिरुचीनुसार स्वतंत्र रीति उत्पन्न करतो. म्हणून एकादीच रीति सर्वगुणसंपन्न व सर्वमान्य होईल असें मानणें समुचित नव्हे. सारांश, या सहा रीतींत ललितमधुर वैदर्भी व समासप्रचुर गौडी या दोनच प्रमुख रीति मानल्या गेल्या आहेत.

याचठिकाणीं रीतिविचार करितांना वॉल्टर बेगहॉट या पाश्चात्य काव्यमीमांसकाच्या मताचें दिग्दर्शन करावयाला हरकत नाहीं. वॉल्टर बेगहॉटनें (Walter Bagehot) "Wordsworth, Tennyson and Browning or Pure, Ornate and Grotsque art in English Poetry" हा विस्तृत प्रबंध लिहिला आहे. त्यांत त्यानें विशुद्ध (Pure) विभूषित (Ornate) व विकट (Grotsque) या तीन प्रकाराच्या भाषापद्धतींचा वर्ड्स्वर्थ, टेनिसन व ब्राउनिंग या तीन कवींच्या काव्यांवरून विचार केला आहे. बेगहॉटनें विशुद्ध, विभूषित व विकट असे रीतींचें तीन प्रकार कल्पिले आहेत. तो लिहितो कीं मिल्टनचें नष्टनंदन (Paradise Lost) हें काव्य विशुद्ध रीतीचें निदर्शक आहे. मिल्टन व वर्ड्स्वर्थ यांच्या या रीतींत उत्कटतेचा अभाव व परिश्रमाची जाणीव दिसून येते. विशुद्ध व विभूषित कला यांतील फरक दाखवितांना तो लिहितो:—"Ornate art is to Pure art what a painted statue is to an unpainted. The extreme opposite to this pure art is what may be called Ornate art. This species of art aims also at giving a delineation of the typical idea in its perfection and its fullness but it aims at so doing in a manner most different. It wishes to surround the type with the greatest number of circumstan-

ces which it will bear. It works not by choice or selection but accumulation and aggregation. The idea is not as in pure style presented with least clothing which it will endure, but with the richest and most involved clothing that will suit (E. C. E. 19th Cen pp. 158-159). विशुद्ध कला ही एकाद्या गोष्टीचें यथातथ्य वर्णन करण्यांत समाधान मानते. तर विभूषित कला ही आधिकाधिक संपन्न व संमिश्र भाषाशैलीचें सहाय्य घेण्यांत संतोष मानते. मिल्टन हा विशुद्ध रीतीचा तर टेनिसन हा विभूषित रीतीचा प्रातिनिधी आहे. बेगहॉटच्या मतें विशुद्ध कला ही विभूषित कलेपेक्षां श्रेष्ठ आहे. विकट रीतीविषयीं तो लिहितो:—" It shows you what ought to be by what ought not be, when complete it reminds you of the perfect image, by showing you the distracted and imperfect image." (P. 475) ब्राउनिंग हा या विकट रीतीचा प्रातिनिधि आहे. विशुद्ध (Pure) व विभूषित (ornate) रीति यांना भारतीय साहित्यशास्त्रांतील अनुक्रमें वैदर्भी व गौडी हे शब्द योजिले असतां चालण्यासारखें आहे.

येथपर्यंत संस्कृत व इंग्रजी काव्यमीमांसकांच्या दृष्टीनें रीतींचा ऊहापोह केला. आतां मराठी काव्यांतलि रीतींचें समीक्षण करूं. आध्यात्मिक युगांतील श्रीज्ञानेश्वर हे वैदर्भी रीतीचें अनुगामी होते. श्रीज्ञानेश्वरींतील ललितकोमल रचनेंत वैदर्भी रीतीचें परमोच्च स्वरूप प्रत्ययाला येतें. एकनाथ, नामदेव, तुकाराम व रामदास यांनीं वैदर्भी रीतीचा स्वीकार केला आहे. मुक्तेश्वरी महाभारतांत वैदर्भी व गौडी यांचें मधुर मिश्रण झालें आहे. मुक्तेश्वरांनीं समासप्रचुर व सहजरुचिर अशी उभय प्रकारची रसानुकुल भाषा योजण्याचें निरुपम चातुर्य व्यक्त केलें आहे. मराठी काव्याच्या आध्यात्मिक युगांत वैदर्भी रीतीला प्राधान्य मिळालें आहे. तथापि अभिजात युगांत गौडी रीति वैपुल्यानें आढळते. या युगांतील बहुतेक कवि पंडित असल्यामुळें पांडित्याचें प्रगटीकरणं किंबहुना प्रदर्शन

करण्यांत त्यांनीं गौडी रीतीचा अवलंब केला आहे. वामनपंडितांची 'वनसुधा' या सारखीं कांहीं प्रकरणें वगळल्यास सर्व कविता गीर्वाणशब्दांनीं समन्वित आहे. त्याचप्रमाणें निरंजनमाधव, सामराज, रघुनाथपंडित, विठ्ठल, नागेश, रामजोशी व मोरोपंत हे कवि गौडी रीतीचे अनुगामी होते. म्हणून मराठी काव्याच्या अभिजात युगांत गौडी रीति प्रभावशालिनी झाली आहे. इंग्रजी राज्य सुरू झाल्यानंतर जे शास्त्री कवि उदयाला आले त्यांच्या मनावर वामन-मयूरांच्या काव्याचा संस्कार झाला होता. त्यामुळें गोडबोले, पारखी, राजवाडे, चिंतामणीपेटकर यांचीं काव्यरीति गौडी आहे. शास्त्रीकवींच्या नंतर देखील वि. वा. भिडे, बा. अ. भिडे, श्री. ना. मुजुमदार, आगाशे, Bee व साधुदास यांच्या काव्यरचनेवर गौडी रीतीची छाप पडली आहे. आधुनिक कविपंचकांतील कवींपैकीं एक गोविंदाग्रज वगळल्यास बाकीच्या चार कवींनीं वैदर्भी रीतीचा स्वीकार केला आहे म्हणून मराठी काव्याच्या अद्‌भुतरम्य युगांत प्रारंभीं गौडी रीतीला व केशवसुती युगांत वैदर्भी रीतीला प्राधान्य मिळालें आहे. मराठीं काव्यांत प्रारंभीं कांहीं काळ सहज रचना व त्यानंतर सालंकार रचना व सालंकार रचनेची प्रतिक्रिया म्हणून पुन्हां सहजरचना असा क्रमशः चढउतार प्रत्येक युगांत आढळतो. पाश्चात्य काव्यशास्त्राच्या दृष्टीनें पाहिल्यास ज्ञानेश्वर मुक्तेश्वर, तुकाराम, बालकवि व चंद्रशेखर हे विशुद्ध रचनेचे; वामन, मोरोपंत, अमृतराय व गोविंदाग्रज हे विभूषित ( ornate ) रचनेचे व रामदास, केशवसुत व माधवज्यूलियन हे विकट ( Grotsque ) रचनेचे प्रतिनिधि मानतां येतील.

रीतींचा उहापोह केल्यानंतर ज्या गुणांवर त्या अधिष्ठित आहेत त्यांचाहि विचार करणें क्रमप्राप्त आहे. काव्यांतील गुणांचा उल्लेख संस्कृत साहित्यांत भरतापासूनचा आहे. त्यानंतर दंडीभामहांनीं त्यांची सविस्तर चर्चा केली आहे. वामनानें त्यांना अधिक पुरस्कार करून त्यानें या

गुणांवर रीति अधिष्ठित आहेत असें आपलें मत व्यक्त केलें आहे. मम्मटानें दहा ही गुणांची संख्या तीनवर आणून ठेविली असून जगन्नाथानें दाही गुणांचें विवरण केलें आहे. कित्येकांनीं कांहीं गुण शब्दांचें व कांहीं गुण अर्थाचें असें गुणांचें दोन प्रकार कल्पिले आहेत. ध्वन्यालोककारांनीं गुण व अलंकार यांत भेद केला आहे. गुण हे शरीर किंवा आत्मा यांत सदैवांतर्गत धर्म आहेत. अलंकारांचें तसें नाहीं. ते बदलतां येतात. संस्कृत काव्यकोविदांनीं श्लेष, प्रसाद, समता, माधुर्य, सुकुमारता, अर्थव्यक्ति, उदारता, ओज, कांति व समाधि असे दहा गुण सांगितले आहेत. तथापि प्रसाद, माधुर्य व ओज हे तीन गुणच प्रमुख असल्यामुळें त्या दृष्टीनें आपण मराठी काव्याचें समालोचन करूं.

प्रसाद हा गुण वैदर्भी रीतीचा आत्मा आहे. प्रसाद याचा अर्थ 'सहज अर्थ प्रतीति होईल अशा शब्दांची योजना' असा आहे. जे प्रसिद्धार्थ आहे ते प्रसादयुक्त (प्रसिध्दार्थम्) अशी दंडीनें प्रसादाची व्याख्या केली आहे. पांडित्यप्रदर्शनासाठीं कवि पुष्कळ वेळां क्लिष्ट व कर्णकटु शब्दांची योजना करतात व त्यामुळें काव्यांत प्रसादाची हानि होतें. तथापि प्रसाद हा गुण सर्वमान्य असल्यानें प्रथितयश कवींच्या काव्यांत हाच गुण सार्वत्रिक प्रत्ययाला येतो. ज्ञानेश्वरींत प्रसाद हा गुण उत्कटतेनें आढळतो. उदाहरणार्थ साधूच्या आत्यंतिक समतेचें वर्णन करतांना ज्ञानेश्वरांनीं लिहिलेल्या "पार्था जयाचिया ठायीं। वैषम्याची वार्ता नाहीं। रिपु मित्रां दोहीं। सरिसा पाडु॥ कां घरिचिया उजेड करावा। परकिया अंधार पाडावा। हें नेणेचि गा पांडवा। दीप जैसा॥ जो खांडावया घाव घाली। कां लावणी जयानें केली। दोघां एकाचि साउली। वृक्ष दे जैसा॥ नातरी इक्षुदंडु। पाळितया गोडु। गाळितया कडु। नोहेचि जेवीं॥ अरिमित्रीं तैसा। अर्जुना जया भाव ऐसा। मानापमानीं सरिसा। होत जाय॥ जो निंदेतें नेघे। स्तुती न श्लाघे। आकाशा नलगे। लेप जैसा॥

साच लटिके दोन्ही । न बोले जाहला मौनी । जो भोगितां उन्मनीं । आरायेना ॥ जो यथालाभें संतोखें । अलाभें न पारुखें । पाउसेवीण ना सुके । समुद्र जैसा ॥ आणि वायूसि एके ठायीं । बिढार जैसें नाहीं । तैसा न धरीच कांहीं । आश्रय जो ॥ हें विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर ॥ किंबहुना चराचर । आपण जाहला ॥ [ ज्ञानेश्वरी. अ. १२; १९७–२१३] " या ओव्या किती प्रसादरम्य आहेत ! मुक्तेश्वरांचें महाभारतहि प्रसादगुणांनीं मंडित आहे. सभापर्वांत द्रौपदीवस्त्रहरणाच्या प्रसंगीं तिनें केलेला कृष्णाचा धांवा पराकाष्ठेचा प्रसादपूर्ण आहे. द्रौपदी म्हणते:— " कृष्णा तूंच जननी । वित्त गोत चक्रपाणी । तुजवेगळा न दिसे कोणी मज निर्वाणी सोयरा ॥ माझें मानससरोवर । प्रेमकल्हारीं सुमनोहर । राजहंस रुक्मिणीवर । सदा स्वानंदें क्रीडतु ॥ आज गेलासि कवणे ठायां । मुक्तमुक्ताफळें चारावया । गोंविलासि म्हणोनि माया । माझी तुवां सांडिली ॥ वृंदावनींचे विहारिणी । कृष्णसखिये सांगातिणी । धांव पाव माय बहिणी । वेळ न लावी स्नेहाळे ॥ कृष्णा तूं स्नेहाळ माउली । तूंचि कृपेची साउली । तुवां उपेक्षा जरी केली । मग जिणें कायसें ॥ वस्त्रें हिरोनिया अवकळा । येथें झालिया गोपाळा । तुझे पाय याचि डोळां । कोण्या मुखें विलोकूं ॥ " (सभापर्व). मुक्तेश्वराप्रमाणेंच एकनाथ, श्रीधर, नामदेव, तुकाराम या कवींची काव्यरचनाहि प्रसादयुक्त आहे. आधुनिक कवींत रे. टिळक हे प्रसाद या गुणांत अग्रेसर आहेत. त्यांच्या कोणत्याहि काव्याला या गुणामुळेंच इतकी कमनीयता प्राप्त झाली आहे. त्यांच्या ' वसंतवर्णन ' या काव्यांतील पुढील ओळी पहा:— " सकलश्रमविरति । हा वसंत म्हणजे पुन्हां सांगतो करमणूक नुसती । हें मूर्त विनोदन सृष्टिसर्वे संगत । हें मनोभावनादर्शामधलें स्मित । हा प्रसाद काव्यामधला कविसंमत । ही सृष्टीवरती । खरोखर ही सृष्टीवरती । नरनारींवरती कृपा प्रभुची केवळ सुखभुक्ती । " मोगरे, कृष्णशास्त्री चिपळूणकर, बालकवि, विनायक व अनंततनय यांची

कविताहि प्रसादगुणानें मनोभिराम झाली आहे. सारांश, मराठी काव्याच्या आध्यात्मिक व अद्‌भुतरम्य या दोन युगांत प्रसादगुणाचा उत्कर्ष दृग्गोचर होतो ,असें म्हणावयास हरकत नाहीं.

प्रसादानंतर आपण माधुर्य या गुणाचा विचार करूं. हा गुण वर्णांच्या विशिष्ट शक्तीमध्यें आहे असें दण्डी, विश्वनाथ व मम्मट यांचें मत आहे. मृदुललित अशा वर्णांच्या रचनेनें श्रवणकोमलता प्राप्त होते. नुसतेंच कोमल नव्हे तर अस्फुट असा अनुप्रास असल्यानें जें सुखावह असें कांहीं प्रतीत होतें तें माधुर्य असें त्यांचें मत होतें. विश्वनाथानें चित्त-द्रवीरूप आल्हाद हेंच माधुर्य होय असें म्हटलें आहे. ( चित्तद्रवीभावमयोह्लादो माधुर्यमुच्यते सा. द. उ. ८, का. १ व पुढें वृत्ति) जयदेवाचें 'गीतगोविंद' हें श्रुतिमनोहर काव्य 'माधुर्य' या गुणाचें मूर्तिमंत उदाहरण आहे. ज्ञानेश्वरींत प्रसादाप्रमाणेंच माधुर्य हा गुणहि ओतप्रोत भरला आहे. " माझा मराठाचि बोल निकें। परी अमृतातेंही पैजा जिंके। ऐसी एकेक अक्षरें रसिकें। मेळवीन " ही प्रातिज्ञा त्यांनीं आपल्या मृदुमंजुमधुर रचनेनें खरी करून दाखविली आहे. मुक्तेश्वर व श्रीधर यांच्या काव्यांतहि माधुर्य हा गुण आढळतो. वामनपंडितांच्या भागवती प्रकरणांत या गुणाचा प्रत्यय येतो. अमृतराय यांचे कटाव व रामजोशी यांच्या लावण्या यांत माधुर्य गुणाची अनुभूति येते. आधुनिक कवींत चंद्रशेखर, बालकवि, दत्त व लेंभे यांची काव्यरचना माधुर्यगुणानें मंडित आहे. बालकवींच्या 'शारदीय सौंदर्यदेवता' या कवितेंतील पुढील ओळी पहा:— 'प्रभातकाळीं काव्यदेवता सोज्ज्वल गगनांत। उदयाचलिं परिधान करुनिया पीतांबर येत। मुकुट कळ्यांचा शिरीं उषेचें सिंहासन केलें। हालवीत कचभार सृष्टिचें उत्थापन बोले॥ पिकलीं शेतें मंद वायुनें आंदोलन घेतीं। सौंदर्याच्या मूर्त देवता वनमाला होती॥ निर्झरिणी या मुक्तमण्यांचें घेउनि भांडार। विमल सैकतामधुनि हालतां चमचमती फार "॥ चंद्रशेखरांच्या

'गोदा-गौरव' या काव्यावरून त्यांच्या काव्यांतील निरुपमेय नादमाधुर्याची कुणालाहि प्रतीति येईल. सारांश, प्राचीन कवींत ज्ञानेश्वर व अर्वाचीन कवींत चंद्रशेखर हे माधुर्य या गुणांत श्रेष्ठ कवि आहेत.

प्रसाद व माधुर्य यांनंतर ओजस् या तिसऱ्या प्रमुख गुणाचा विचार करणे क्रमप्राप्त आहे. 'ओजस्समासभूयत्वं एतद्गद्यस्य जीवितम्' [ का. द. परि. १ श्लोक ८० ] अशी दंडीनें ओजाची व्याख्या केली आहे. ओज हा गुण समासबहुलतेमुळें प्राप्त होतो. केवळ मोठेमोठे वर्णच नव्हे तर कठोर वर्ण जोडाक्षरें असल्याशिवाय लेखनास जोर येत नाहीं; व हा जोरदारपणा हा या गुणाचा प्रमुख विशेष आहे. वामनाच्या मते गाढ-रचना म्हणजे ओज होय ( गाढबन्धत्वमोजः— वामन ३-१-५ ). गौडी-रीतीचा जे कवि स्वीकार करितात त्यांच्या काव्यांत हा गुण अधिक आढळतो. श्रीज्ञानेश्वरीच्या अठराव्या अध्यायांतील मंगलाचरणाच्या ओव्या या ओजोगुणनिदर्शक आहेत. उदाहरणार्थः— " जयजयदेव विमळ। निजजनाखिलमंगळ। जन्मजराजलदजाळ। प्रभंजन ॥१॥ जयजयदेव प्रबळ। विदाळितांमंगळकुळ। निगमागमद्रुमफळ। फलप्रद ॥२॥ जयजय देव सकळ। विगतविषयवत्सल। कलितकलाकौतूहल। कालातीत ॥३॥ जयजयदेव निश्चळ। चालिताचित्तपानतुंदिल। जगदुन्मीलनाविरल। केलि-प्रिय ॥४॥ जयजयदेव निश्चळ। स्फुरदमंदानंदबहळ। नित्यनिरस्ताखि-ळमळ। मूळभूत ॥५॥ " ( ज्ञानेश्वरी अ. १८ ओं. १-५ ). मुक्तेश्वर व मोरोपंत यांच्या महाभारतांत ओजोगुणाचा मनोज्ञ विलास प्रत्ययाला येतो. विशेषतः मोरोपंतांची रचना संस्कृत-प्राकृतमिश्रित व समासघटित अस-ल्यामुळें ती या गुणाला अनुकूल आहे. आधुनिक कवींत श्रीपाद नारायण मुजुमदार, साधुदास व राधारमण यांच्या कथनपर काव्यांत हा गुण आढळतो. साधुदासांच्या रणविहारांत या गुणाचा उत्कट उत्कर्ष झाला असून राधारमणाच्या " हिमालयवर्णन " या काव्यांतहि हा गुण आढळतो.

सावरकरांची 'कमला' व 'गोमांतक' हीं काव्यें ओजोगुणामुळेंच आकर्षक वाटतात. तथापि आधुनिक काव्यांत ओजोगुणाचा विलास फारसा आढळून येत नाहीं, असें म्हणावयाला हरकत नाहीं.

रीति व गुण यांनंतर आपण वृत्तांचा विचार करूं. काव्याला पद्याचे बंधन असावें कीं नाहीं याविषयीं दोन मतें आढळतात. कांहीं जणांच्या मतें काव्याला पद्याची अवश्यकता नाहीं. रसात्मकता हा काव्याचा गाभा असल्यामुळें तो पद्याप्रमाणेंच गद्यांतहि प्रत्ययाला येतो. बाण, रास्किन व प्रा. परांजपे यांच्या गद्यांत कित्येक कवींच्या काव्यांत आढळणार नाहीं इतका काव्याचा विलास आढळतो. म्हणून काव्यनिर्झरिणीनें पद्याच्या पाटांतून वाहण्यापेक्षां गद्याच्या गिरिकंदरांतून विहार करणें हेंच श्रेयस्कर नव्हे काय? पण हें मत सर्वमान्य होणारें नाहीं. कारण जगांतील कविता-कामिनी ही पद्याच्या पुष्पवाटिकेंतच विहार करीत, असें आढळतें. म्हणून छंदाचें बंधन हे कवीला त्रासदायक न वाटतां उलट आनंददायक वाटतें. सिड्नें (Sidney) हे पाश्चात्य टीकाकार आपल्या "An Apology For Poetry" या निबंधांत म्हणतात: "It is already said it is not rhyming and versing that maketh Poesy. One may be a poet without versing and a versifier without Poetry (E. C. E. 16th, 17th & 18th Cen. p. 37)" केवळ पद्यात्मक रचना करणारा कवि होऊं शकत नाहीं, हें खरें; असें सांगून तर्कशास्त्र, गणित, व्याकरण इत्यादि शास्त्रेंहि पद्यांत ग्रथित केलेलीं असतात असें हा लेखक म्हणतो. या निबंधाच्या शेवटीं, "So that verse being itself sweet and orderly and best for memory that only handle of knowledge, it must be in jest that any man make can speak against it." पद्य हें मधुर व्यवस्थित व स्मृतिसुलभ असल्यामुळें तें काव्याला अनुकूल आहे असा सिड्नें यांनीं निष्कर्ष काढला आहे. डॅनियल (Danial) हे आंग्ल-काव्यमीमांसक लिहितात: "All verse is but a frame of words,

confined within certain measures, differing, from ordinary speech and introduced the better to express men's conceits, both for delight and memory ( English Critical Essays 16th, 17th & 18th Cen. p. 74). " पद्य ही गद्यापेक्षां वेगळीं अशी शब्दांची विशिष्ट जुळणी असून ती आल्हादक असते. अरिस्टॉटलनें म्हटल्याप्रमाणें ही पद्यरचना सर्व राष्ट्रांना प्रारंभापासून परिचित आहे. न्यूमननें (New-man) आपल्या 'Poetry' या निबंधांत हेंच मत व्यक्त केलें आहे. तो लिहितो: "A metrical garb has in all languages, been appropriated to poetry. It is but the outward development of the music and harmony within. The verse from being a restraint on the true poet is the suitable index of his sense and is adopted by his free and deliberate choice. " पद्य हें कविच्या मनांतील सुसंवादित्व व सौष्ठव यांचें प्रतीक आहे. तें खऱ्या कवीला अडथळा करीत नाहीं म्हणून कवि त्याचा स्वयंस्फूर्तीनें स्वीकार करितात. ले. हंट म्हणतो: " Verse is the final proof of the poet that his mastery over his art is complete ( C. E. C. p. 326 ). " पद्य हें कवीच्या कलाप्रभुत्वाचें निदर्शक आहे. सारांश, पद्य हें काव्याचें सौंदर्य वृद्धिंगत करणारें आनंददायक बंधन आहे. इतकेंच नव्हे तर सौदर्य सुसंवादित्व, स्मरणसुलभता, सुखप्रदता व सौष्ठव या दृष्टीनें तें काव्याला आवश्यक आहे, असा निष्कर्ष काढतां येईल.

मराठी काव्यगंगेचा उगम ओंवीच्या गंगोत्रींतून झाला आहे. ओंवी हें मराठीं भाषेंतील पहिलें वृत्त होय. ओंवी हा छंद दहाव्या शतकापासून माहाराष्ट्रांत प्रचलित असावा. ओंवी हा शब्द 'ओवणें' या धातूपासून झाला असून संस्कृतांतील अनुष्टुभाचेंच तें प्राकृत रूप असावें. अनुष्टुभाप्रमाणेंच हा छंद रचनासुलभ असून त्याला अक्षरमात्रांचें फारसें बंधन नसल्यामुळें प्राचीन कवींनीं या छंदाचा विपुलतेनें उपयोग केला आहे. ओंवी या छंदांत तात्त्विक व रसात्मक अशी उभयप्रकारची रचना झाली

आहे. महानुभवी पंथांतील वत्सहरण, शिशुपालवध, रुक्मिणीस्वयंवर व उध्दवगीता हे ग्रंथ ओंवी छंदांतच आहेत. पण ज्ञानेश्वरांच्या 'ज्ञानेश्वरींतील ओंवीरचना ही प्रमाणबद्ध, प्रसन्न व प्रलोभनीय आहे. ज्ञानेश्वरांच्या भाषेत सानुप्रास सौष्ठव असल्यामुळें त्यांच्या ओंवीला सुखदरम्य हृदयंगमत्व प्राप्त झालें आहे. एकनाथांची ओवी दीर्घ असून साडेचार चरणांची आहे. मुक्तेश्वरांची ओंवी प्रौढ व पल्लेदार आहे. महिपतींची ओंवी जितकी सहजसुलभ तितकीच श्रीधरांची ओवी मृदुमधुर आहे. ज्ञानेश्वर, मुक्तेश्वर, श्रीधर, महिपति व वामन यांची ओवीरचना पाहिल्यास कोणताहि रस ओवीछंदांत आविष्कृत करितां येतो याची प्रतीति येते. आधुनिक काव्यांत ओंवी छंदांत थोडी कविता आढळते. हंसराजांची ग्रंथरचना ओंवींत असून दासगणूनीं आपली चरित्रात्मक कविता याच छंदांत लिहिली आहे. अनंततनयांच्या 'तिलकविजयां' तील ओंवी सरळ व सरस आहे. दासगणूंच्या ओंवीवर महिपतीची व अनंततनयाच्या ओंवीवर श्रीधरांची छाया पडली आहे. अर्वाचीन काळांतील पंडितकवींचा ओढा संस्कृतसाहित्याकडे असल्यामुळें त्यांनी या छंदाचा अवलंब केला नाहीं. ओंवीप्रमाणेंच अभंग हाहि प्राचीन काव्यांतील लोकप्रिय छंद आहे. ज्ञानेश्वर, नामदेव, तुकाराम इत्यादि संतांची काव्यरचना अभंगांतच आहे. तुकारामाच्या काव्यांत भावना व विचार यांचें वैचित्र्य आढळत असून त्यांनींच अभंग हा छंद पूर्णतेला नेला. ओंवीप्रमाणेंच अभंगांतहि अर्वाचीन कवींनीं फारशी रचना केलेली नाहीं. रे. टिळकांची अभंगांजलि ही नामदेवांच्या अभंगांशीं स्पर्धा करण्याइतकी सहज आहे. याच ठिकाणीं पाठक, गिरीश, अनंततनय यांच्या अभंगरचनेचा उल्लेख करावयाला हरकत नाहीं. सारांश, मराठी काव्याच्या आध्यात्मिक युगांत ओंवी व अभंग या छंदांत विविध-प्रकारची काव्यरचना झाली आहे.

तथापि, मराठी काव्याच्या अभिजात युगांत आर्या व श्लोक या अक्षरगणात्मक वृत्तांचे प्राधान्य दृग्गोचर होतें. संस्कृत भाषेत निष्णात असलेल्या विदग्ध कवींनीं ओंवी व अभंग यांचा त्याग करून अक्षर-गणात्मक वृत्तांतून आपली कविता लिहिली. मुक्तेश्वरांचे रामायण श्लोकबद्ध असलें तरी वामनपंडितांनींच सुश्लिष्ट श्लोकरचना करून 'सुश्लोक वामनाचा' ही यथार्थ कीर्ति संपादन केली. एकाच काव्यांत रसानुकूल अशी अनेक प्रकारची वृत्तयोजना करण्याची शैली सामराज, नागेश, विठ्ठल व रघुनाथ पंडित यांच्या काव्यांतहि आढळते. या सर्व कवींनीं रामायण व भागवत यांतील कथानकांवर कविता लिहिल्यामुळें तिला रंजकता येण्यासाठीं या प्रगल्भ श्लोकरचनेचा पुष्कळ उपयोग झाला आहे. त्याच-प्रमाणें 'अद्‌भुतरम्य युगांतील' शास्त्री कवींच्या काव्यांत श्लोकरचना वैपुल्यानें आढळतें. चिपळुणकर, पारखी, लेंभे, चंद्रशेखर व भिडेद्वय इत्यादि कवींची कविता श्लोकबद्ध आहे. कथनपर काव्याला प्रवाहित्व व प्रसन्नता हे गुण प्राप्त होण्याला ही धांवती श्लोकरचना उपयुक्त झाली आहे. सुश्लोक जसा वामनाचा तशीच 'आर्या मयूरपंताची' असें जे रामबडवे यांनीं म्हटले आहे तें अगदीं यथार्थ आहे. मोरोपंतांच्या पूर्वी रघुनाथपंडितांच्या नलदमयंती-स्वयंवरांत तीन आर्या आढळतात. पण आर्यावृत्ताला वैचित्र्य व वैपुल्य यांचा लाभ जर कुणी करून दिला असेल तर तो मोरोपंतांनींच होय. म्हणून त्यांनीं "प्रगटी प्रथम भगीरथ नृपलोकीं सुरनदीस ती आर्या । तसि हे मयूर नाहीं तर सर्वांना न दिसती आर्या" असें अभिमानोद्‌गार काढले आहेत. मयूरांच्या मनोज्ञ आर्येनें मोहित केल्यामुळेंच विठ्ठल केरीकर, ढवळे, चिंतामणी जोशी यांनीं आपली कविता आर्यावृत्तांत लिहिली. शास्त्रीकवींत गणेशशास्त्री लेले, कुरुंदवाडकर प्रभृतींची कविता आर्यावृत्तांत आढळते. तथापि अर्वाचीन कवींत मोगरे यांनाच 'आर्यापति' असें मानलें जातें. त्याचप्रमाणें, विनायक श्री. ना. मुजुमदार, बा. अ. भिडे

अनंततनय, आगाशे व माधवानुज यांनीं आर्यावृत्ताचा अवलंब केला आहे. सारांश, मराठी काव्याच्या अभिजात व अद्भुतरम्य या युगांत श्लोक व आर्या यांचा प्रामुख्यानें व प्राचुर्यानें स्वीकार झालेला आहे.

प्राचीन काव्यांत साकी, दिंडी, सवाई, कटाव व लावणी हीं मात्रावृत्तें आढळतात. मोरोपंतांच्या ' पृथुपोख्यानांत, साकी वृत्त असून चिंतामणीचें ध्रुवाख्यान दिंडी वृत्तांत लिहिलें आहे. आनंदतनय, विठ्ठल यांनीं 'सवाई ' हें प्रदीर्घ मात्रावृत्त वेळोवेळीं योजिले आहे. अमृतरायांचे कटाव यमकानुप्रासमंडित असून शाहिरांनीं ललितमोहक लावण्यांचा उपयोग केला आहे. आधुनिक काव्यांत साकी व दिंडी हीं वृत्तें अत्यंत लोकप्रिय झालीं आहेत. कृष्णशास्त्री चिपळूणकर ( मेघदूत ), रेंदाळकर ( मोहिनी ), अनंततनय ( शारदादूतिका), यशवंत व गिरीश या कवींनीं आपलीं खंडकाव्यें साकी जातींत लिहिलीं आहेत. प्रा. चापेकर यांनीं म्हटल्याप्रमाणें साकी हे वृत्त ' सहजौघी, प्रदीर्घ, खंडात्मक, निवेदनानुकुल व मृदुमंजुनादमाधुर्ययुक्त ' ( स्वनितांजलि-प्रस्तावना. पृ. १२ ). असल्यामुळें अर्वाचीन कवींनीं या विलोभनीय वृत्तांत विपुल काव्यरचना केली आहे. दिंडी हेहि नादमधुर वृत्त असून टिळक, मायदेव, चंद्रशेखर यांनीं या वृत्तांत रचना केली आहे. शाहिरांची छाप आधुनिक काव्यावर असली तरी कटावात्मक अशी फारसी रचना झालेली नाहीं. विशेषतः, गोविंदाग्रज, दत्त, Bee, विनायक व बालकवि यांच्या कवितेवर शाहिरांची छाप दिसून येते. सारांश, मराठी काव्याच्या अभिजात युगांत मात्रावृत्तात्मक रचनेला प्राधान्य मिळालेलें आहे.

प्राचीन मराठी वाङ्मयांत पद्यात्मक गेय अशी स्फुटरचना वैपुल्यानें आढळते. श्रीज्ञानेश्वरापासून तो मोरोपंतापर्यंत होऊन गेलेल्या कवींनीं स्फुट पदें लिहिलीं आहेत. त्यांचीं पदें आध्यात्मिक, श्रीकृष्णचरित्रपर, श्रीरामचरित्रपर, गणेश, विठ्ठल, शिव व दत्त यांच्या स्तुतिपर अशी विविध प्रकारचीं आहेत. त्यांत रचनेची शिथिलता असली तरी चालीचें

वैचित्र्य आहे. मुकुंदराजप्रभृति प्रसिद्ध कविव्यतिरिक्त कान्होबा, केशवस्वामि, शामसुंदर, कृष्णदास, रमणतनय, विठ्ठलनाथ, रामकृष्ण, रामकवि, कृष्णकिंकर, अवधूत, गिरिधर, शामात्मज, चिन्मयनंदन, गोविंद, देवनाथ व दयाळनाथ या कवींनीं अगणित पदें लिहिलीं आहेत. या पदांतून संगीतानुकुल नादोत्कटता अनुभवाला येते. प्राचीन कवींच्या पद्यरचनेची कल्पना येण्याला पुढील विश्वनाथ कवींचें पद उद्धृत करितों:—

राधिकेचा रंग पाहुनि कृष्ण दंग जाहला ॥ ध्रु. ॥
वेणीफणी करुनि भांग । काजळकुंकु ल्यालि चांग ।
गोरे अंग चोळि तंग । दाखवी श्रीहरिला ॥१॥
राधिकेचा झकाझोक । कृष्ण पाहुनि लावी नोक ।
जरी पातळाचा झोंक । पदर सांवरीला ॥२॥
कृष्ण पाहुनि झाली वेडी । हंसतची नेत्र मोडी ।
विठ्ठलनाथ भक्त गडी । चरणी रंगला ॥३॥

—अनेक कविकृत पदसंग्रह भा. २ पृ. ३२

आधुनिक कवींत शास्त्रीकवींची रचना भाषांतरित व कथनपर असल्यामुळें त्यांनीं मात्रावृत्तात्मक अशी पद्यात्मक रचना फारशी केली नाहीं. पण अण्णासाहेब किर्लोस्कर यांचीं नाटकें रंगभूमीवर आल्यापासून त्या नाटकांतील कर्णमधुर पदें लोकांच्या रसनाग्रावर नृत्य करूं लागलीं; व त्यामुळें त्या नाटकांतील चालींचा तत्कालीन कवींनीं स्वीकार केला असल्यास त्यांत नवल नाहीं. गोविंदराव कानिटकर यांच्या स्फुट काव्यांत अशी पद्यरचना आढळते. केशवसुतांनीं भावगीतांचा संप्रदाय प्रचलित व प्रिय केल्यानंतर अशाप्रकारची पदरचना भावगीताला अनुकुल वाटूं लागली व नवीन चाली उदयाला आल्या. गोविंदाग्रज व बालकवि यांनीं चंद्रकांत अक्रुर या जातींत पुष्कळ कविता लिहिली आहे. टेकाडे, यशवंत, गिरीश या काव्यगायनांत निपुण असलेल्या कवींनीं पुष्कळ चाली लोकप्रिय केल्या.

केशवसुतांच्या नंतर सुनीतांतहि पुष्कळ रचना झाली असून माधवज्यूलियन यांनीं गज्जलांची शास्त्रशुद्ध रचना केली. तांबे यांनी काव्याला संगीताची जोड मिळवून देण्याचें स्पृहणीय कार्य केलें. अशाप्रकारें मराठी काव्याच्या अद्‌भुतरम्य युगांत भावगीतांच्या प्रभावामुळें पद्यात्मक रचनेंत पराकाष्ठेचें वैचित्र्य प्रत्ययाला येते.

काव्याच्या वेषभूषपैकीं आतां आपण अलंकाराचा विचार करूं. संस्कृतसाहित्यांत अलंकारांचें महत्त्व अतोनात आहे. यामुळें अलंकार या एकाच काव्यांगावर अनेक ग्रंथ झाले आहेत. उद्‌भटाचा ‘ काव्यालंकार संग्रह ’ व रुय्यकाचें ‘ अलंकार सर्वस्व ’, ‘ कुवलयानंद ’ हे ग्रंथ केवळ अलंकारचर्चेलाच वाहिले आहेत. संस्कृतवाङ्मयाच्या उत्तरकालांत नैषधीय, विक्रमांक चरित, राघवपांडवीय व शिशुपालवध या काव्यांत अलंकाराचें प्राधान्य दृग्गोचर होतें. रस हा काव्याचा आत्मा असला तरी अलंकाराच्या सहाय्याशिवाय त्याचा हृदयस्पर्शी परिपोष होऊं शकत नाहीं. या दृष्टीनें अलंकारांचे महत्त्व नाकारतां येणार नाहीं. “ काव्यशोभाकरान् धर्मान् अलंकारान्प्रचक्षते”– काव्यास शोभा आणणारे जे धर्म ते अलंकार होत– अशी दंडीने अलंकाराची व्याख्या केली आहे. अलंकारांत चमत्कृति व चारुता हे विशेष असले पाहिजेत. जयरथानें म्हटल्याप्रमाणें ‘ कविप्रतिभात्मकत्व ’ असल्याखेरीज अलंकाराला रम्यत्व प्राप्त होत नाहीं. संस्कृत साहित्यांत अलंकारांचें सूक्ष्म वर्गीकरण करण्यांत पराकाष्ठेचें बुद्धिचातुर्य प्रगट झालें आहे; व त्यामुळें त्यांच्या संख्येंतहि अतोनात वाढ झाली आहे. वस्तुजाताचें परस्परांमधील केवळ कविकल्पनेस गम्य असलेलें साम्य निदर्शित करून रम्य अर्थाची निष्पत्ति करणें हा अभिजात कवींचा हृद्य व्यापार आहे. अलंकार हे कल्पकता, कमनीयता व कृत्रिमता यांनीं मंडित असतात असें म्हणावयास हरकत नाहीं. प्राचीन कवींत ज्ञानेश्वर, मुक्तेश्वर

व मोरोपंत यांचा काव्यकलाप अलंकारांनीं संपन्न आहे. अर्वाचीन कवींत पारखी, गोविंदाग्रज व चंद्रशेखर यांची कविता अलंकारांनीं समन्वित आहे.

मराठीवाङ्मयांत यमकाविषयीं एकेकाळीं वादाचीं रणें माजलेलीं होतीं. म्हणून याच ठिकाणीं यमकाविषयींहि विवेचन करणें क्रमप्राप्त आहे. यमक हा शब्दालंकार असून तो वेदांतहि आढळतो. यमक या शब्दाची व्युत्पत्ति यम ओढणें, ताणणें अशी आहे. यावरून ज्यांत शब्द पुन्हां ओढले जातात किंवा ताणले जातात तें यमक होय असे म्हणावयास हरकत नाहीं. भरतानें ' शब्दाभ्यासं तु यमकं पादादिषु विकल्पितम् ( ना. शा. १६–५९ ) अशी यमकाची व्याख्या केली आहे. चरणाच्या शेवटीं शब्द पुनरावृत्त होणें म्हणजे यमक होय. भामहानें मध्यें अगर आरंभीं, ' तुल्यश्रुतीनां भिन्नानामभिधेयैः परस्परम् । वर्णानां यः पुनर्वादो यमकं तन्निगद्यते. (भा. ल. १.१७).– अशी यमकाची व्याख्या केली आहे. यमकाला तीन अगर अधिक वर्ण तुल्यश्रुति असून अर्थानें भिन्न असले पाहिजेत, अशी वर्णांची पुनरावृत्ति म्हणजे यमक अशी भामहाची कल्पना आहे. सारांश, भिन्नार्थक अक्षरें अनुक्रमाने येणें याला यमक असें म्हणतात ( खंड १० पृ. १७४ ) असें श्री. न. चिं. केळकर यांनीं म्हटलें आहे. भरतानें यमकाचें पादांत, कांची, समुद्र, विक्रांत, चक्रवाल, संदष्ट, पादादि, आम्रोडित, चतुर्व्यवसित व माला असे दहा भेद केले आहेत. या माला यमकांतून पुढें अनुप्रास या अलंकाराची निष्पत्ति झाली. भामहानें ' सरूपं वर्णविन्यास मनुप्रासः प्रचक्षते ( भा. ला. २. २५ )– सारख्या वर्णांची जुळणी म्हणजे अनुप्रास होय असें म्हटलें आहे. मम्मटानें ' वर्णसाम्या-नुप्रासः ' ( का. प्र. ९. १०४ ) अशी अनुप्रासाची व्याख्या केली आहे. सारांश, यमक व अनुप्रास हे औचित्यपूर्वक योजिले असतां काव्याचें सौंदर्य वृद्धिंगत करणारे अलंकार आहेत.

प्रारंभापासूनच मराठी कविता ही यमकांनीं विभूषित आहे असें

म्हणावयाला हरकत नाहीं. मुकुंदराजापासून तो रामजोशापर्यंत निर्माण झालेल्या कवितेंत यमकरचना सर्वत्र आढळते. ज्ञानेश्वर, एकनाथ व नामदेव यांच्या ओंवी अभंगांत एकाक्षरी यमक साधलें आहे. पण बव्हक्षरी यमकरचनेचा प्रघात कोणी पाडला याविषयीं विष्णुशास्त्री चिपळुणकर व वामनदाजी ओक यांच्यांत मोठी खंडाजंगी झाली होती. हा बव्हक्षरी यमकरचनेचा मान वामनाला द्यावा असें निबंधमालाकारांचें मत होतें. पण विठ्ठल, नागेश प्रभृति कवि वामनाच्या समकालीन असल्यामुळें हा मान एकट्या वामनाला देणे हें अन्यायमूलक आहे असें ओकांचें म्हणणें होतें. तथापि पांगारकरांनीं म्हटल्याप्रमाणें ‘ विठ्ठल, आनंदतनय, वामन व नागेश या चौघांसही बव्हक्षरी यमकें मराठींत आणल्याचा मान देऊन हा वाद मिटावावा हें बरें दिसतें ( मोरोपंत चरित्र पृ. ५३२ ) वामनांच्यापूर्वी पांच सहा अक्षरीं यमकें विरलत्वानें आढळतात म्हणूनच मोरोपंतांनीं ‘ अन्यत्र नसे कवनीं यांवे रस सर्व हा नियम कांहीं। केली भाषाकवि जे त्यांची तो गर्वहानि यमकांहीं असें वामनाविषयीं गौरवोद्गार काढले आहेत. वामनानंतर आनंदतनयांची यमकरचना चांगली आहे व मोरोपंतांनीं ती पराकोटीला पोचविली; अनेकाक्षरी यमक साधाण्याच्या अतिरिक्त हव्यासामुळें यांनीं अनौचित्य, कृत्रिमता इत्यादि दोषहि स्वीकारले. त्यांचें यमकाच्या परमावधीचें—

अनल समीहित साधी राया! वारा महीवरा! कामा! ।
अनलस मीहि तसा धीरा! यावा रामही वराका मा! ॥

हें उदाहरण उल्लेखनीय आहे. पण मोरोपंत हे उत्कृष्ट भाषाप्रभु असल्यानें त्यांचीं पुष्कळ यमकें अर्थपूर्ण व आल्हादक आहेत. एकंदरींत संत, पंडित व शाहीर या तिन्ही प्रकारच्या कवींनीं सार्वत्रिक सयमक रचना केली आहे. अर्वाचीन कवींतहि शास्त्री कवींच्यापुढें वामनमयूरांचा

कित्ता पुढें असल्यामुळें त्यांची कविता सयमक आहे. आधुनिक काव्यांतहि यमकाच्या परमावधीच्चीं उदाहरणें पुष्कळच आढळतात; त्यांतील कांहीं उदाहरणें पहा:—

हरित सन्नग मंडन मानस । हरित–सन्नग–मंडन–मानस ।
सुरस–सरस–सार–समाकुला । सुरस सार ससारस–माकुला ॥
सुरसाधरावरी ते शिवा सुकुतुका गिरीश जाया हो ।
सुरसाधरा वरीते शिवास कुतुका गिरीश जाया हो ॥
धरा धराया महती समान । धराधरा या मह तीसमान ।
धरा धराया महतीस मान । धराधरा या मह ती समा न ॥

राधारमण— काव्यदोहन पृ. ३७१-७२

लोलोल्लोलीं लोलल्लोल लीलेलोला ललालिला ।
लोल–लालि–ललाऽ लीला ऽ ली–लालाला ललालि ले ॥ ४३ ॥
रसा ऽ रसा ऽ सार – सार – सार – सारसा ।
रसा – सारास – सार – सार – सरा – रसा ॥४९॥

—साधुदास वनविहार पृ. १२२–१२३

अशाप्रकारच्या या यमकातिरेकानें कविता किती क्लिष्ट होते हें सांगावयाला नकोच. तात्पर्य यमकांची मोहिनी प्राचीन व अर्वाचीन सर्व कवींवर सारखीच पडलेली दिसून येते.

अशाप्रकारें यमकांचा अतिरेक झाल्यावर त्याविरुद्ध प्रतिक्रिया होणे, हें स्वाभाविक आहे. इंग्रजीवाङ्मयांत मिल्टननें यमकाविषयीं, 'rhime being no necessary adjunction or true ornament of poem a good verse, in longer works especially but the invention of a barbarous age to set off wretched matter and lame metre." असे उद्गार काढून आपलें ' Paradise Lost ' हें महाकाव्य निर्यमक लिहिलें आहे. आंग्लभाषेंत निर्यमक कविता वैपुल्यानें आढळते. बंगाली

कविता ही प्रारंभापासून सयमक असून मधुसूदन दत्त यांनीं निर्यमक काव्य लिहिण्याची प्रथा पाडली. त्यांचे 'तीलोत्तमा' हे काव्य १८६० सालीं प्रसिद्ध झालें. त्यावेळीं त्यांचा पुष्कळ उपहास झाला पण त्यांनीं 'मेघनादवध' हे महाकाव्य लिहून बंगाली भाषेत निर्यमक कविता दृढमूल केली. गुजराथी कवींपैकीं कलापी यांनीं निर्यमक कविता लिहिली असून मैथिली शरणगुप्त यांनीं हिंदी भाषेत निर्यमक कविता लिहिली आहे. अशा-प्रकारे निरनिराळ्या भाषेत निर्यमक कवितेचे प्रयोग झाले असले तरी मराठी भाषेत रेंदाळकरांनीं तशाप्रकारच्या काव्यरचनेला प्रारंभ केला. रेंदाळकर म्हणतात, "प्रासानुप्रास पुष्प यमकें, दाम यमकें, चार-सहा अक्षरांचीं अंत्य यमकें यांनी कदाचित भाषा ठसकेदार दिसूं शकेल पण केवळ शेवटल्या एकाद्याच अक्षराच्या अनुवृत्तीनें भाषेंत सौंदर्याचा कळस होतो किंवा अशा प्रकारांनीं रसाचा परिपोष होतो असें मला वाटत नाही. यमकें रसनाशक आहेत असे जरी माझे मत नसले तरी त्यामुळे प्रति-पादित विषयांत कांहीं अपूर्व माधुर्य उत्पन्न होतें असे मला वाटत नाहीं. 'कोकिलास' या कवितेतहि त्यांनीं "अनंतबंधनजालीं हो कां कविचें प्रतिभाबल व्यक्त। लहरिविलास स्वैर दिसावें कों नळाच्या पाण्यांत" (रेंदाळकरांची कविता भा. १ पृ. २०९) असे उद्गार काढले आहेत. यमकांचें बंधन त्यांना अनवश्यक वाटल्यामुळे त्यांनीं पुष्कळच निर्यमक कविता लिहिली. रेंदाळकरांना नागेश हें अनुयायी मिळाले व 'लीला प्रौढवयांत नूपुरझणत्कार त्रपा देतसे' असा फणसे यांनीं निर्यमक कवितेचा अर्ज सुनावला आहे.

तथापि रेंदाळकरांचा हा निर्यमक कवितेचा प्रयत्न यशस्वी झाला असें म्हणवत नाहीं. यमकाचा अतिरेक करणें अयोग्य असलें तरी एक दोन अक्षरीं यमकें काव्याला शोभादायक होतात. डॅनियल (Daniel) म्हणतो: 'For sure in an eminent spirit, whom Nature hath

fitted for that mystery, Rhyme is no impediment to his conceit, but rather gives him wings to mount and carries him...to a far happier flight, यमकामुळें नवीन कल्पना सुचतात असें ड्रायडननें कबूल केलें आहे म्हणून यमकाचा सर्वस्वी त्याग करण्यापेक्षां प्रत्येक चरणाच्या शेवटीं यमक साधणें हेंच श्रेयस्कर आहे. 'मराठी यमक व कविता' या विद्वत्ताप्रचुर लेखांत श्री. केळकर यांनीं म्हटल्याप्रमाणें 'अगदीं निर्यमक अशी कविता करावयाची नाहीं व दुसरे पक्षी यमकांच्या जाळयांत गुरफटून जाऊन कृत्रिमपणामुळें नासाडीहि करावयाची नाहीं. तर दोहोंमधून मार्ग काढून यमकादिकांच्या दोषांचो बाधा न होऊं देतां त्यांचा फायदा तेवढा करून घ्यावा हाच मार्ग श्रेयस्कर दिसतो.' या केळकरांच्या मताला गोविंदराव कानिटकर यांनीं अनंततनय यांच्या 'शारदादूतिका' या काव्याला लिहिलेल्या प्रस्तावनेंत पुष्टी दिली आहे. इतकेंच नव्हे तर, रेंदाळकरांची समयक कविताच सरस उतरली आहे; व 'डाकवाला' यासारखी निर्यमक कविता नीरस वाटते. त्यांना अनुयायांची संख्याहि फारसी मिळाली नाहीं. सारांश, निर्यमक कविता (Blank verse) हा रचनाप्रकार मराठी कवितेची परंपरा व प्रकृति यांना सर्वस्वी प्रतिकूल असल्यामुळें मराठी भाषेंत तो प्रिय व प्रचलित होऊं शकला नाहीं व होणें शक्य नाहीं असा निष्कर्ष काढतां येईल.

येथपर्यंत मराठी काव्याच्या वेषभूषेविषयीं सविस्तर विवेचन केलें. त्यावरून मराठी काव्यांत रीति, गुण व अलंकार यांत कसें परिवर्तन होत गेलें याची वाचकांना कल्पना येईल. व्याकरणाच्या दृष्टीनें प्राचीन काव्यापेक्षां अर्वाचीन कविता अधिक शुद्ध आहे. अर्वाचीन काळांत गौडीपेक्षां वैदर्भी रीतीचा स्वीकार झाला असून गणवृत्तापेक्षां मात्रावृत्तें अधिक लोकप्रिय झालीं आहेत. बव्हक्षरीं यमकें साधण्यापेक्षां एक-दोन अक्षरीं अन्त्ययमकें साधण्याकडे कवींचें विशेष लक्ष आहे. मोरोपंताप्रमणें आपल्या भाषा-

वैभवाचें प्रदर्शन करण्यापेक्षां प्रसादयुक्त भाषेनेंच काव्याची सजावट करण्याकडे आधुनिक कवींनीं लक्ष पुरविलें आहे. केशवसुतांसारख्या कांहीं कवींनीं शब्दरचनेकडे दुर्लक्ष केलें असलें तरी एकंदरींत काव्याच्या वेषभूषेकडे आधुनिक कवींनीं साक्षेपानें लक्ष पुरविलें आहे. रेंदाळकरांनीं निर्यमक कवितेचा केलेला प्रयोग अयशस्वी झाला असून वैणिक व कथात्मक कावित सयमकच लिहिलेली प्रत्ययाला येते. भाषासौंदर्याच्या दृष्टीनें ज्ञानेश्वर, मुक्तेश्वर, मोरोपंत, चंद्रशेखर व बालकवी यांची कविता विशेष आदरणीय व अनुकरणीय आहे. सारांश, प्राचीन व अर्वाचीन काळांतील प्रतिभाशाली सत्कवींनीं मराठी कवितारतीची वेषभूषा इंद्रधनुष्याप्रमाणें आकर्षक केली आहे यांत शंका नाहीं.

# प्रकरण सातवें

## मराठी काव्यांतील रचनावैचित्र्य

On what ground should a poet claim admiration If his art is true and his counsel sound.

And if he brings help to a nation by making men better in some respect.

—*Euripides.*

मराठी काव्याच्या वेषभूषेचें मागील प्रकरणांत समालोचन केलें व काव्याच्या वेषभूषेंत ज्यांचा समावेश होतो त्या रीति, गुण, वृत्त इत्यादिकांचा उहापोह केला. प्रस्तुत प्रकरणांत काव्यरचनेचे जे निरनिराळे प्रकार आहेत त्या दृष्टीनें मराठी काव्याचे समीक्षण करावयाचें आहे. काव्याचें वर्गीकरण करतांना संस्कृत व पाश्चात्य काव्यमीमांसकांनीं वेगळी पद्धति स्वीकारली आहे. संस्कृत ग्रंथकारांनीं काव्याचें उत्तम, मध्यम व अधम असे प्रामुख्यानें तीन भेद केले आहेत. जगन्नाथानें काव्याचें उत्तमोत्तम, उत्तम, मध्यम व अधम असे चार भाग पाडले आहेत. व्यंग्यप्रधान काव्य तें उत्तम, गुणीभूत व्यंग्य ते मध्यम व व्यंग्यशून्य अलंकारयुक्त ते अधम काव्य होय. उत्तम काव्याचे वस्तुध्वनि, अलंकारध्वनि व रसध्वनि असे विषयानुरुप व अविविक्षितवाच्य व विविक्षितन्यायपरवाच्य असे पद्धत्यनुसार भेद पाडले आहेत; मध्यम काव्याचेहि अगूढ इत्यादि आठ भेद केले आहेत; व अधम काव्याचेंहि शद्बचित्र व अर्थचित्र असे दोन भेद कल्पिले आहेत. संस्कृतसाहित्यांत ध्वनीला प्राधान्य असल्यानें त्या दृष्टीनें वर्गीकरण केलें गेलें आहे. पण पाश्चाय काव्यकोविदांच्या पुढें अशाप्रकारचें तत्त्व नसल्यामुळें त्यांनीं विषय किंवा पद्धति यांना अनुसरून काव्याचें भेद पाडले आहेत. इंग्रजींत Subjective आत्मलक्षी व objective परलक्षी

असे काव्याचे दोन प्रमुख प्रकार आहेत. भावगीते, सुनीत व विलापिका हे आत्मलक्षी काव्याचे प्रकार असून महाकाव्ये व नाट्यगीतें हीं परलक्षी काव्याचे प्रकार आहेत. अशाप्रकारें काव्यानें विविधदृष्टीने वर्गीकारण होऊं शकते. म्हणून काव्याचा सर्वश्रेष्ठ प्रकार जे महाकाव्य त्याचा आपण प्रारंभीं विचार करूं.

प्रत्येक राष्ट्रांतील भाषेत महाकाव्ये दृष्टोत्पत्तीला येतात. संस्कृतभाषेंत रामायण, महाभारत व पंचमहाकाव्ये सुप्रसिद्ध असून ग्रीस देशांत इलियड व ओडेसी हीं महाकाव्ये सर्वमान्य आहेत. दंडीने महाकाव्याचीं लक्षणें पुढीलप्रमाणें दिलीं आहेत:—

सर्गबन्धो महाकाव्यमुच्यते तस्य लक्षणम् ।
आशीर्नमस्क्रिया वस्तुनिर्देशो वापि तन्मुखम् ।।
नगरार्णवशैलर्तुचन्द्रार्कोदयवर्णनैः । उद्यानसलिलक्रीडामधुपानरतोत्सवैः ।
विप्रलम्भैर्विवाहैश्च कुमारोदयवर्णनैः।मन्त्रदूतप्रयाणाजिनायकाभ्युदयैरपि।।
अलंकृतमसंक्षिप्तं रसभावनिरन्तरम् । सर्गैरनतिविस्तीर्णैः श्रव्यवृत्तैः सुसंधिभि :
सर्वत्र भिन्नवृत्तान्तैरुपेतं लोकरञ्जनम् । काव्यं कल्पोत्तरस्थायि जायते सदलंकृति ।।

—काव्यादर्श, प्रथमपरिच्छेद १४ व १६ ते १९

महाकाव्याची सुरवात आशी, नमस्कार किंवा वस्तुरचनेने व्हावी. त्याचे विषय नगर, पर्वत, समुद्र, ऋतु, चंद्र व सूर्य यांचीं वर्णनें, सलिलक्रीडा, उद्यानक्रीडा, मधुपान, पुत्रजन्म, राजकीय खलबते, सैन्याचें कूच, प्रवास, युद्ध इत्यादि असावेत, महाकाव्यांतील वर्णन अलंकारमंडित, विस्तृत व रसपरिप्लुत असावे. सर्ग फार मोठे नसावेत, वृत्ते गोड असावींत व सर्गाच्या शेवटीं निरनिराळ्या वृत्तांत श्लोक घालावा. हीं महाकाव्याचीं लक्षणें डोळ्यापुढें ठेवून रघुवंशादि महाकाव्यें लिहिलीं गेलीं आहेत. स्टीफेन्स

( Stephens ) म्हणतो, " An epic is a monumental relation of events grouped round a central theme of racial interest in perticular and human interest in general "— ( Elements of English verse p. 51 ). महाकाव्यांतील घटनांविषयीं ने. ना. श्रीनिवास शास्त्री रामायणावरील आपल्या सुंदर प्रस्तावनेत लिहितात:—" The events are the interactions of the simple tendencies and passions of our nature obscured but little, if at all, by the splendours of the palace or the pride, pomp and circumstanecs of glorious war." ( रामायण नटसेन कं पृ. ५५-५६ ). अरिस्टॉटलपासून तो आजपर्यंत होऊन गेलेल्या महाकाव्यांची चिकित्सा करून अर्नोल्ड लिहितो, " ज्यांतील विषय महार्थ, गहन व एकार्थसंगत असतो व ज्यांतील प्रधान पात्रे अत्युच्च कुळांत जन्मलेलीं असून धीरोदात्त असतात; व कथेंतील वस्तु रसानुकुल व श्रुतिसुखद वृत्तांत, कोठे संभाषणानें, तर कोठें आख्यान-रूपानें आणि कोठे आत्मगत भाषणानें सांगितलेली असते तें आर्ष महाकाव्य होय ( लो. टि. ले. ख. भा. ४ पृ. ४४४ ). इंग्रजी भाषेंत महाकाव्यांचे Authentic Epic व Literary Epic असे दोन भेद असून त्यांनाच The Primitive Epic व The Imitative Epic अशींहि नांवें दिलीं जातात. पाश्चात्य व पौर्वात्य महाकाव्यांच्या लक्षणांचा उहापोह करून लो. टिळकांनीं महाभारतांतील शब्दांनींच महाकाव्याचें पुढील लक्षण दिलें आहे:—

महत्सु राजवंशेषु जातानां दिव्यवर्णमाम् । श्रीविभूतिमतां वाऽपि प्राचीनां महात्मताम् ॥
चरितं कीर्त्यतेयत्र पुण्यमेकार्थसंगतम् । इतिहासप्रधानार्थं शीलचारित्र्य-वर्धनम् ॥
धीरोदात्तं च गहनं श्रव्यैर्वृत्तैरलंकृतम् । वाक्यजातिविशेषैश्च रसोत्कर्षप्रपोषकैः ॥

अद्भुतार्थाः कथाः यत्र धर्मकामार्थसंश्रिताः। लोकयात्राक्रमा यत्र पावनः प्रतिपाद्यते ॥

विचित्रार्थ पदाख्यानं सूक्ष्मार्थन्यायबृंहितम्। रोमहर्षणकृत काव्यमनेक-समयान्विताम् महाकाव्यं वरिष्ठं तन्महार्थंचार्षसंज्ञितम् ॥

—( लो. टिळक लेखसंग्रह भा. ४ पृ. ४४४–४५. )

सारांश, महाकाव्य हें इतिहासप्रधान, शीलचारित्र्यवर्धक, धीरोदात्त, श्रव्यैवृत्तरलंकृत व रसोत्कर्षक असावें. अशाप्रकारे महाकाव्याचे भव्योदात्त, रम्यगंभीर व विशाल कमनीय स्वरूप असल्यामुळें ले हंटनें (Leigh Hunt) काव्याच्या सर्व प्रकारांत महाकाव्यालाच अग्रपूजेचा मान दिला आहे.

प्राचीन मराठी काव्यांत संस्कृत महाकाव्यांच्या लक्षणांचें परिपालन करून लिहिलेलीं काव्ये फारसी आढळत नाहींत. याचें कारण असें कीं प्राचीन कवींच्या मनावर-कालिदास–भारवीपेक्षां व्यासवाल्मिकी यांचा संस्कार अधिक प्रबल झाला होता. त्यामुळे संस्कृतभाषेंतील महाभारत या आर्ष महाकाव्यावर मराठीत विपुल काव्यरचना झाली आहे. मुक्तेश्वर, विष्णुदास, श्रीधर, माधव, नरहरी, मोरेश्वर, रामचंद्र बोवा, रामदासी, शिवकल्याण, मालुनाथ, जिवाशिवा, कृष्णादास मुद्गल, गोपाळकवि व मोरोपंत यांनीं महाभारतावर 'देशीकार लेणे' चढविलें आहे. विशेषतः, मुक्तेश्वरांची आदि, सभा, वन व विराट हीं चार पर्वें ललितहृद्य उतरलीं आहेत व त्यांतहि त्यांचें आदिपर्व हा महाराष्ट्र-भारतीचा अनर्घ्य अलंकार आहे. मोरोपंत हे संक्षेपकुशल असल्यामुळें आगंतुक कथा वगळून त्यांनीं सर्व महाभारत १८००० आर्यांत रचिलें आहे. रसनिष्पत्ति, अलंकारचमत्कृत्ति व विचारसंपत्ति या दृष्टीनें मोरोपंतांचें 'आर्याभारत' अनन्यसाधारण आहे. सामराज व विठ्ठल यांनीं महाकाव्याचा आदर्श पुढें ठेवून काव्यचरना केली आहे. सामराजाचें 'रुक्मिणीस्वयंवर' हें महाकाव्याच्या धर्तीवर असून या काव्यांत रुक्मिणीहरणाची रमणीय

कथा आठ सर्गांत सांगितली आहे. पहिल्यां सर्गांतील संसार-समुद्राचे वर्णन, दुसऱ्या सर्गांतील रुक्मिणीचा जन्म, तिची बाल्यावस्था व त्यानंतर तिसऱ्या सर्गांत वर्णिलेली तिची यौवनदशा, श्रीकृष्ण वियोगामुळे तिची झालेली मनःस्थिति, रुक्मिणीची प्रणयपत्रिका व सुदेवाचे प्रवासवर्णन- हे या काव्यांतील भाग आल्हादक उतरले आहेत. स्वभावपरिपोष, सृष्टिसौंदर्यवर्णन व सालंकार भाषा यांमुळे हे काव्य सरसमनोहर वाटते. विठ्ठलाने 'रुक्मिणीस्वयंवर' व 'सीतास्वयंवर' हीं दोन सर्गात्मक काव्ये महाकाव्याच्या धर्तीवर लिहिलीं आहेत. या दोन्ही काव्यांत कवीचे रसाविर्भावापेक्षां छंदःशास्त्रनैपुण्य व चित्रकाव्य-विरचनकौशल्य प्रत्ययाला येते; या दोन्ही काव्यांत वस्त्रें, जडजवाहीर, लग्नसाहित्य, तनुवर्णन यांत सारखेपणा दिसून येतो. याशिवाय कृत्रिमता व क्लिष्टता हे दोष डोकावतात सारांश, सामराज व विठ्ठल यांनीं प्राचीन मराठी काव्यांत सर्गात्मक काव्यरचना करण्याचा प्रयत्न केला आहे.

आधुनिक कविमंडळांत वासुदेवशास्त्री खरे यांनीं 'यशवंतराव' हे महाकाव्य लिहिले आहे. या काव्याचे २४ सर्ग असून श्लोकसंख्या १७२५ ही आहे. या महाकाव्यांत यशवंतराय या स्वातंत्र्यप्रेमी, धीरोदात्त व उदार अशा वीरपुरुषाचें जीवनक्रमाचे वर्णन केलें आहे. पूर्वी मराठी फौजेंत आनंदराव डफळे या नांवाचा एक सरदार होता. त्याला कमळा या नांवाची एक गुणसुंदर कन्या होती. पुढें आनंदराव हा पेशव्यांच्या हुकमावरून मल्हारराव होळकर यांना जाट लोकांशीं युद्ध करण्याकरितां जाऊन मिळतो. त्याच्या बरोबर त्याची मुलगी कमळा हीं असते. त्या लढाईत मराठ्यांचा पूर्ण पराजय होऊन त्यांच्या फौजेची वाताहात झाली. पुढें आनंदराव एकटाच हिंडत हिंडत एका गांवीं गेला. तेथें भरतपुरच्या राजानें त्याला पकडून तुरुंगांत टाकलें. बारा वर्षां-नंतर पुष्कळ हाल सोसून त्यानें आपली सुटका करून घेतली व त्याला

आपल्या मुलीचा शोध न लागल्यामुळें आनंदराव वैराग्य धारण करून तीर्थयात्रा करीत हिंडूं लागला. इकडे मल्हारराव होळकर व कमळा यांचा एकत्र सहवास येऊन ते दोघे परस्परांवर अनुरक्त झाले व त्यांचें प्रेम लवकरच गांधर्वविवाहानें फलित झालें. कालेंकरून कमळा ही गर्भवती झाली. पुढे मल्हारराव हा शत्रूशीं युद्ध करण्याकरितां गेला व आपली जात कमी दर्जाची असून खोटे नांव सागून तिच्याशी विवाह केला याबद्दल तिची पत्ररूपानें क्षमा मागितली; व विजयी होऊन तिला भेटण्याचें आश्वासन दिले. पुढे कमळाबाईला जो पुत्र झाला त्याचेंच नांव यशवंतराय होय. आपला पति लवकर येत नाही असे पाहून ती हिंडत हिडत कोटा शहरास येऊन पोहोंचली. तेथे किसनदास नांवाच्या सावकारानें तिचें पालन केलें. किसनदासानें यशवंतरायाला शस्त्रास्त्रांचें शिक्षण देवविलें. तो रूपानें सुंदर असून त्याचा वर्ण गोरा व आकृति सुदृढ अशी होती. यशवंतराय हा कोटा शहरांत फार लोकप्रिय झाला. पुढे त्या शहरांत दिल्लीरखानानें फार जुलूम केला. त्या शहरांत भूषणसिंग या नांवाचा एक शूर गृहस्थ राहत असे. त्याला लीलावती व अभयसिंग अशीं दोन मुलें होतीं. लीलावतीविषयीं यशवंतरायाच्या मनांत प्रेमांकुर उत्पन्न झाला. एकदां दिल्लीरखानानें भूषणसिंगाच्या घरांत शिरून त्याला पकडून नेले. त्याच्या पत्नीने पातिव्रत्यरक्षणार्थ आत्महत्या केली. पुढें कोटा शहरांत स्वातंत्र्य प्रस्थापन करण्यासाठीं यशवंतरायाने मोंगलांशीं युद्ध सुरूं केलें. मल्हारराव हा पेशव्यांच्या आज्ञेवरून मोंगलांना मदत करण्यासाठीं आला. पण यशवंतरायानें आपल्या पराक्रमानें त्या शहराचें रक्षण केलें. पण पुढें स्वातन्त्र्यसंस्थापनेचें प्रयत्न निष्फळ झाल्यामुळें तो निराश झाला. वाटेंत त्याला एक बैरागी भेटला. तोच आनंराव डफळे होय. त्यानें मल्हारराव होळकराला भेटून आपल्या नातवाची मुक्तता केली. मल्हाररावाला यशवंतराय हा आपलाच पुत्र होय असें कळून आलें. सर्वांच्या गांठीं

पडल्या व आनंदी-आनंद झाला. नंतर यशवंतराय व लीलावती यांचा विवाह झाला व सर्वजण सुखानें राहूं लागले. अशाप्रकारचें हें विस्तृत कथानक खरेशास्त्री यांनीं या महाकाव्यांत वर्णिलें आहे धीरोदात्त यशवंतराय, पराक्रमी मल्हारराव, कोमल हृदयाची कमळा, सात्त्विक आनंदराव, उदार भूषणसिंह यांचे स्वभाव चांगल्याप्रकारें रेखाटले आहेत. या काव्यांत वीररस प्रधान असून अनुषगानें, करुण, भीषण व भयानक हे रस आविष्कृत झाले आहेत. चंद्रोदय, चंद्रप्रकाश, निर्झर, युद्ध, ऋतु यांचीं वर्णनेंहि मनोरम वाटतात. सारांश, वासुदेवशास्त्री खरे यांनीं गीर्वाण-महाकाव्याचा आदर्श पुढें ठेऊन 'यशवंतराय' हें उदात्तमनोहर महाकाव्य रचिलें आहे यांत शंका नाहीं.

खरेशास्त्र्यांच्या महाकाव्यानंतर साधुदास यांच्या 'वनविहार,' 'रणविहार' व 'गृहविहार' या महाकाव्यांचा विचार करणे क्रमप्राप्त आहे. हीं तीन महाकाव्यें लिहून साधुदासांनीं आधुनिक काव्याच्या रत्नभांडारांत स्पृहणीय भर घातली आहे. हीं काव्यें लिहितांना त्यांनीं रामायणाचा आधार घेतला आहे हें खरें. पण हीं काव्यें वाचतांना पंचमहाकाव्यांची कुणालाहि सुखद स्मृति झाल्यावांचून राहणार नाहीं. साधुदासांनीं 'वनविहार' हें काव्य प्रारंभीं लिहिलें आहे. या काव्याचे सतरा सर्ग असून त्यांत राम वनाला निघाल्यापासून तों मारुतीच्या सीताशोधापर्यंतची हकीगत वर्णिली आहे. या महाकाव्यांतील पौरजनांचें दुःख ( अ. १ ) भरतभेट, रामाचें कुटुंबसौख्य, श्रीरामविलाप, तारेचें सांत्वन- हे प्रसंग चांगले साधले आहेत. तेरावा अध्याय हा पंपासरोवराच्या वर्णनाला वाहिलेला आहे; व त्यांत कवीचें भाषावैभव उत्कृष्टपणें प्रगट झालें आहे. तसेंच सायंकाळ वर्णन, वसंतवर्णन, हेमंतवर्णन व शरदवर्णन-हीं वर्णनेंहि संस्कृत महाकाव्यांच्या धर्तीवर केलीं आहेत. तथापि 'वनविहार' हें काव्य अलंकारवैपुल्यामुळें अत्यंत क्लिष्ट वाटते. 'रणविहार'

या काव्यांत राम व रावण यांच्या युद्धाची हकीगत वर्णन केली आहे. या दोन महाकाव्यांपेक्षांहि त्यांचे 'गृहविहार' हें काव्य अधिक प्रसन्न व प्रसादरम्य वाटतें. या काव्याचें सोळा सर्ग असून या महाकाव्यांत रामाच्या वानप्रस्थानापर्यंतची हकीगत वर्णिली आहे. 'वनविहार' व 'रणविहार' या दोन काव्यांत शब्दार्थचमत्कृतीच्या हव्यासामुळें जी रस-वंचना व अर्थविटंबना आढळते. तशी 'गृहविहारांत' आढळत नाहीं. या काव्यांत राम व सीता यांच्या प्रथम-मीलनाच्या सुखद प्रसंगाचें १४ व्या अध्यायांत फार बहारदाररीतीनें वर्णन केलें आहे. त्यांचें संकल्पित 'ऽरविहार' हें महाकाव्य प्रसिद्ध झालें तर त्यांचा 'रामायणविहार' पूर्ण होईल. तात्पर्य, साधुदास यांचीं 'वनविहार', 'रणविहार' व 'गृह-विहार' हीं तीन अभिजात महाकाव्यें ( Epics ) विदग्ध रसिकांना सदैव अभ्यसनीय व आनंददायक वाटतील यांत यत्किंचितहि संशय नाहीं.

रामायणावर विद्याधर वामन भिडे यांनीं 'राघवीय परिवाह' हें महाकाव्य लिहिले आहे. या काव्यांत रामजन्मापासून तो मारीच व रावण हे दोघे राक्षस सीतेचे हरण करावयासाठीं पंचवटीमध्यें आले येथ-पर्यंतचा कथाभाग ग्रथित केला आहे. या काव्यांत दहा सर्ग असून श्लोकसंख्या ८६४ आहे. भाषेची प्रौढता, वृत्तांची नियमबद्धता व अलंकारांची विपुलता हे गुण या काव्यांत असलें तरी त्यांत पराकाष्ठेची दुर्बोधता दृग्गोचर होते. साधुदासांच्या महाकाव्यांतहि क्लिष्टता असली तरी एकप्रकारचें जसें सौष्ठव आहे तसें भिडे यांच्या काव्यांत नाहीं. पुष्कळ श्लोक समासबाहुल्यामुळें इतके दुर्बोध झाले आहेत कीं, विस्तृत टीपा पाहूनहि, त्यांचा अर्थ उकलणें हें दुष्कर वाटतें. तथापि या महाकाव्यां-तील सीतास्वयंवरविषयक तिसरा सर्ग चांगला साधला आहे. सारांश, साधुदासांच्या महाकाव्यांच्या खालोखाल भिडे यांच्या 'राघवीय परिवाह' या महाकाव्याची गणना करावयाला हरकत नाहीं.

येथपर्यंत मराठी भाषेंतील महाकाव्यांचें समालोचन केलें. प्राचीन काव्यांत स्वतंत्र महाकाव्यरचना नाहीं. त्याप्रमाणेंच आधुनिक काव्यांतहि स्वतंत्र महाकाव्ये आढळत नाहींत. नाही म्हणावयाला खरेशास्त्री यांनीं यशवंतराय महाकाव्याचें कथानक स्वतंत्रपणे कल्पिलें आहे. कुटे यांचें 'राजा शिवाजी' हें काव्य काव्यदृष्ट्या कमी प्रतीचे आहे. अलीकडे महाकाव्यें कां लिहिलीं जात नाहींत हा वादग्रस्त प्रश्न आहे. प्रा. वा. म. जोशी यांनी 'निर्झरिणी' या काव्यसंग्रहाच्या प्रस्तावनेत या प्रश्नाची उद्‌बोधक मीमांसा केली आहे. त्यांत त्यांनीं महाकाव्ये निर्माण न होण्याचीं ज्ञानवृद्धि, परिस्थिति व मनोवृत्ति ही तीन प्रतिकूलतेचीं कारणे देऊन त्याचें खंडन केलें आहे. अलीकडे महाकाव्यें होत नाहींत याचीं अन्तःसृष्टींतील अस्थिरता, आदरशून्य विश्वव्यापक व विराटस्वरूपी सौंदर्यदृष्टीचा अभाव हीं कारणें त्यांनीं सुचविलीं आहेत. त्यांची ही मीमांसा विचारप्रवर्तक आहे हें खरें. बाह्य परिस्थिति व अंतःसृष्टि जरी महाकाव्यनिष्पत्तीला प्रतिकूल असली तरी आर्षप्रतिभा (Epic-genius) फार थोड्या कवींच्या ठिकाणीं आढळते हें नाकारतां येत नाहीं. अर्वाचीन कवींपैकीं मोगरे, चंद्रशेखर व रे. टिळक यांच्या ठिकाणीं महाकाव्यनिर्माण करण्याची पात्रता होती. पण त्यांनीं आपलें सगळें आयुष्य स्फुट व खंडकाव्यें लिहिण्यांत व्यतीत केलें. अखंड व्यासंग, अविश्रांत परिश्रमशीलता, उज्ज्वल कल्पकता व उदात्त ध्येयवाद हे गुण कवींच्या ठिकाणीं असल्याखेरीज महाकाव्यनिर्मिती होणें शक्य नसते. मिल्टनच्या ठिकाणीं या सर्व गुणांचा प्रकर्ष झाल्यामुळेंच त्याच्या हांतून नष्टनंदनवन (Paradise Lost) यासारखें अपूर्व महाकाव्य लिहिलें गेलें. गेल्या शंभरवर्षांत राजकीय व सामाजिक जीवनांत इतक्या प्रक्षोभकारक घटना घडून आल्या; पण त्यावर कोणीहि स्वतंत्र व प्रदीर्घ काव्यरचना करण्याचा प्रयत्न केला नाहीं. म्हणून अशा या प्रतिकूल परिस्थितींतहि खरेशास्त्री, भिडे,

साधुदास, या कवींनीं प्राचीन पद्धतीची कां होईना पण महाकाव्यें लिहिण्याचा प्रयत्न केला याबद्दल त्यांना धन्यवाद दिले पाहिजेत हें जितकें समुचित तितकेंच अजूनहि भव्योदात्त महाकाव्याची उणीव भासते हेंहि नमूद करणें अवश्यक वाटतें.

मराठी भाषेतील महाकाव्यांचा उहापोह केल्यानंतर कथनपर खंडकाव्याकडे वळणे क्रमप्राप्त आहे. प्राचीन कवींनीं स्वयंवरविषयक खंडकाव्ये पुष्कळ लिहिलीं आहेत. स्वयंवर हा विषयच मंगल व मनोज्ञ असल्यामुळे त्यावर विपुल खंडकाव्ये झालीं असल्यास त्यांत काय आश्चर्य ? त्यांतहि रुक्मिणीस्वयंवर व सीतास्वयंवर हे प्राचीन कवींचे दोन आवडते विषय आहेत. रुक्मिणीस्वयंवरावर सोळा काव्ये उपलब्ध आहेत. वामन, आनंदतनय, चिंतामणी, अनंत, गोसावीनंदन व नागेश यांनीं सीतास्वयंवर लिहिले आहे. या सर्वांत आनंदतनय यांचे सीतास्वयंवर अधिक चांगलें आहे. या काव्यांत सीतावर्णन, स्वयंवराचा थाट व रावणाची फजिती हे भाग यमकानुप्रासमंडित असून चांगले वठले आहेत. नागेशाचे सीतास्वयंवर हे काव्य विस्तृत असून त्यांत त्याची विनोदप्रवणता दिसून येते. नागेशाच्या सीतास्वयंवराचे ४१५ श्लोक असून २०५-२६५ या श्लोकांत सीतेचे आपादमस्तक वर्णन केले आहे. तथापि, अहिल्याचरित्रवर्णनांत त्याची हीन अभिरुचि व स्त्रीदाक्षिण्याचा अभाव हे दोष दिसून येतात. तसेच बुवाबाजीच्या वर्णनांत त्याचे तत्कालिन समाजाचें सूक्ष्म निरीक्षण दृग्गोचर होते. अनंताच्या सीतास्वयंवरांतील कांहीं भाग चांगले वाटतात. उदाहरणार्थ, सीतेच्या सख्यांनीं रामास वंदन करण्यास सीतेला सांगितले तेव्हां नूतनपत्नीपदप्राप्त सीता नैसर्गिक लज्जेस वश होऊन नमस्कार करण्याचें टाळते हे—

रामाचें पद लागतां जड शिळा झाली त्वरें कामिनी
यासाठीं न नमी रघूत्तमपदें भाळीं सुरत्नें मणी

रत्नाच्या युवती सुरम्य सवती होतील मातें सदा
रामाची बहु अप्रिति मजवरी होईल गे! सर्वदा ॥ ११६

या श्लोकांत खुबीनें सांगितलें आहे. चिंतामणीचे 'सीतास्वयंवर' हें काव्य आर्यावृत्तांत असून तें सामान्य दर्जाचें आहे. पांडुरंगाचें 'द्रौपदी-स्वंयवर,' भास्कराचें 'गणपति-स्वयवर, सखोबाचें 'उषास्वयंवर' व रामचंद्राचें 'सुभद्राहरण' अशीं स्वयंवरविषयक काव्यें आढळतात. सारांश, रुक्मिणीस्वयंवर व सीतास्वयंवर हे दोन कथाभागच प्राचीन कवींच्या वर्णनात्मक प्रतिभेला आकर्षक वाटले आहेत असें ह्मणावयाला हरकत नाहीं.

प्राचीन मराठी काव्यांतील सर्व स्वयंवरात्मक काव्यांत रघुनाथ-पंडिताचे 'नलदमयंती स्वयंवर' हे काव्य अधिक हृदयंगम आहे. मुक्तेश्वरांनीं वनपर्वांत नलाची कथा सुंदर रीतीनें वर्णन केली आहे. पण रघुनाथपंडिताचें हें काव्य म्हणजे एक ललितमनोहर कलाकृति ( highly wrought piece of art ) आहे. वनवासांत असतां एकदां धर्मराजानें आपल्यासारखा दुर्दैवी व दुःखी असा दुसरा कोणी राजा पाहिला आहे काय असा बृहदश्वमुनीला प्रश्न केला. त्यावेळीं बृहदश्वऋषींनीं ही कथा धर्मराजाला सांगितली आहे. महाभारताच्या वनपर्वांत पन्नासपासून तो सत्याहत्तर अध्यायांत ही कथा सांगण्यांत आली आहे. श्रीहर्षानें आपल्या नैषधीयचरित हें काव्य याच कथानकाच्या आधारें लिहिलें आहे. रघुनाथ-पंडितानें आपलें काव्य नैषधीयचरित्र काव्याच्या आधारें रचिलें, हें—

लोकीं सौरभ काव्यनाटककलालंकार चूडामणी
सर्वां नैषध विद्वदौषध असे विख्यात वाग्धोरणी
हे त्याचीच टिका टिकोनि घटिका ऐकेल जो सादरें
बोले त्या रघुनाथपंडित कवि भेटे हरी सादरें

या श्लोकावरून दिसून येतें. असें जरी असलें तरी रघुनाथ पंडिताच्या

उज्ज्वलरम्य प्रतिभाविलासाला मुळींच अडथळा आलेला नाहीं. या काव्यांत कवीनें नलदमयंती स्वयंवरापर्यंतचा कथाभाग सालंकार भाषेंत सांगितला आहे. ' कथा बोलूं हे मधुर सुधाधारा । होय शृंगारा करुणरसा धारा' असें कवीनें प्रारंभीं उद्‌गार काढले आहेत. या काव्यांतील उद्यानवर्णन, हंस-दमयंती संवाद, कुंडिनपूरवर्णन, स्वयंवरनिश्चय, नारददेवसंवाद, नलदमयंतीभेट– हे सारे भाग मनोज्ञ वाटतात. नलानें हंसाला प्रेमदूत म्हणून पाठविण्याची कल्पना यक्षानें मेघाला दूत म्हणून पाठविण्याइतकीच कमनीय वाटते. या काव्यांत हंसाचे कार्य फार महत्त्वाचें आहे. नलदमयंती या प्रेमिकांचें मधुरमीलन घडविण्याचें सुखद कार्य त्याने केलें आहे. हंसाचें निजणें, नलानें त्याला पकडणें, त्याची मुक्तता करून घेण्याची धडपड, हंसदमयंतीच्या भेटीच्या वेळचें त्याचें वर्णन अप्रतिम वाटतें. यांवरून, रघुनाथपंडिताचे वर्णनकौशल्य किती रेखीव, रमणीय व रसगर्भ आहे याची रसिकांना कल्पना आल्यावांचून राहणार नाहीं. रघुनाथपंडित हा पहिल्या प्रतीचा भाषाप्रभु असल्याळें हें काव्य विविध-प्रकारच्या अलंकारांनीं संपन्न व संमोहनीय वाटतें. रघुनाथपंडितांनीं या काव्यांत स्कॉट-टेनिसनप्रमाणे रसवर्धक पद्यरचना ( Songs ) घातली आहे. क्वचित्प्रसंगीं समासबाहुल्यामुळें या काव्याला दुर्बोधता आली आहे. सारांश, प्राचीन स्वयंवरात्मक खंडकाव्यांत रघुनाथपंडिताच्या ' नलदमयंती स्वयंवर ' या प्रणयरम्य खंडकाव्यालाच अग्रपूजेचा मान दिला पाहिजे.

येथपर्यंत, प्राचीन मराठी काव्यांतील स्वयंवरात्मक आख्यानांचा उहापोह केला. आतां आपण भागवतांतील कथानकावर जीं लहानमोठीं काव्यें लिहिलीं गेलीं आहेत त्यांचा विचार करूं. श्रीमद्‌भागवत हा ग्रंथ ' रसमालयं ' असून त्यांत भक्तियोग, वेदांत व भगवद्‌भक्तांच्या कथा यांचें संमिश्रण झालें असल्यामुळें तो ग्रंथ प्राचीन कवीना अत्यंत प्रियतम वाटला. विशेषतः, त्यांतील श्रीकृष्णचरित्र हा कोणत्याहि कवीच्या

प्रतिभेला पल्लवित करणारा नित्यनूतन विषय आहे. श्रीकृष्णचारित्रांतील कथानकावर वामनपंडितांनीं सुश्लिष्ट व सुश्लोकमंडित अशी विपुल काव्य-रचना करून सत्कीर्ति मिळविली आहे. त्यांचीं कृष्णजन्म, मृत्तिका-भक्षण, वेणुसुधा, जलक्रीडा, कात्यायनीव्रत, गोपीगीत, रुक्मिणीविलास इत्यादि प्रकरणें चेतोहर वाटतात. कोणत्याहि प्रसंगाचे शब्दचित्र रेखाटण्यांत वामनपंडित किती कुशल आहेत हें 'भामाविलासांतील' क्रोधाविष्ट भामेच्या वर्णनावरून दिसून येते. पण, राधाभुंजग इत्यादि काव्यांत राधाकृष्णाच्या संभोग शृंगाराचे सविस्तर वर्णन करण्यांत अश्लीलता दिसून येते. विशेषतः राधाकृष्णाच्या प्रणयविलासांची उत्तान वर्णने करून वामनपंडितांनींच नव्हे तर पुष्कळ प्राचीन कवींनीं आपली हीन अभिरुचि प्रगट केली आहे. कृष्णानंदनिमग्नकृत 'राधाविलास' मोरेश्वरकृत .'चंद्रावळीचरित्र' अनामककृत 'राधाकृष्णसंवाद' हीं सारीं काव्यें अश्लील आहेत. या सर्वांत नागेशाचें 'चंद्रावळीवर्णन' हें काव्य अधिक विस्तृत आहे. कपटवेष धारण करून चंद्रावळीं या तन्वंगीशीं श्रीकृष्णाने संभोगशृंगाराचे विलास केले या गर्हणीय कथानकावर नागेशाने ३२१ श्लोकांचें वाग्वैभव उधळावे याचा विषाद वाटतो. या सर्व कवीं-पेक्षां मोरोपंतांची भागवती प्रकरणें संयमित आहेत. त्यांपैकीं 'भीष्म-भक्तिभाग्य' प्रल्हादचरित्र, अंबरिषाख्यान, रुक्मिणीहरण, ध्रुवचरित्र व गोपीगीत हीं काव्यें चांगलीं वाटतात. मोरोपंत हे विवेकसंपन्न असल्या-मुळें तें उत्तान शृंगाराच्या कर्दमात रुतून बसलेले आढळत नाहींत. शुक-रंभासंवाद व सुदामचरित्र हीं दोन प्राचीन कवींचीं आवडतीं आख्यानें आहेत. शुकरंभासंवाद या कथेवर अमृतराय, विठ्ठल व मुक्तेश्वर यांनीं काव्यरचना केली आहे. त्यांपैकीं मुक्तेश्वरांचें ओवीबद्ध आख्यान सरस असलें तरी त्यांतील रंभेच्या भाषणांतील अश्लीलता असह्य वाटते. वामन, मोरोपंत, रामचंद्र, आनंदतनय व अमृतराय यांनीं सुदामचरित्र लिहिलें

आहे. त्यांत आनंदतनयांचें 'सुदामचरित्र' बरें आहे. अशाप्रकारें भागवतांतील कथानकावर जितकी काव्यरचना झाली आहे तितकी रामायण व भारत यांतील कथानकांवर झालेली नाहीं. हीं कथानकें भक्ति व शृंगार यांनीं संभृत असल्यामुळें तीं कवि व कीर्तनकार यांना उपयुक्त ठरलीं. परंतु, मोरोपंत वगळल्यास नागेश, विठ्ठल, मोरेश्वर, मुक्तेश्वर या कवींनीं लिहिलेल्या काव्यांत संयमाचें उन्मूलन झालें आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

भागवताखालोखाल रामायणांतील कथानकांवर आख्यानात्मक काव्यरचना झालेली आढळते. वामनपंडितांचा भागवतरामायण, अहिल्योद्धार, रामजन्म, भरतभाव, रामस्तव व हनुमानस्तव यांचा उल्लेख करतां येईल. यांपैकीं भागवतरामायण व भरतभाव हीं काव्यें चांगलीं आहेत. पण भागवती प्रकरणांइतकी त्यांचीं रामायणावरील काव्यें रसपूर्ण वाटत नाहींत. वामनपंडितापेक्षां आनंदतनय व अनंत यांचीं रामायणावरील रचना अधिक चांगली आहे. आनंदतनयांचीं ताटकावध, विश्वामित्र-यज्ञरक्षण व अनंताचें 'सुलोचनागहिंवर' व 'कुशलवाख्यान' हीं काव्यें उल्लेखनीय आहेत. आनंदतनय व अनंत यांच्या वृत्तींत व वृत्तांत बरेंच साहश्य आहे. 'अहिल्योद्धार' हें कथानक इंद्र व अहिल्या यांच्या संभोगशृंगारवर्णनाला अवसर देत असल्यामुळें लोकप्रिय ठरलें आहे. मल्हू कवीनें 'भरतभेट' हें विस्तृत काव्य लिहिलें आहे. या काव्यांत २१ प्रसंग असून त्याची श्लोकसंख्या २२८३ आहे. हें काव्य विस्तृत असलें तरी सामान्य दर्जाचें वाटतें. देवनाथांनीं भावणाख्यान लिहिलें आहे. तथापि या सर्वांपेक्षां मोरोपंतांची रामायणविषयक काव्यरचना अधिक महत्त्वाची आहे. त्यांचें 'कुशलवोपाख्यान' हें पहिलेंच काव्य वैदग्ध्यमंडित असून त्यावर पंचमहाकाव्यांची छाप पडली आहे. प्रा. पंगु यांनीं म्हटल्याप्रमाणें, "कुशलवोपाख्यानाचा काव्यदृष्टीनें विचार केल्यास

भावनेपेक्षां कल्पनेचा किंवा रसापेक्षां अलंकाराचा प्रकर्ष येथें झालेला दिसतो ( कुशलवोपाख्यान प्रस्तावना पृ. १२ ). त्यांच्या मंत्रबद्ध, चित्र, दाम इत्यादि १०८ रामायणांत चित्रकाव्यरचनेचा जितका उत्कर्ष तितकाच रसात्मक काव्याचा अपकर्ष प्रत्ययाला येतो. या रामायणांत मोरोपंतांचें उत्कृष्ट भाषाप्रभुत्व व उत्कट रामभक्ति अनुभवाला येते. त्यांची हीं काव्यें कृत्रिम व क्लिष्ट असलीं तरी निबंधमालाकारांनीं म्हटल्याप्रमाणें, "हीं साधण्यास आमच्या कवींचे श्रम म्हटले म्हणजे हत्तीस आपल्या शुंडादंडावर पुष्पमाला खेळविण्याचें जितकें श्रम तितकेंच बहुधा होत" नरहरीनें मंत्रबद्ध 'रामजन्म' हें काव्य लिहिलें आहे. सारांश, रामायणांतील सीतास्वयंवर, भरतभेट, अहिल्योद्धार, सुलोचनागंहिवर, कुशलवाख्यान हीं कथानकें कविप्रिय ठरलीं आहेत. तथापि भागवतीं प्रकरणांच्या तुलनेनें रामायणावरील हीं काव्यें संख्येच्या व सौंदर्याच्या दृष्टीनें क्षीणशक्ति आहेत.

रामायणापेक्षां महाभारतांतील कथानकांवर झालेलीं काव्यरचना अल्प आहे. महाभारत हें नवरसात्मक कथांचें निरुपम भांडार असूनहि प्राचीन कवींनीं त्यावर फारशी काव्यरचना कशी केली नाहीं याचें नवल वाटतें. द्रौपदीस्वयंवर व द्रौपदीवस्त्रहरण हे दोन प्रसंग विशेष कविप्रिय ठरले आहेत. भिक्षु कवि व अमृतराय यांनीं 'द्रौपदीवस्त्रहरण' लिहिलें असून त्यांत अमृतरायाचें काव्य चांगलें वाटतें. मुक्तेश्वरांच्या सभापर्वांतील द्रौपदीवस्त्रहरणप्रसंगीं केलेलें शेले-शालू यांचें वर्णन व अमृतरायांचेंहि वस्त्रवर्णन यांची तुलना करण्याजोगी आहे. या दोघांच्या वस्त्रवर्णनावरून तत्कालीन वेषभूषेची कल्पना येते. अनंत व बास्वलिंग यांनीं 'गजगौरीव्रत' या आख्यानांवर काव्यें लिहिलीं आहेत. अनंताची 'गरुडगर्वपरिहाराख्यान' व 'सुरथसुधन्वाख्यान' हीं काव्येंहि उल्लेखनीय आहेत. अनंताच्या काव्यावर विठ्ठल व आनंदतनय यांची छाप पडली आहे. विठ्ठलानें 'द्रौपदीवस्त्रहरण' व 'पांचालीस्तवन' हीं काव्यें लिहिलीं आहेत. तात्पर्य, महाभारतांतील

कथानकांवर फारशी काव्यरचना झालेली नाहीं व जी झाली आहे तीहि उच्च दर्जाची आहे असें म्हणवत नाहीं.

येथपर्यंत भागवत, रामायण व महाभारत यांतील कथानकांवर जी काव्यरचना झाली तिचें समालोचन केलें. याशिवाय इतर कांहीं काव्यांचा विचार करूं. 'गोपीचंदाख्यान' हे एक लोकप्रिय आख्यान आहे. या आख्यानावर चिंतामणीनें आर्याबद्ध काव्य लिहिलें आहे. या काव्याचें चार प्रसंग असून त्यांतील आर्या सुबोध असल्या तरी सफाईदार वाटत नाहींत. सखोबा कवीचें 'गोपीचंदाख्यान' श्लोकबद्ध असून सामान्य दर्जाचें आहे. नागेशाचें 'नंदिकेश्वर जननाख्यान' या काव्यांतहि चार प्रसंग आहेत. हें काव्य नागेश्वर महादेव मटंगे यानें भविष्योत्तर पुराणाचा आधार घेऊन लिहिलें आहे. या काव्यांत काव्यगुण फारसा नसला तरी त्यांतील आर्या मोरोपंती थाटाच्या आहेत. याशिवाय भास्कर कवीचें 'गणपती स्वयंवर,' मचेंद्रकुमाराचें 'शिवरात्रीकथन, 'रविदासाचें 'कुबेरलक्ष्मीगर्वहरण,' राघवाचें 'दामाजीपंत चरित्र,' विठ्ठलाचें 'सखुबाई चरित्र' व 'भानुदास' हीं काव्येंहि उल्लेखनीय आहेत, पण या सर्वांपेक्षांहि विठ्ठलाचें 'बिल्हणचरित्र' हें प्रणयनिर्भर काव्य बहारदार आहे. गुर्जर देशाचा राजा वीरसिंह हा अनाहिलपट्टण या नगरींत राहून राज्य करीत असे. त्याला शशिकला या नांवाची एक कन्या होती. ती लावण्यशालिनी असल्यामुळें यौवनाच्या यज्ञभूमींत पदार्पण केल्यावर शशिकलेप्रमाणे शोभूं लागली. काश्मीर देशाचा जो प्रसिद्ध पंडित बिल्हण त्याला राजानें आपल्या कन्येला शिकविण्यासाठीं नेमलें. त्यानें शशिलेखेला सर्व शास्त्रांत निष्णात करून कामशास्त्रांतहि निपुण केलें. प्रणयांत त्यांचा परिचय परिणत झाला ही बातमी वीरसेनाला कळून त्यानें बिल्हणाला सुळाची शिक्षा दिली. त्यावेळीं सुळावर जात असतांनाहि बिल्हणानें 'नृपसुता रतिसौख्याचें' कसें स्मरण केलें आहे तें पाहा:—

अद्यापि ते कनकचंपकवर्णगौरी । उत्फुल्लपद्मनयना तनुरोमहारी ॥
सुप्तोत्थिता च शयनीं मदविव्हळांगी । विद्या तशी गति तशी स्मरतों
प्रसंगीं ॥
अद्यापि चंद्रवदना नवयौवनांगी । पीनस्तनी मजपुढें उभि हेमरंगी ।
माझी तनू स्मरशरें पिडितांचिवेगीं । गात्रें सुशीतल करी सुरत प्रसंगीं॥
अद्यापि ते शरदपुष्पदलायिताक्षी । वक्षोजवर्तुलपटद्वय मी निरीक्षी ।
आलिंगितां सुरस घे मधुराधराचा । जैसा मिलिंद रस घे नवपंकजाचा
अद्यापि ते मलयचंदनलेपभोगी । कस्तूरिकेशरसुमिश्रितचर्चितांगी ।
चातुर्यचारुशतचुंबनदानकामी । सलज्जखंजननयना नयनीं स्मरे मी ॥
अद्यापि ते शरच्चंद्रमुखी मृगाक्षी । लीलाधरा तरलमीनदृशा निलक्षी ।
काश्मीरचंद्र मृगनाभिविलेपनांगी । तांबूल देउनि विलासिनी नित्ययोगी
अद्यापि ते गलितकुंतलपाश काळे । वक्षोज नम्र वरि मौक्तिकहार लोळे ।
द्रोणाद्रिमंदरगिरी पयासिंधुपाळीं । तैसे पयोधर तिचे धरि भोगकाळीं ।
अद्यापि चंद्रवदना करि फार रती । लावण्यसागरलताद्विजराजकांती ।
रात्रौदिवा स्मरण होय तिच्या मुखाचें । दावा मुहूर्तमुखवारिजवल्लभेचें ।
अद्यापि हंसतुलिकेवरि राजपुत्री । संगीत गायनकरी रतिसौख्यदात्री
तें आयकोनि रिझल्या सुरराजकन्या । वर्णावया स्मरवधू सुरता दिसेना
अद्यापि कज्जल विराजित नेत्रबाणीं । भूकार्मुका मदनशक्ति तसे सुवर्णी ।
कर्णांत ओढुनि ढळे कमलाननेचा । ते भोगितां कवण पंडित दोष वाची
अद्यापि ते शरदकुंदसुगंधितांगी । देखोनि होय मकरध्वज वामवार्गी ।
दिव्यांगना सुरततीर्थ कृतोपकारी । जन्मांतरी वरिन मी मनिं हेतु भारी

विठ्ठल हा पराकाष्ठेचा चित्रकाव्यलोलुप कवि पण या काव्यांत प्रसादमाधुर्य व प्रणयरम्यत्व यांचें मनोज्ञ मिश्रण झालें असल्यामुळें त्याला इतकी प्रलोभनीयता प्राप्त झाली आहे. सारांश, प्राचीन कवींनीं रामायण, महाभारत व भागवत इत्यादि ग्रंथांतील कथानकें खंडकाव्यासाठीं घेतली आहेत.

कथानकांत जशी पुनरावृत्ति तशीच वर्णनांतहि संस्कृत कविसंकेतानुसार पुनरावृत्ति आढळते. यांतील पुष्कळ आख्यानें कीर्तनकारांना उपयुक्त वाटलीं; व ही आख्यानात्मक कथनपर रचना आत्मचिंतनापेक्षां मनोरंजनाच्या दृष्टीनें निर्माण झाली असल्यामुळें त्यांत एक प्रकारची कलात्मकता व कमनीयत्ता प्रत्ययाला येते.

येथपर्यंत प्राचीन खंडकाव्यांचें विवेचन केलें. आतां आपण अर्वाचीन खंडकाव्यांकडे वळूं. आरंभीं आधुनिक काव्यांत पौराणिक वळण सुटलें असलें तरी भाषांतर-रूपांतरांची प्रथा सर्वथा मोडली नाहीं. कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचें ' मेघदूत ' बजाबा प्रधान यांची ' देवसेनी ' व कीर्तिकर यांचीं ' इंदिरा ' हीं खंडकाव्यें रूपांतरित आहेत. या काव्यांवर वामन-मयूरांच्या रचनेची छाप दिसून येते. सारांश, हीं खंडकाव्यें प्रतिभेच्या दीप्तीनें प्रकाशित झालेलीं नसलीं तरी मराठी कथनपर काव्याची प्रगति कोणत्या दिशेनें होणार याची निदर्शक आहेत.

स्वतंत्र्य कथनपर खंडकाव्यें लिहिणाऱ्या कवींत लेंभे यांना मानाचें स्थान दिलें पाहिजे. अद्भुतरम्य कथानकें कल्पून त्यांची संस्कृतप्रचुर व सालंकार भाषेंत गुंफण करण्यांत लेंभे कुशल होते. त्यांचें ' सुरतरंगिणी ' हें स्वतंत्र खंडकाव्य आहे. नर्मदातटाकाच्या पुलिनांत महेश्वर व सुरतरंगिणी यांची दृष्टादृष्ट झाली व त्यांच्या मनांत प्रेमाचा प्रादुर्भाव झाला. पुढें तिच्या चंद्रलेखा नांवाच्या चतुर मैत्रिणीनें आपल्या प्रणयमोहित सखीला चित्रांनीं महेश्वराची ओळख पटविली व तिच्या करवीं दोघांचें मीलन झालें. पुढें नौकाविहार करण्यासाठीं तीं दोघे गेलीं असतां महापुरांत सांपडून गतप्राण झालीं. अशी या काव्याची उभारणी झाली आहे. हें कथानक मूलतः जितकें अद्भुत तितकेंच असंभाव्य वाटतें. या काव्यावर उषास्वयंवराची छाप पडली असून पदलालित्य हा एकच गुण त्यांत आढळतो. त्यांचें ' आनंदकंद ' हें खंडकाव्य वाचत असतां विठ्ठलाच्या बिल्हणचारिताची

आठवण होते. एकंदरींत लेंभे यांचीं खंडकाव्यें स्वभावलेखन, रसाविष्करण यांपेक्षां ललित भाषाशैलीमुळेंच आकर्षक वाटतात. मोगरे यांनीं 'वृंदा' हें एकच सामाजिक खंडकाव्य लिहिलें आहे. या काव्यांतील सारींच पात्रें सात्त्विक वृत्तीचीं असून त्यांत एका वैश्य कुटुंबांतील दृश्य दाखविलें आहे. पण लेंभे व मोगरे यांच्या खंडकाव्यापेक्षां चंद्रशेखरांचें 'काय हो चमत्कार' हे खंडकाव्य अधिक सुंदर आहे. या काव्यांत शिवबा व जिऊ यांच्या दिव्यप्रेमाची करुण कहाणी सांगितली आहे. हृदयंगम रसाविर्भाव व रमणीय रचनासौष्ठव या दृष्टीनें हें काव्य अनन्यसामान्य वाटतें. रे. टिळक यांचें 'सुशीला' हें खंडकाव्य उदात्त असून त्यांत बाह्यसौंदर्यापेक्षां अंतरंग सौंदर्याची महति गाईली आहे. बळवंतराव करंदीकर यांचे 'प्रेमालेख्य' हें एक उत्कृष्ट खंडकाव्य असून त्यांत प्रेमाची सूक्ष्म मीमांसा केली आहे. माधवज्यूलियन यांचें 'विरहतरंग' हें काव्य कै. बा. अ. भिडे यांनीं म्हटल्याप्रमाणें 'नटवें व नखरेबाज' आहे. 'इंग्रजी व संस्कृत' सारस्वतांच्या वाचनानें सुसंस्कृत झालेल्या मनांत यौवनाच्या पहिल्या बहरांत आणि महाविद्यालयाच्या खुल्या निर्विशंक व भावपोषक वातावरणांत उद्भुत होणारें प्रेम, स्थिति व त्यांचें परिवर्तन हा या काव्याचा विषय आहे. प्रभाकर व इंदु यांच्यांत शारीर सुखाची लालसाच प्रभावी ठरून त्यांच्या मीलनांत काव्याची परिसमाप्ति झाली आहे. या काव्यांतील नायकनायिका प्रणयपरायण असून आगरकरी शिष्यत्वाच्या बुरख्याखालीं आपली विलासलोलुपता व्यक्त करतात. तथापि या काव्यांत पांडित्य, लालित्य व प्रणयरम्यत्व यांचा त्रिवेणीसंगम झाला आहे. याच ठिकाणीं यशवंत यांची 'बंदिशाळा', गिरीशांची 'कला,' 'अभागीकमल' व 'आंबराई' यांचाहि उल्लेख करावयाला हरकत नाहीं. सारांश, समाजाचें सर्वांगीण निरीक्षण करून कथनपर सामाजिक खंडकाव्यें अधिक प्रमाणांत लिहिलीं जाणें आवश्यक आहे असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं.

सामाजिक खंडकाव्याप्रमाणेंच ऐतिहासिक खंडकाव्येंहि अर्वाचीन कवींनीं लिहिलीं आहेत. त्यांत विनायकांना श्रेष्ठ स्थान द्यावें लागेल त्यांच्या खंडकाव्यांत स्वदेश व स्वधर्म यांविषयींचा उत्कट अभिमान दिसून येतो. विनायकांचें 'वीरमती' हें काव्य पौरुषोत्साहप्रेरक आहे. औरंगजेबाचा प्रसिद्ध मांडलिक जोधपूरचा राणा जसवंतसिंग हा एकदां समरास पाठ दाखवून माघार फिरला असतां त्याच्या मानधन पत्नीनें त्याची निर्भत्सना केली. या विषयावर १०२ आर्यांचें हें काव्य लिहिलें आहे. विनायकांनीं या काव्यांत वीरमती या तेजस्विनी वीर युवतीचें स्फूर्तिदायक चित्र रेखाटलें आहे. मानधन महिला कर्तव्यच्युत पतीला पराक्रमाची प्रेरणा कशी देतात हें सांगितलें आहे. 'वीरमती' या काव्यांत विनायकांनीं स्वदेशाचा अभिमान तसाच 'ध्यास कीं भास' या काव्यांत स्वधर्माचा आदर व्यक्त केला आहे. अकबर बादशहाच्या मायावी राज्यकर्तृत्वाला भुलून पुष्कळ रजपूत वीरांनी यावनी धर्माचा स्वीकार केला. त्यांपैकीं एकाचा पश्चात्ताप या काव्यांत वर्णिला आहे. तो रजपूत वीर विचारांत मग्न असतां एक तरुणी त्याला दिसली. तिनें, स्वधर्मरक्षण हेंच श्रेयस्कर असून त्यांतच मरणहि पतकरावें असा त्याला सदुपदेश केला व ती रमणी गुप्त झाली. 'मोहानंतर' या काव्यांतहि विनायकांनीं युवतींच्या मोहपाशांत सांपडून क्षात्रियधर्माला पराङ्मुख न होण्याचा ऊर्जस्वल संदेश दिला आहे. एकंदरींत, विनायकांचीं ऐतिहासिक खंडकाव्यें स्वदेश व स्वधर्म यांचा निस्सीम अभिमानानें प्रेरित होऊन लिहिलीं असल्यामुळें तीं स्फूर्तिदायक वाटतात. अनंततनयांनीं 'बंधविमोचन' हें एक चांगलें खंडकाव्य लिहिलें आहे. या काव्यांत कवीनें सरासरी दोनशें वर्षांपूर्वीच्या समाजाचें व तत्कालीन धार्मिक मताचें शब्दचित्र रेखाटलें आहे. दुर्दैवानें धर्मभ्रष्ट झालेली पत्नी व तिचा धर्माभिमानी पति यांच्यातील संवाद विचारप्रवर्तक वाटतो. ती आपल्या रूपचारुतेंत व हृदयसौंदर्यांत कांहीं

अंतर पडलें नाहीं. म्हणून आपला स्वीकार करण्याविषयीं पतीला विनवीत आहे. पण तो माझ्या सहवासांत राहूं नकोस असें सांगत आहे. कारण, " सहवासाचें फल कामुकता तनुस्पर्श तो मग पुढती । तनुस्पर्शनें अतनूची त्या सतनु सुतनु गे । उत्पत्ती." (हृदयतरंग भा. ३) असें तिला बजावतो. धर्मांतरामुळें तूं मृत झालीस व आतां माझें तरी या जगांत काय विलोभन राहिलें आहे. मीहि तुझ्याबरोबर निघून जातो असा या काव्याचा कारुण्यपूर्ण शेवट केला आहे. या काव्यांत धर्म व प्रेम यांचा झगडा वर्णन केला आहे. सावरकरांच्या 'कमला' या काव्यांत वीर व शृंगार यांचा संकर झाला आहे. तात्पर्य, अधुनिक काव्यांत विनायक, अनंततनय व सावरकर यांनीं ऐतिहासिक खंडकाव्यें लिहिण्याकडे लक्ष पुरविलें आहे.

सामाजिक व ऐतिहासिक खंडकाव्यांप्रमाणें विडंबनात्मक खंडकाव्येंहि अधुनिक कवींनीं लिहिलीं आहेत. विसंगत वस्तु किंवा व्यक्ति यांचें वक्रोक्तीच्या सहाय्यानें उपहासात्मक वर्णन करतां येतें आणि तद्वारां दोषदिग्दर्शन करून समाजसुधारणेचें कार्य साधतां येतें. ड्रायडननें म्हटलें आहे:-" To tell men of their foulest faults, To laugh at their vain deeds and their vainer thoughts "—लोकांच्या अत्यंत गर्हणीय दोषांचें यथेच्छ आविष्करण करणें आणि त्यांच्या आत्मश्लाघापर कृत्यांची व विचारांची टर उडविणें हीं दोन्हीं कार्यें उपहासाला अत्यंत परिणामकारकरीतीनें करतां येतात. उपहासाचें प्रखर शस्त्र जर कुशलतेनें वापरलें तर अज्ञानध्वंसनाचें व समाजसुधारणेचें कार्य साधतां येतें. वस्तुविकृतिदर्शन हा उपहासाचा आत्मा आहे. पण तें करितांनां सहृदयता व सदभिरुचि यांचें उल्लंघन कवीकडून होतां कामा नये. विडंबनात्मक खंडकाव्याला प्रारंभ मोगरे यांनीं केला असें म्हणतां येईल. त्यांनीं 'पदवीचा पाडवा', 'मेथाजीची मजलस' व 'अभिनव धर्मसंस्थापना' हीं तीन काव्यें

लिहिलीं. सुश्लिष्ट रचना व सूक्ष्म विनोद या गुणामुळें हीं काव्यें मनोरम वाटतात. 'पदवीचा पाडवा' हे काव्य प्रदीर्घ आहे. रावबहादूर या पदवीसाठीं हुरळून गेलेल्या भोलानाथ सुखात्मे या नांवाच्या एका श्रीमंत गृहस्थाला गुंडभट, नरसोपंत घमंडे व बंडूनाना यांनीं कसें लुबाडलें याचें या काव्यांत वर्णन केलें आहे. हे तिघेहि स्वार्थसाधु असून भोलानाथाच्या पदवीलोलुप स्वभावाचा फायदा घेतात. शेवटीं सहस्रबुद्धे या नांवाचा एक गृहस्थ भोलानाथाला पदव्यांचें वैय्यर्थ्य पटवून देतो व "पदवीमुळें न साजे सुयश, यशानेंच साजतें पदवी" असा सदुपदेश करतो. हें काव्य मानवी स्वभावावर अधिष्ठित असल्यामुळें मनोरंजक वाटतें. मेथाजीची मजलस व अभिनवधर्मसंस्थापना हीं काव्यें क्षणिक विषयावर असल्यामुळें त्यांचे महत्त्व कमी वाटतें. अनंततनय यांनीं 'स्वर्गाच्या द्वारांत' या खंडकाव्यांत नामदार, देशभक्त, कवि, समाजसुधारक, अधःपतित तरुणी व मुत्सद्दी यांचा औपरोधिक समाचार घेतला आहे. या काव्यावरून कवीचें समाजनिरीक्षण किती सूक्ष्म होतें याची प्रचीति येते. माधवज्यूलियन यांनीं 'सुधारक' व 'नकुलालंकार' हीं दोन वक्रोक्तिप्रचुर काव्यें लिहिलीं आहेत. 'सुधारक' या काव्यांत सुधारणेची जोरदार तुतारी फुंकली असून त्यांत ध्येयवादाची दीप्ति दृग्गोचर होते. 'नकुलालंकार' या काव्यांत नकुलराव दंडे या शामलवदुर्विदग्ध पंडिताचें चरित्र कथन केलें आहे. 'नकुलालंकार' या काव्यांतील विनोद विद्वेषावर अधिष्ठित आहे असा भास होत असल्यामुळें तो विशुद्ध वाटत नाहीं. दंडे, ढिसाळ, चिवडे यांचे स्वभाव जितके तिरस्करणीय तितकेच सत्यभामा, लक्ष्मी, क्षिप्रा यांचे स्वभाव आदरणीय वर्णिले आहेत. यावरून माधवज्यूलियन यांचें अभिजात औदाक्षिण्य या उपहासपर काव्यांतहि दिसून येतें. एकंदरींत, मोगरे, अनंततनय व माधवज्यूलियन यांनीं विडंबनात्मक खंडकाव्यें लिहिण्याचा यशस्वी प्रयत्न केला आहे.

विडंबन काव्याप्रमाणेंच मोगरे यांनीं वैलापिक काव्यें लिहिण्यांतहि नैपुण्य व्यक्त केलें आहे. त्यांनीं फर्ग्युसन, दयानंद, चिपळूणकर प्रभृति विख्यात व्यक्तींवर १३ शोककाव्यें लिहिलीं आहेत. कोणत्या ना कोणत्या क्षेत्रांत कां होईना ज्यांनीं कांहीं कर्तृत्व गाजविलें त्यांच्या मृत्यूवर मोगरे यांनीं विलापिका लिहिल्या आहेत. त्यांत जाति, पक्ष व पंथ यांचा त्यांनीं मुळींच विचार केला नाहीं. यावरून त्यांची गुणग्राही रसिकता व निरपेक्ष गौरवतत्परता हे गुण दिसून येतात. मोगऱ्यांच्या काव्यांत भाषासौष्ठव असलें तरी भावनाप्रकर्ष आढळत नाहीं. लेंभे यांची 'शोकावर्त' ही विलापिका अत्यंत हृदयस्पर्शी वाटते. या काव्यांत लेंभे यांनीं अपल्या पत्नीच्या मृत्यूमुळें उत्पन्न झालेले करुणोत्कट विचार ग्रथित केले आहेत. प्रियतमा ही शशिप्रभेप्रमाणें मनोरम असते. गुणसुंदर गृहिणीच्या प्रणयपूर्ण सहवासांत मानवी जीविताला माधवी पौर्णिमेची रमणीयता प्राप्त होते. म्हणून अशा प्रेममय वल्लभेच्या मृत्यूमुळें कवीला दारुण दुःख वाटावें यांत काय नवल ? पत्नीच्या वियोगामुळें 'मदीय तनु शून्य हो हृदय शून्य हो शून्य हो' अशी त्याची स्थिति झाली. लेंभे यांच्या या करुणकोमल काव्यांत भावनोत्कटतेबरोबरच शब्दार्थांची स्फटिकतुल्य निर्मलताहि आढळते. डॉ. कीर्तिकरांच्या 'विलापलहरींत' भावनाची सखोलता असली तरी रचनेची शिथिलता आहे. बा. अ. भिडे यांच्या 'शोकक्षोभ' या काव्यांत पत्निवियोगामुळें प्रियमित्राच्या मनांत आलेले विचार आत्मौपम्यबुद्धीनें ग्रथित केले आहेत. भांडारे यांची 'सखीसंस्मृति', इंदुकांताचें 'विधुरविलाप' व सुमंतांचें 'विरहगीत' हीं काव्येंहि याच विषयावर आहेत. पण या सर्वांपेक्षां लेंभे यांचें 'शोकावर्त' सरसमनोहर वाटतें. हीं सर्व काव्यें बहुंशीं वर्णनात्मक असून त्यांत तात्त्विक विचार फारसे आढळत नाहींत. पण रे. टिळक हे तत्त्वज्ञ कवि असल्यामुळें त्यांच्या 'बापाच्या अश्रूंत' तात्त्विक विचारांचा आढळ होतो. या काव्यांत कवीनें आत्मनिवेदनाच्या

उमाळ्याबरोबरच जीविताच्या नश्वरतेविषयीं आपले विचार ग्रथित केले आहेत. आगाशे यांच्या ' बाष्पांजलींत ' संस्कृत व आंग्ल या काव्यांच्या परिशीलनाचा परिपाक उतरला आहे. एकुलत्या एक मुलाच्या अकालिक निधनाने विव्हल झालेल्या वृद्ध पित्याला किती दुःख होतें हें या काव्यावरून दिसून येईल. त्यांचें ' बिरुदावलि ' हें काव्य न्या. रानडे यांच्या गुणवर्णनाला वाहिलें आहे. आगाशे यांच्या काव्यांत प्रसादरम्यतेपेक्षां पांडित्यप्रकर्षच अधिक प्रत्ययाला येतो. व त्यांच्या काव्यांत कालिदास भवभूति, टेनिसन प्रभृति अभिजात कवींच्या काव्यांतील रुचिर संदर्भ पदोपदीं उमटले आहेत. माधवराव मोडक यांचें ' सुताविरह ' हें कन्यावियोगपर काव्य वात्सल्यरसपूर्ण आहे. सारांश, मोगरे, लेंभे, टिळक व आगाशे यांनी वैलापिक काव्यांत उत्कृष्ट भर टाकली आहे.

तात्त्विक खंडकाव्यांचा विचार करतांना प्रारंभीं कानिटकर यांच्या ' ंमोहलहरी ' या काव्याचा उल्लेख केला पाहिजे. टेनिसनचें ' In Memorium ' व ' केकावलि ' या काव्यांच्या परिशीलनानें हें काव्य लिहिण्याची त्यांना स्फूर्ति झाली असावी. या काव्यांत परमेश्वराचें अगाध सामर्थ्य, अपार रचना चातुर्य व अतुल वैभव यांचें सविस्तर वर्णन केलें आहे. विद्वज्जडतेमुळें हें काव्य क्लिष्ट वाटतें. या कवितेंत कवीची भक्तिप्रवणता उत्कटतेनें दृष्टोत्पत्तीला येते. तथापि वयाच्या १८ व्या वर्षी इतकें प्रज्ञाप्रेरित काव्य लिहिल्याबद्दल कुणालाहि आश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाहीं. चंद्रशेखरांचें ' रंगोपंत हर्षे व चिंतोपंत उदास ' हें काव्य रूपांतरित आहे. मिल्टनच्या अलग्रो (Alegro) व पेन्सेरसो (Penseroso) या काव्यांचा आधार घेऊन कवीनें हें काव्य लिहिलें आहे. पूर्वार्धांत रंगदेवतेची पौराणिक कथा सांगून रंगोपंत हर्षे यांच्या रम्य जीवनक्रमाचें बहारीचें वर्णन केलें आहे. उत्तरार्धांत देवी उदासीनतेचें स्वरूप चित्रित केलें आहे. या काव्याचा पूर्वार्ध जितका चित्तंगम वितकाच उत्तरार्ध

चिंतनशील आहे. भारतीय तत्त्वज्ञानाचें सहाय्य घेऊन सुंदर भाषेच्या सुभग आभरणांनीं सजविलेलें हें काव्य मिल्टनच्या मूळ काव्याइतकेंच सरस वाटतें. अनंततनय यांच्या ‘ शारदाकूतिका ’ या काव्याचाहि तात्त्विक काव्यांतच अंतर्भाव करतां येईल. या काव्यांत कवीनें काव्याची चिकित्सा केली आहे. या काव्याच्या पूर्वार्धांतील आधुनिक कवींवरील टीका कवींच्या अनुदारवृत्तीची निदर्शक आहे. पण उत्तरार्धांतील काव्यमीमांसा व काव्यवाटिकेचें वर्णन उद्बोधक वाटतें. शारदेच्या मुखांतून आधुनिक कवींना “ प्रसाद संभृत सुप्रतिभोज्ज्वल ललितध्वनियुक्त ऐशी । रुचिरपदान्वित सहजालंकृत विशदार्थप्रद तैशी ” अशीं काव्यें त्यांनें लिहिण्याचा उपदेश केला आहे. एकंदरींत अधुनिक कवींत तात्त्विक काव्यरचना करण्याची प्रवृत्ति फारशी आढळत नाहीं.

कथनपर खंडकाव्यांचा ऊहापोह केल्यानंतर आपण आतां वैणिक काव्याचें विवेचन करूं. कोणत्याहि भाषेंत भावगीतें हा काव्याचा आद्य प्रकार असतो. अनावर भावनांची अभिव्यक्ति हा काव्याचा आद्य हेतु आहे. वैणिकांत भावनेची जितकी उत्कटता तितकी दुसऱ्या कोणत्याही काव्यप्रकारांत आढळत नाहीं. Lyric या इंग्रजी काव्यप्रकाराला मराठींत अनेक शब्द सुचविले गेले आहेत. रामराव बाळकृष्ण कीर्तिकार यांनीं लिरिकला लहरी किंवा तरंग हा शब्द सुचविला आहे. प्रा. चापेकर यांनीं गीतक हा शब्द योजित असून प्रो. लागू यांनीं कविगीत हा शब्द मान्य केला आहे. पण भावगीत हा प्रा. पटवर्धन यांनीं सुचविलेला शब्द सर्वमान्य झाला आहे. विशिष्ट प्रसंगीं वीणेच्या अनुरणनाबरोबर गाण्यासाठीं हा काव्यप्रकार निर्माण झाला. भावगीताचें केवळ गायनाशींच नव्हे तर नृत्यकलेशींहि साहचर्य आहे. भावगीतांत भावनेच्या उत्कटतेबरोबरच गीताचें माधुर्यहि असावें लागतें. त्याचप्रमाणें एकपिंडता ( organic unity ) हा भावगीताचा मुख्य गुण आहे. कारण हृदयांतील भावना

एकजिनसी अशी बाहेर आली कीं तिच्यांत एक प्रकारचा त्रुटितपणा येतो. म्हणून भावनोत्कटता, एकपिंडता व नादमधुरता हीं भावगीताचीं प्रमुख लक्षणें सांगता येतील. ड्रिंकवाटरनीं म्हटल्याप्रमाणें, "The characteristic of lyric is that it is the product of the pure poetic energy unassociated with other energies and lyric and poetry are synonimous terms (Lyrical Poetry from Blake to Hardy P. 13) भावगीत हें विशुद्ध अशा कवीच्या भावनात्मक शक्तीचें अपत्य आहे. वैणिक व काव्य हे एकरूप आहेत. भावनोत्कटता हा भावगीताचा आत्माच असल्यामुळें त्याचे विषय अनंत, असंख्य व अमर्याद होऊं शकतील; व ज्या विषयाला पाहून कवीचें मन प्रक्षुब्ध व प्रकंपित होईल तो भावगीताचा विषय होऊं शकेल. यामुळेंच भव्य, रम्य व क्षुद्र अशा सर्व विषयांवर भावगीतें लिहिलीं गेलीं आहेत. प्रा. चापेकर यांनीं भव्यतासूचक गीतांना पद्मजातीय व कल्पनामूलक गीतांना पारिजातकवर्गीय असे भावगीतांचे दोन प्रकार काल्पिले आहेत. भावगीत हें भावनोल्लासात्मक असो किंवा कल्पनाविलासात्मक असो तें श्रुतिसुखद पदलालित्यानें मंडित असणें अवश्यक आहे. पण जयदेव, इंदुकांत व स्विन्बर्न यांच्या प्रमाणें केवळ पदलालित्याकडे लक्ष पुरविणें हेंहि सौंदर्यविघातक आहे. सारांश, भावगीत हा अत्यंत लोकप्रिय व लोभनीय काव्याचा प्रकार असून तो वाग्देवतेच्या ललितविलासाला अत्यंत अनुकूल आहे, यांत शंका नाहीं.

प्राचीन काव्यांत वैणिक (Lyrical) रचना आढळत नाहीं असें नाहीं. एकनाथ, नामदेव व तुकाराम यांची अभंगरचना भावगीतात्मक असून त्यांत विविधताहि पुष्कळ आहे. त्यांच्या आत्मनिवेदनपर अभंगांत त्यांच्या अंतःकरणाचा जिव्हाळा ओतप्रोत भरला आहे. आनंदतनय, अमृतराय व विठ्ठल यांनीं जी पद्यरचना केली आहे त्याचीहि वैणिकांतच

गणना करावी लागेल. शाहिरांच्या लावण्या या प्रेमगीतांचे नमुने आहेत. पण प्राचीन काव्यांतील ही वैणिकरचना अहेतुक असून कलाविलासाच्या हेतूनें प्रेरित होऊन निर्माण झाली असें म्हणतां येत नाहीं. म्हणून पाश्चात्य काव्याचें परिशीलन करून भावगीतात्मक काव्यरचनेची निर्मिती होण्याला केशवसुतांपासून प्रारंभ झाला असें म्हटल्यास तें चुकीचें ठरणार नाहीं.

अधुनिक भावगीतांचा विचार करतांना प्रारंभीं प्रेमगीतांचा ( Love-Lyrics ) उहापोह करूं. कारण भावगीतांत प्रेमगीतांचीं संख्या अधिक आढळते. प्रेम हा मानवजातीला निर्व्याज आल्हाद देणारा नित्यनूतन विषय आहे. अधुनिक कवींत केशवसुतांच्या इतकी उदात्त व उत्कट प्रेमगीतें दुसऱ्या कोणत्याहि कवीनें लिहिलीं नाहींत. पौराणिक कथांच्या आवरणाखालीं लपून प्रणयभावनांचें आविष्करण न करितां आत्माविर्भावात्मक प्रेमगीतें लिहिण्याला प्रारंभ केशवसुतांनीं केला. ‘ प्रणयगीत ’ या कवितेंत ‘ प्रीति जगाचें वसन विणतसे ’ असें म्हणून ‘ नैर्ऋत्येकडील वारा ’ या कावितेंत ‘ प्रीती ही जगतांत कंटकयुता ही एक वल्ली असे ’ त्यांनीं प्रेमाविषयीं असें म्हटलें आहे. प्रेमाच्या संमोहांत रमून जाऊन कर्तव्याला पराङ्मुख होऊं नये हें ‘ कर्तव्य व प्रीति ’ या कवितेंत सांगितलें आहे. ‘ रुष्ट सुंदरीस ’ ही केशवसुतांची एक नादमधूर कविता आहे. या कवितेंत आपल्या कुपित कविकांतेला कृपाप्रसादाची याचना करीत आहे व तिला सांगतो कीं, ‘ प्रीतिविषय तो जर कां परका प्राण्याला जाहला । तयाचा जन्महेतु खुंटला ’ कविच्या हृदयीं जसे गुंगती या कवितेंत कवीच्या हृदयांत कवितेचे मधुबोल जसे गुंगतात, गायकाच्या मतींत सुविलोल ताना झुकतात, तसे माझ्या अंतःकरणांत तुझ्या सौंदर्याचें हृदयंगम विकास आढळतात. तसेंच भृंगाच्या गुंजारवांत जशी मधुलोलुपता खेळते किंवा कोकिलगानांत वसंतशोभेची आसक्ति डोलते, त्याचप्रमाणें [illegible] असें एक प्रेमिक प्रणयिनीला उद्देशून सांगत

आहे. केशवसुतांचें 'मनोहारिणी' हे सर्वोत्कृष्ट प्रेमगीत आहे. या काव्यांत प्रणयिनीचें लावण्य, तिचें प्रेम, तिचें लालित्य—यांचें मनोहर वर्णन केलें आहे व या काव्यांतील

सौंदर्यें शालिन्यें पुतळी । ती रामायण मूर्तिच गमली ।
उदात्त मुद्रा गभीरचर्या । यांही भारतखचितावर्या ।
ती रमणी सद्गुणी । जी ठसलीसे मन्मनीं ॥
तिच्या दर्शनें मन उल्हासे । तिजविण सगळे शून्यचि भासे ॥
म्हणुनी करुनी ध्यानधारणा । अतंर्यामीं बघतो ललना ॥
तीच मनोहारिणी । जी ठसलीसे मन्मनीं ॥

हीं शेवटचीं दोन कडवीं हृदयंगम वाटतात. केशवसुतांच्या काव्यांत प्रेमाचें उदात्त स्वरूप प्रत्ययाला येतें. रे टिळकांनीं फुलांमुलांइतकीं प्रेमगीतें लिहिलीं नसलीं तरी 'अगाध कांहींतरी समज हें अजरामर सुंदरी' या गीतांत प्रेमाचें अद्वैत व अमरत्व विशद केलें आहे. गोविंदाग्रज हे प्रेमाचे शाहीर असून त्यांनीं मराठी भाषेत 'प्रेम-पुराण' रचून ठेविलें आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. प्रेमपाठ, गुलाबी कोडें, पहिलें चुंबन, प्रेम व मरण, स्मृतिगीत, प्रेमकाळ, फुलें वेचलीं पण, व गोफ या काव्यांतून प्रेमाच्या विविध सूक्ष्म छटांचें कारुण्यपूर्ण व कमनीय असें वर्णन आढळतें. 'बी'ची 'बुलबुल' ही कविता करुणकोमल आहे. विनायकांनीं 'विरही' हें एकच उत्कृष्ट प्रेमगीत लिहिलें आहे. रेंदाळकरांची कांहीं प्रेमगीतें जितकीं उत्तम तितकींच उत्तान वाटतात. 'पण निज नीज लाडके आतां बहु रजनी झाली आहे' हें एक उत्कृष्ट प्रेमगीत आहे. तांबे, दत्त, रहाळकर, हनुमंत, यशवंत, गिरीश, माधव ज्युलियन, केशवकुमार, रणदिवे विरकुड यांनीं प्रेमोद्भव, प्रेमनिराशा, प्रेमोपभोग, प्रेमोत्कंठा व प्रेमप्रयाण या प्रेमाच्या विविध स्वरूपांचीं वर्णनें केलीं आहेत. पण केवळ कायिक व कामुक वर्णनानें प्रेमगीतें उत्तान व उन्मादक वाटलीं तरी तीं सदभिरुचि—

संपन्न रसिकाला हीन दर्जाची वाटतात. हें सदैव कवींनीं लक्षांत ठेविलें पाहिजे. सारांश, केशवसुतांच्या प्रेमगीतांतील उदात्तता, गोविंदाग्रजांच्या प्रेमगीतांतील नैराश्यप्रवणता व रेंदाळकरांच्या प्रेमगीतांतील उत्कटता हे गुण अजूनही अनुकरणीय आहेत.

प्रेमाइतकाच वात्सल्य हाहि मानवजातीला चिरंतन आल्हादक असा विषय आहे. वत्सलगीतांत भाषा, विषय, भावना व विचार हे बालवृत्तीला शोभणारे असावे लागतात. पुष्कळ वेळां बालवृत्तीशीं समरस न झाल्यामुळें प्रौढ विचार वत्सल गीतांत आढळतात. ज्या वेळीं कवि आपले विचार बालकाच्या मुखांतून व्यक्त करण्याचा प्रयत्न करितो तेव्हां वत्सलगीतांत वैरस्यकारकता उत्पन्न होते. टागोरांच्या 'Crescent Moon' या काव्यसंग्रहांत असाच प्रकार पुष्कळ ठिकणीं झाला आहे. अधुनिक काव्यांत दत्तांनीं बालगीतें लिहिण्याचा यशस्वी प्रयत्न केला आहे. त्यांचें 'या बाइ या' हें गीत वत्सलगीताचा उत्कृष्ट नमुना आहे. 'बोल बाई बोल ग !' हें बालकवींचें गीतहि बरें आहे. अनंततनयांच्या 'लक्के पैथे लक्के आंबे' व 'पुथुन टाकला' या कवितेंत वत्सलरसाचा आविष्कार झाला आहे. त्याचप्रमाणें, इ. स. गोखले, तांबे, भवानीशंकर पंडित, सरंजामे, कोलते यांनींहि वत्सलगीतें लिहिलीं आहेत. शिशुगीतांप्रमाणेंच 'अगाई गीतांतहि' वत्सलरस प्रतीतीला येतो. इंग्रजी भाषेंत स्कॉट, पेड्रॉ-इक कॉलम, टेनिसन, सरोजिनी नायडू यांनीं उत्कष्ट अंगाईगीतें लिहिलीं आहेत. गोविंदाग्रजांचें 'घुंगुरवाळा' हें मृदुमधुर अंगाईगीत निरुपम आहे.

वत्सलगीताप्रमाणेंच नाट्यगीतें (Dramatic Lyrics) हाहि काव्याचा आकर्षक रचनाप्रकार आहे. नाट्यगीत हें आत्मलक्षी नसून परलक्षी असतें. अशा प्रकारच्या काव्यांत कवीला आपलें व्यक्तित्व लपवून [illegible] पात्रांच्या मखानें बोलावयाचें त्याच्याशीं पूर्णपणें

समरस व्हांवें लागतें. यामुळें शुद्ध नाट्यगीत लिहिणें हें बरेंच कठीण आहे. इंग्रजी भाषेत रॉबर्ट ब्राउनिंग यानें अशा प्रकारचीं नाट्यगीतें लिहिण्याचें प्रशंसनीय चातुर्य प्रगट केलें आहे. तांबे यांचीं 'राजकन्या व तिची दासी,' 'मुषाफिर,' व 'आतां गडिफू दादाशीं' हीं नाट्यगीतें विशेष उल्लेखनीय आहेत. प्रा. मायदेव, यशवंत, गिरीश यांनींहि नाट्यगीतें लिहिलीं आहेत. राधाकृष्णविषयक गीतांचाहि नाट्यगीतांतच अंतर्भाव करतां येईल. आनंदराव टेकाडे व अनंततनय यांनी राधाकृष्णविषयक गीतें विपुल लिहिलीं आहेत. टेकाडे यांच्या गीतांत पुनरुक्ति हा दोष असल्यामुळें अनंततनयांची राधाकृष्णविषयक गीतेंच अधिक चांगलीं वाटतात. त्यांनी श्रीकृष्णदर्शनोत्कंठिता राधा (ह. त. भा. २ पृ. ६१); वंजुलकुंज, मधुवन, वद वाट किति तव पाहूं? व राधाप्रसादन हीं गीतें लिहिलीं आहेत. त्यांच्या गीतांवर प्राचीन कवींची छाप पडली आहे. पौराणिक नाट्यगीतांप्रमाणेच सामाजिक व ऐतिहासिक नाट्यगीतें परिणामकारक होऊं शकतात. अनंततनयांचीं 'गोखलका बापू' हें, रावबाचें 'राज्यदान', 'कल्याणची कल्याणी' व 'छत फोडतांना' हीं नाट्यगीतें उल्लेखनीय आहेत.

नाट्यगीतांनंतर आपण राष्ट्रीय गीतांचा विचार करूं. राष्ट्रीय गीतांत ( Patriotic Lyrics ) कवीच्या मनांत देशभक्तिच्या भावनेचा आविष्कार झालेला असतो. स्वदेशाविषयीं आंतरिक तळमळ असल्याखेरीज अशीं राष्ट्रगीतें निर्माण होत नाहींत. केवळ आपल्या काव्यांत वैचित्र्य आणण्यासाठीं जे कवि राष्ट्रगीतें लिहितात त्यांच्या काव्यांत जिवंतपणा व जिव्हाळा वाटत नाहीं. राष्ट्रीय गीतांत आपल्या देशांतील पराक्रमी पुरुष, स्त्रिया, पावनक्षेत्रें व प्रसिद्ध घटना यांचीं वर्णनें आढळतात. मेकॉले, स्कॉट, कॅंबेल व टेनिसन यांनीं अशा प्रकारचीं गीतें लिहिलीं आहेत. विनायकांच्या 'शिवराजदर्शन', 'महाराष्ट्र लक्ष्मी', 'हतभागिनी' व

'शिवसंदेश' हीं गीतें देशभक्तिप्रधान आहेत. त्यांनीं गुंफिलेली युवतिरत्नमालाहि स्फूर्तिदायक आहे. विनायकांची अहल्या, पन्ना, पद्मिनी, संयोगिता, राणी दुर्गावती, कृष्णाकुमारी हीं युवतिगीतें स्वाभिमानपोषक व स्त्रीदाक्षिण्यसूचक आहेत. विनायकाप्रमाणेंच गोविंदांनींहि राष्ट्रीय गीतें लिहिलीं आहेत. शिवाजी व टिळक इत्यादिकांवर लिहिलेलीं गीतें तेजस्वी आहेत. माधवांची राष्ट्रीय गीतें जितकीं भव्य तितकींच भावनोत्कट आहेत. त्यांच्या 'सवाई माधवरावांचा मृत्यु, गोखल खा, पानिपतचा सूड व जिवबादादा' हीं गीतें उल्लखनीय आहेत. श्रीकृष्णांचें 'सुवर्ण पिंपळपान' हें गीत लालित्यामुळें ओजस्वी वाटत नाहीं. टेकाडे, तिवारी, बेहरे, साने, यांनीं राष्ट्रीय गीतें लिहिलीं आहेत. Beeच्या कमला या करुणकोमल काव्याचाहि उल्लेख करावयाला हरकत नाहीं. कोल्हटकरांचें 'महाराष्ट्रगीत' निरुपम असून त्यांत महाराष्ट्राच्या सर्वांगीण वैभवाचें सुंदर वर्णन आढळतें. सारांश, अधुनिक काव्यांत राष्ट्रीय व ऐतिहासिक गीते पुष्कळ आढळतात. हें खरें, पण पुष्कळ वेळां त्यांत नकली अभिमान व नाटकी आवेश आढळतो. अजूनहि इतिहासांतील उज्ज्वल प्रसंग व उदात्त पुरुष यांच्या अनुषंगानें प्रभावशाली व परिणामकारक राष्ट्रीय किंवा ऐतिहासिक गीतें लिहितां येण्याजोगीं आहेत.

अधुनिक काव्यांत गूढगुंजनपर ( Mystic ) काव्याची प्रथा केशवसुतांनीं पाडली. इंग्रजींत ज्याला Mysticism असें म्हणतात त्याला श्री. केळकरांनीं 'शून्यसंशोधन' व प्रा. चाफेकरांनीं 'गूढगुंजन' असे दोन शब्द सुचविले आहेत. त्यांपैकीं 'गूढगुंजन' हा अधिक सर्वमान्य झाला आहे. केशवसुतांनी अशा प्रकारचीं गीतें लिहिण्याची स्फूर्ति ब्लेक या कवीपासून झाली असावी. गूढगुंजनात्मक काव्यांत अज्ञात अशा अनंताशीं तादात्म्य, नक्षत्रतारकांशीं सामरस्य, अध्यात्मचिंतन, विश्वाच्या नश्वरतेविषयीं खेदोद्गार व आत्मसामर्थ्याविषयींचे दर्पोद्गार हे विशेष

दिसून येतात. केशवसुतांची प्रवृत्ति तात्त्विक असल्यामुळें त्यांना अशा प्रकारचीं गीतें लिहितां आली. त्यांची ' झपूर्झा ' व ' हरपले श्रेय ' हीं गीतें उत्कृष्ट आहेत. केशवसुतांच्या अनुकरणानें गोविंदाग्रजांनीं ' फुटकी तपेली ' हे निरर्थक गूढगीत लिहिलें आहे. १९१३ सालीं रवींद्रनाथ टागोर यांच्या ' गीतांजलीला ' नोबल पारितोषक मिळाल्यामुळे अशीं शून्य संशोधनात्मक गीतें लिहिण्याला सुमंतप्रभृति कवींना उत्तेजन मिळालें. गूढगीतें लिहिणाऱ्या कवींत Bee व तांबे यांचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे Bee नीं पिंगा व वेडगाणे हीं दोन चांगलीं गीतें लिहिलीं आहेत. ' वेडगाणें ' या काव्यांत " म्लानपणाविण लावण्य । क्षीण-पणाविण तारुण्य । मंगल मांगल्यायतन । नित्यानंद निराकरण । विश्ववै-भवालंकरण ( फुलांची ओंजळ पृ. २० )- असें स्वयंपणाचें वर्णन केलें आहे. देशपांडेप्रभृति विदर्भीय कवींनीं प्रतीकात्मक गूढगीतें लिहिण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांपैकीं कांही अर्थपूर्ण, कांहीं अर्थशून्य व कांहीं अनर्थ-कारक आहेत. अधुनिक कवींचीं हीं गीतें बव्हंशीं अनुकरणात्मक असल्यामुळें त्यांत अन्तःप्रेरकता ( Sincerity ) दिसत नाहीं. यामुळें अशा प्रकारचीं गूढगुंजनात्मक गीतें जितकी कमी लिहिलीं जातील तितकेच श्रेयस्कर होय.

गूढगुंजनात्मक गीताप्रमाणेंच वैलापिक गीतें (Elegiac Lyrics) अधुनिक कवींनीं विपुल लिहिलीं आहेत. रानडे, गोखले, टिळक, मोगरे, गोविंदाग्रज इत्यादि प्रथितयश व्यक्तींवर मासिकांतून व वर्तमानपत्रांतून शोकगीतें प्रसिद्ध झालीं आहेत. वैलापिक गीतांपैकीं ' केवढें क्रौर्य हें ' ( रे. टिळक); राजहंस माझा निजला ( गोविंदाग्रज ) व पंडित ( वसंत ) ही तीन शोकगीतें चिरंतन महत्त्वाचीं आहेत. चंद्रशेखरांच्या ' गुणसीमाभीमा ' व ' युवराजवियोग ' या दोन शोकगीतांचा उल्लेख करणें क्रमप्राप्त आहे. तथापि प्रासंगिक शोकगीतें फारशीं महत्त्वाचीं वाटत नाहींत.

अर्वाचीन काव्यांत व्रजगीतांचा ( Pastoral Lyrics ) एक प्रकार आढळतो. अशा काव्यांत खेडवळ लोकांच्या भावनांचें चित्रण त्यांच्याच भाषेत केलेलें असतें. सुशिक्षितांप्रमाणेंच अशिक्षित लोकांच्या मनांत कामक्रोधादि विकार असतात व त्यांचें आविष्करण करण्यासाठीं हा काव्यप्रकार उदयाला आला. इंग्रजी भाषेंत बर्न्स ( Burns ) कवीनें अशा प्रकारचीं भावनिर्भर गीतें लिहून अमूप कीर्ति संपादन केली आहे. ग्रामीण जीवनांतील नित्य कार्यक्रम, वार्षिक कार्यक्रम, दसरा, शिमगा, नागपंचमी इत्यादि आनंदाचे प्रसंग हे व्रजगीतांचें विषय आहेत. प्रणय हाहि ग्रामीणजीवनाला परिचित असतो. अशीं काव्यें लिहितांना व्रज भाषेशीं कवीचा परिचय पाहिजे. चंद्रशेखराच्या 'काय हो चमत्कार' या काव्यांतील कथानक ग्रामीण असल्यामुळें ही जानपद भाषा त्यांनीं उत्कृष्ट रीतीनें योजिली आहे. यशवंतांचें न्यारिचा वकुत होईल। मैतरिणी बिगि बिगि चाल' हें गीत मनोहर आहे. त्याचप्रमाणें, गिरीश, ठोकळ, सुरेशप्रभृति कवींनीं व्रजगीतांत चांगलीं भर घातली आहे. पण पुष्कळ वेळां आपल्या काव्यसंग्रहांत वैचित्र्य आणण्यासाठीं कवि व्रजगीतें लिहितात. कारण नागरजीवनांत निरंतर रममाण झालेल्या कवींना ग्रामीण जीवनाचें प्रामाणिकपणें कसें वर्णन करतां येईल यांची शंका वाटते. यामुळें अधुनिक काव्यांतील पुष्कळ जानपदगीतें जितकीं निर्जीव तितकीच नीरस उतरलीं असल्यास त्यांत काय नवल?

व्रजगीताप्रमाणेंच स्त्रीगीतांचाहि प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. स्त्रीगीतांत स्त्रीजीवनाचें चित्रण असून त्यांत त्यांच्या हृदयांतील मार्दव व माधुर्य, नम्रता व निरागसता, सहानुभूति व सौंदर्यलोलुपता या गुणांचें आविष्करण झालें पाहिजे. आतांपर्यंत स्त्रीगीतांचे राधाकृष्णाचा प्रेमसंबंध, सीतेचे डोहाळे असे पौराणिक विषय होते. महाराष्ट्रभाषाभिमानमयूर कृ. ना. अठल्ये यांनीं 'सासरची पाठवणी' व 'माहेरचें मूळ, या काव्यांत

स्त्रियांच्या मनोवृत्तीचें मोहक चित्र रेखाटलें आहे. झोपाळ्यावरील गाणीं, भोंडल्याचीं गाणीं, खेळांतील गाणीं हीं बहुधा निरर्थक असलीं तरी त्यांत स्त्रीहृदयाचें प्रतिबिंब दृग्गोचर होतें. हुंडा, जातिभेद, गरिबीश्रीमंती, प्रौढाविवाहाच्या अतिरेकामुळें होणारें मानसिक असमाधान, प्रेमभंग इत्यादि विषयांवर स्त्रियांच्या भावना वर्णन करणें हें पुरुषांपेक्षां स्त्रियांना सुलभ आहे. तथापि, मानसगीत सरोवर, अभिनवस्त्रीगीत, अभिनव काव्यमाला भा. ५ यांतील गीतें यांत महिलांच्या मनोवृत्तीचें आविष्करण झालें आहे. पण त्यांतील पुष्कळ गीतें अनुकरणात्मक आहेत. म्हणून काव्यक्षेत्रांत पदार्पण करून स्त्रीभावनांचें वस्तवादर्शी चित्रण करणें हे प्रतिभाशाली कवयीत्रींचें कर्तव्य आहे.

अर्वाचीन मराठी काव्यांतील रचनाप्रकारांचा येथपर्यंत संक्षिप्त विचार झाला. आतां Sonnet या पाश्चात्य काव्यप्रकाराचा उहापोह करू. मराठींत 'सॉनेटला' चतुर्दशक, सुनीत, स्वनितक, स्वनीत, गीतिका अशीं नांवे सुचविलीं गेलीं आहेत. त्यांपैकी प्रा. गोखले व प्रा. पटवर्धन यांनीं सुचविलेला 'सुनीत' हा शब्द समर्पक आहे. सुनीताची उत्पत्ति इटली देशांत असून त्याच्या जनकत्वाचा मान कांहीं जण बॉडिग्टनला देतात तर कांहींच्या मतें तो मान गिटोकडे जातो. पेट्रार्क या प्रख्यात इटॅलियन कवीच्या प्रणयरम्य सुनीतांमुळेंच हा काव्यप्रकार विशेष प्रचलित व प्रिय झाला. इंग्रजी भाषेंत शेक्सपीअरच्या पूर्वी सुनीत हें शृंगारिक विषयालाच वाहिलेलें आहे. पण शेक्सपीअर व मिल्टन यांनीं सुनीतांतून उदात्त विचार ग्रथित करावयाला प्रारंभ केला. त्यानंतर ड्रायडन, वर्डस्वर्थ, शेले, कीट्स, ब्राऊनिंग, टेनिसन, अर्नोल्ड रोझेटी ब्रिजिस् व मेसफील्ड यांनीं सुनीतसंपदेंत बहुमोल भर घातली. त्यांपैकीं कित्येकांनीं ओळींची संख्या, यमकांचा क्रम यांत कमी अधिक फेरफार केले असले-तरी शेक्सपीअरचाच नमुना सर्वमान्य आहे. पेट्रार्की धर्तीच्या सुनीतांत

पहिल्या आठ ओळींचा एक गट उर्फ अष्टक व बाकीचा सहा ओळींचा दुसरा गट उर्फ 'षट्क' असे दोन अगदीं पृथक् भाग आहेत. अष्टकांत मात्र फक्त दोनच तऱ्हेचीं यमकें असतात, पण षट्कांत मात्र दोन किंवा तीन यमकें चालतात. शेक्सपीरीयन शैलीच्या सुनीतांत चार चार ओळींचे तीन गट व शेवटीं यमकयुक्त दोन ओळी असतात. त्यांपैकीं चारा चारांच्या गटांतील यमकें १ व ३, २ व ४ असून कल्पनाचारुता हा त्यांच्या शैलीच्या सुनीतांतील वैशिष्टय आहे. प्रा. श्री. बा. रानडे यांनीं पेट्रार्की पद्धतीला 'पद्मपद्धति व शेक्सपीअरच्या सुनीताला 'गोपालपद्धति अशी नांवे दिलीं आहेत. कोणत्याहि सुनीतांत भावनेचा प्रस्ताव, नंतर त्या भावनेचा विकास व त्या भावनेची चमत्कृतिजनक विपर्यासात्मक परिसमाप्ति हे तीन प्रमुख घटक आहेत. मराठी भाषेंत सुनीताच्या जनकत्वाचा मान केशवसुतांच्या कडे जातो. 'ताजमहाल व मयूरासन' हें त्यांनीं लिहिलेलें पहिलें सुनीत होय. त्यांचें 'प्रतिभा' हें सुनीत विरचनकौशल्याच्या दृष्टीने अप्रातिम आहे. केशवसुतांनीं सुनीतें लिहितांना शार्दुलविक्रीडित या भव्यगंभीर वृत्ताचा स्वीकार केला. केशवसुतांच्या नंतर तांबे, रहाळकर, रेंदाळकर व माधवानुज यांनीं 'सुनीतरचना केली आहे. तांबे यांनीं 'प्रियेस' या विषयावर सात सुनीतें लिहिलीं व रेंदाळकरांनीं आपलें 'बाष्पबिंदु' हें खंडकाव्य सुनीतांत लिहिलें. गोविंदाग्रज व बालकवि यांनी सुनीताकडे फारसें लक्ष पुरविलें नाहीं. नाहीं म्हणावयाला गोविंदाग्रजांचें 'ती कोण' व बालकवींचें 'प्रेमलेख' या दोन नितांतरमणीय सुनीतांचा उल्लेख केला पाहिजे. मनोहर, गिरीश, काव्यविहारी, यशवंत, माधवज्यूलियन, माडखोलकर व केशवकुमार यांनीं सुनीतरचनेंत प्रशंसनीय यश संपादन केलें. इतकेंच नव्हे तर अनंततनय, साधुदास, चंद्रशेखर व श्रीकृष्ण या जुन्या पिढींतील कवींवर देखील सुनीतरचनेची मोहिनी पडली आहे. पण

सुनीताच्या वृत्तरचनेंत व यमकरचनेंत एकमत आढळत नाहीं. केशवसुतांनीं यमकाच्या बाबतींत द्विपदीची परंपरा कायम राखली. पण पुढें चतुर्दशपदी सुनीत रचतांना मिल्टनचा कित्ता पुढें ठेविला. तांबे व रहाळकर यांनीं शेवटचा श्लोकार्ध सयमक ठेवला. पण रेंदाळकरांनीं निर्यमक सुनीतें लिहिलीं. यशवंत, गिरीश व माधवज्यूलियन यांनीं अनेक प्रकारची यमकरचना करून पाहिली आहे. सुमंतांनीं सुनीतांत 'भूपति' या जातीची योजना केली. दिंडी, पृथ्वी, वसंततिलका, मंदाक्रांता, साकी इत्यादि अक्षरगणात्मक व मात्रागणात्मक वृत्तांतून सुनीतरचना झाली आहे. यामुळें मराठींत यमक व वृत्त यांबाबतींत कांहींतरी निश्चित संकेत ठरले पाहिजेत. सुनीत हा प्रकार विचारगंभीर असल्यानें त्याला शार्दूलविक्रीडित, पृथ्वी व मंदाक्रांता हीं तीन वृत्तें शोभण्याजोगीं आहेत व इंग्रजींतील यमकरचना पाळणें हेंच श्रेयस्कर होय. कारण काव्यसृष्टींत कवीचें निरंकुशत्व नेहमींच आल्हादक वाटत नाहीं. सारांश, सुनीताचा कांहीं टीकाकारांनीं अधिक्षेप केला असला तरी हा रचनाप्रकार मराठी भाषेंत आतां सुप्रतिष्ठित झाला आहे यांत शंका नाहीं.

सुनीतानंतर उद्देशिकांचें ( ode ) विवेचन करणें क्रमप्राप्त आहे. उद्देशिका विचारप्रधान असून तींत तत्त्वज्ञान, नीतिविवेचन इत्यादिं गहन विषय येऊं शकतात. उद्देशिकेंत भावनेपेक्षां विचाराला प्राधान्य असतें व तिची भाषाहि प्रगल्भ असावी लागते. इंग्रजी भाषेंत वर्डस्वर्थ, शेले, कीट्स, टेनिसन यांनीं उद्देशिका लिहिल्या आहेत. प्राचीन काव्यांत अशा प्रकारची रचना आढळत नाहीं असें नाहीं. स्तोत्रें, आरत्या व अष्टकें यांचीं उद्देशिकांतच गणना करितां येईल. निरंजन माधवांची स्तोत्ररचना ही उद्देशिकेची उदाहरणें आहेत. तथापि या प्राचीन काव्यांत भाविकता व सांप्रदायिक दृष्टी प्रभावी आहे. केशवसुतांची 'नैर्ऋत्येकडील वारा' ही एक उत्कृष्ट उद्देशिका आहे. चंद्रशेखरांची 'कवितारति' व 'हिंद-

वंदना' आणि Bee ची 'कविवंदन' माधवराव मोडक यांची 'अद्‌भुतकिमयागार' या काव्यांची मराठीं भाषेंतील सुंदर उद्देशिकांत प्रामुख्यानें गणना केली पाहिजे. सारांश, केशवसुत, चंद्रशेखर, Bee व माधवराव मोडक यांनीं चांगल्या उद्देशिका लिहिल्या आहेत.

निरंजन माधवांनीं संस्कृत भाषेंतील भारत-चंपूप्रमाणें 'सुभद्राचंपू' लिहिला आहे. 'गद्यपद्यादिमिश्रेण चम्पुरित्याभिधीयते' अशी चंपूची व्याख्या आहे. चंपूंत कवीचा पांडित्य-प्रदर्शनाकडे अधिक कल असतो. 'सुभद्राचंपू'चे सात सर्ग असून त्यांत ३७९ श्लोक आहेत. पहिल्या सर्गात सुभद्रेचे ३४ श्लोकांत वर्णन केलें आहे. 'सुभद्राहरणावर' जीं काव्यें उपलब्ध आहेत त्यांत निरंजन माधवांचा 'सुभद्राचंपू' अधिक चांगला आहे. अधुनिक काव्यांत अशा प्रकारची रचना आढळत नाहीं.

भावगीतांचा सर्वांत सानसुंदर प्रकार जो गीतिका (song) त्याचा आतां विचार करूं. गीतिका ही चिमुकली असून तींत संगीतानुकूल नादोत्कटता असावी लागते. इंग्रजी भाषेंत ही जितकी अकृत्रिम तितकी आल्हादक असते. इंग्रजी भाषेंत बर्न्स, शेले, टेनिसन व सरोजिनी नायडू यांनी सुंदर गीतिका लिहिल्या आहेत. प्राचीन कवींची पद्यरचना ही गीतिकेचीं उदाहरणें आहेत. अधुनिक नाटककारांपैकीं श्री. कोल्हटकर यांच्या नाटकांतील पदें या गीतिका म्हणून सांगतां येतील. कोल्हटकरांच्या पद्यांत पदलालित्य, अर्थगौरव, कल्पनारम्यत्व, रसोत्कटता व अर्थसौंदर्य हे विशेष आढळतात. त्यांचीं पदें क्वचित क्लिष्ट असलीं तरी त्यांची पदरचना ही महाराष्ट्र-भारतीला निरंतर ललामभूत होण्याजोगी आहे यांत शंका नाहीं. गोविंदाग्रज, यशवंत, तांबे, अनंततनयप्रभृति कवींनीं गीतिका लिहिलेल्या आहेत.

गीतिकेप्रमाणेंच सुभाषितांचाहि भावगीतांत समावेश करितां येईल. सुभाषित स्वयंसिद्ध व सर्वांगसुंदर असा लघुकाव्याचा प्रकार आहे.

संस्कृत भाषेंत सुभाषितरत्नभांडागार असून इंग्रजी भाषेंत स्विफ्ट व ऑस्टिनडॉब्सन यांनीं अशी काव्यरचना केली आहे. सुभाषितांत बौद्धिक चमत्कृति अधिक असतें. लघुत्व, पद्यमयत्व, आल्हादप्रदत्व, विनोदपरत्व व चमत्कृतिजनकत्व ही सुभाषिताचीं लक्षणें आहेत. कृष्णशास्त्री चिपळुणकरांची अन्योक्तिमाला, रंगनाथ हरि अधिकारी यांचे ' मराठी सुभाषित, रेंदाळकरांची अन्योक्तिमुक्तांजलि, ल. ना. जोशी यांचें ' सुभाषित पारिजातक, मुकुंदशास्त्री मिरजकर यांचें 'सुभाषितपुष्पमकरंद', देवस्थळी यांची ' सुभाषितांजलि व फडणीस यांच्या 'सुभाषित मराठी '— या पुस्तकांत सुभाषितांचा संग्रह आढळतो. श्रीकृष्ण कवींची ' एकावलि ' ही प्रायः सुभाषितात्मकच आहे. सुभाषितांत बौद्धिक चमत्कृति असल्यानें त्याला काव्यदृष्ट्या कमी लेखण्याची प्रवृत्ति कांहीं टीकाकारांत आढळते. प्रासंगिकता कमी करून व भावनिर्भरतेकडे लक्ष देऊन सुभाषितें लिहिल्यास हा लघुललित काव्यप्रकार अजूनहि लोकप्रिय होईल.

येथपर्यंत रचनावैचित्र्याच्या दृष्टीनें प्राचीन व अर्वाचीन मराठी काव्याचें समालोचन केलें. त्यावरून महाकाव्य, कथनपरकाव्यें, भावगीतें विलापिका इत्यादि प्रकारांचें स्वरूप वाचकांना कळून येईल. प्राचीन काव्यापेक्षां अर्वाचीन काव्यांत रचना व विषय यांचें वैचित्र्य अधिक आढळतें. प्राचीन कविता ही परमार्थप्रवण असून अधुनिक कविता समाजाभिमुख झाली आहे. समाजाचीं सुखदुःखें दुष्ट रूढींचें दुषपरिणाम, राजकीय आकांक्षा, इत्यादि विषयांचें वर्णन अधुनिक काव्यांत आढळतें. पण समाजांतील दुष्ट रूढींचें स्मरण झाल्याबरोबर केशवसुतासारख्या कांहीं कवींच्या रसनेतून अग्नीच्या ठिणग्या उडतात तर माधवानुजासारख्या कांहींच्या वाणींतून सहिष्णुतेचीं टिपें गळतात. त्याचप्रमाणें कांहीं भावगीतांतून भावनांतील बेफाम दांडगाई, कल्पनेची अद्‌भुत भरारी, विषयातिरेकाची धुंदी, अनिर्बंध स्वैरवृत्ति हे दोष आढळतात. सारांश, रचनावैचित्र्याच्या दृष्टीनें मराठी कविता जितकी संपन्न तितकीच संमोहनीय असल्यामुळें ती रुद्रसिकाल्हादजनक आहे असें म्हटल्यास तें चुकीचें ठरणार नाहीं.

# प्रकरण आठवें

## मराठी काव्यांतील सृष्टिसौंदर्य

One impulse form vernal wood
May teach you more of man
Of moral evil and of God
Than all the sages can

—*Wordsworth.*

सृष्टिदेवतेचें मंगल सौन्दर्य हा मानवजातीच्या अवीट आनंदाचा मनोज्ञ विषय आहे. कोणत्याहि सत्ताधीशाला किंवा सम्राटाला दुसऱ्या कोणत्याहि वस्तूवर सत्ता गाजवितां आली तरी सृष्टिसौन्दर्यावर त्याला प्रभुत्व गाजवितां यावयाचें नाहीं. मानवनिर्मित कलेचें सौंदर्य हें सर्वभक्षक कालाच्या कराल प्रभावानें क्षणोक्षणीं क्षीण होतें व कांहीं काळानें नष्टहि होतें. पण निसर्गसौंदर्य हें 'प्रतिक्षणीं नवीच दे रुचि' अशाप्रकारचें नित्यनूतन, चिरशचिर व नितांतमनोहर असतें. उषःप्रभेच्या दर्शनानें ऋग्वेदकालीन ऋषीला जो आनंद झाला तोच आज आपणांलाहि होत आहे. प्रसन्न सूर्योदय, प्रशांत सूर्यास्त, चंद्राचें सोज्ज्वल बिंब व त्यांत प्रतिदिनीं घडून येणारा आकृतिभेद, अगणित नक्षत्रतारकांच्या रत्नमाणकांनीं खचलेलें नभोवितान, प्रकाशतिमिरांची परंपरा, वसंतऋतूंतील पुष्पसौंदर्य, शारदीय फलसंपदा, वर्षाकाळचें विक्राळभैरव स्वरूप, इंद्रधनुष्याची सप्तरंगी चारुता, प्रक्षुब्ध सागराचें गगनचुंबित तरंगतांडव, प्रचंड पर्वत व तीवरील विशालवनराजी, निर्मल निर्झरिणीचें नयनरम्य नृत्य; पुण्यमय सरित्प्रवाह, स्फटिकप्रभ सरोवरांची सुनील सुषमा—हे सृष्टींतील विविध मनोहर देखावे अवलोकन करून विस्मय, भीति, कृतज्ञता उत्साह, आनंद या भावना मनांत उद्भुत होतात; व सर्वशक्तिमान परमेश्वराच्या अतुल सामर्थ्याविषयीं आदर जागृत होतो. सारांश सृष्टिदेवतेचें स्वरूप प्रेक्षणीय, प्रलोभनीय व पावनस्मरणीय

असल्यामुळें पुष्कळदां सत्कवींची प्रतिभा सृष्टिसौंदर्याच्या वर्णनांत पल्लवित झालेली दृग्गोचर होते. प्रस्तुत प्रकरणांत मराठी कवींनीं निसर्गपूजन कशाप्रकारे केले आहे याचे समालोचन करावयाचे आहे.

महानुभवी पंथांतील पंडित दामोदर यांच्या 'वच्छहरण' या काव्यांत सृष्टिवर्णनें आढळतात. या काव्यांतील वृक्षवर्णन, सरोवराचें वर्णन व फळांचें वर्णन हीं वर्णने उल्लेखनीय आहेत. या सर्वांपेक्षांहि त्यांनीं कालिंदी नदीचे केलेलें वर्णन पुढें पहा:—

कालिंदीजल निर्मल: श्रीकृष्णकांतिशामल
प्रतिबिंबली म्हणौनि सुनील: हो औनि ठेली ॥१७॥
देखोनि श्रीचक्रपाणी कैसी संभ्रमितु जाली तरंगिणी
कीं आनंदली अंत:करणीं ते रोमांचु दाटले ॥
कीं आलिंगावे श्रीकृष्णराजा: तिआं बहुती केलिआभुजा
तैसे तरंगु पढियासले मज कालिंदिअेचे

यानंतर यमुनेच्या घाटाचे, तिच्या वाळवटाचें, पक्षांचे, पशूंचें विस्तृत वर्णन आढळते. 'ऋद्धिपुरवर्णन' या काव्यांतहि सरोवराचे वर्णन आहे. पण तें 'वच्छहरणांतील' सरोवरवर्णनाइतके चांगलें नाहीं 'शिशुपालवध' या काव्यांतहि सृष्टिवर्णने दृग्गोचर होतात. सारांश, महानुभवी पंथांतील कवींना सृष्टिसौंदर्याची अभिरुचि होती हें दिसून येते.

ज्ञानेश्वरी हा ग्रंथ तत्त्वज्ञानात्मक असल्याळें त्यांत स्वतंत्र सृष्टिवर्णनें करण्याला वाव नाहीं. पण असे असूनहि त्यांनीं उपमा दृष्टांताच्या रूपानें सृष्टिसौंदर्याचीं इतकीं सुंदर वर्णनें केलीं आहेत कीं त्यांना महाराष्ट्राचे आद्य निसर्गकवि ( Nature Poet ) असें म्हणावयाला हरकत नाहीं. ज्ञानेश्वरांची निरीक्षणशक्ति सूक्ष्म असल्यामुळें तीं वर्णनें रसरुचिर वाटतात. उदाहरणार्थ, "जैसें शारदीयेचें चंद्रकळे । माजी अमृतकण कोवळे । ते वेचोनि मनें मवाळे । चकोरतलगे ( अ. १,५६ ) जैसें भ्रमर परागु नेती ।

परी कमळदळें नेणती । तैसी परी आहे सेविति । ग्रंथीं इये (अ. १,५९) कां अपुला ठावो न सांडता । आलिंगिजे चंद्रु प्रकटता । हा अनुरागु भोगितां । कुमुदिनी जाणे (अ. १,६०) जैसा भ्रमर भेदी कोडें । भलतेसें काष्ट कोरडें । परी कळिकेमाजीं सांपडे । कोवळिये ॥ तेथ उत्तीर्ण होईल प्राणें । परी तें कमळदळ चिरू नेणे । तैसें कठिण कोवळेपणें । स्नेह देखा (अ. २०१-२). पार्था आणिकही परी । तो जाणो येईल अवधारी । जैसी अक्षोभता सागरीं । अखंडित ॥ जरी सरिता ओघ समस्त । परिपूर्ण होऊनि मिळत । तऱ्ही अधिक नोहे ईषत । मर्यादा न सोडी ॥ [अ. २, ५७–५८]. सहजें मलयानिळु मंदु सुगंधु । तया अमृताचा होय स्वादु । आणि तेथेंच जोडे नादू । जरी दैवगत्या [अ. ३. २१९]. जैसें ऋतुपतीचें द्वार । वन:श्री निरंतर । वोळंगे फळभार । लावण्येसी [अ. ३, १००]. सांगें कुमुददळांचेनि ताटे । जो जेविला चंद्रकिरणें चोखटें । तो चकोरु काइ वाळुंवटे । चुंबितु असे [अ ५, १०७]. तो कनकचंपकाचा कळा । कीं अमृताचा पुतळा । नाना सासिन्नला मळा । कोवळिकेचा ॥ हो कां जे शारदीयेचेनि वोले । चंद्रबिंब पाल्हेलें । कां तेजचि पूर्ण बैसलें । असनावरी [अ.६, ५७-५८]. कां कमळकंदा दर्दुरी । नांदणूक एकेचि परी । परि परागु सविजे भ्रमरी । येरां चिखुलचि उरे । (अ. ९, ५७) ग्रीष्माच्या अतिरसीं । सबीजें तृणें जैसी । मागुती भूमीसी । सुलीनें होती । कां वर्षिये ढेढें फिटे । जेव्हां शारदीयेचा अनुघडु फुटे । तेव्हां घनजात आटे । गगनीचें गगनीं [अ. ९, १०१–२]. जैसी जवळिकेचीं सरोवरें । उचंबळलिया कालवती परस्परें । मग तरंगासी धवळारे । तरंगचि होती (अ. १०, १२१). क्षीरार्णवाचियां कल्लोळीं । कंपु नाहीं मंदराचळीं । आकाश न जळे जाळीं । वणवियाच्या (अ. १३, ४९०). कां सौरभ्य जीर्णु जैसा । आमोदु मिळोनि जाय आकाशा । माघारा कमळकोशा । नयेचि तो (अ. १४, ११३). नाना रंगीं गजबजे । जें इंद्रधनुष्य देखिजे । तैसा नेण-

तया आपजे । आहे तैसा [ अ. १४, २४४ ]. कां वसंताचिया वाहाणी । आलिया वनश्रीचा अक्षौहिणी । ते न करीतुचि घेणी । निगाला जो (अ. १६, १६४). आणि ऋतु बरवा शारदु । शारदीं पुढती चांदु । चंद्री जैसा संबंधु । पूर्णिमेचा । कां वसंतीं बरवा आरामु । आरामींहि प्रियासंगमु । संगमीं आगमु । उपचारांचा ॥ नाना कमळीं पांडवा । विकासु जैसा बरवा । निकाशि हा यावा । परागाचा तरे [अ. १८, ३४४–४६]. मग क्षीराब्धीतें सांडितु । गगनीं पुंजि मंडितु । तिकडे जैसा निवडितु । पूर्ण चंद्र [अ. १८, १५५० ]. हिमवंतीचीं सरोवरें । चंद्रोदयें होतीं काश्मीरें । मग सूर्यागमीं माघारें । द्रवत्व ये ( १८. १६१५ ). "अशाप्रकारें चंद्र, चंद्रिका, सूर्य, सरिता, चकोर, चातक, राजहंस, इन्द्रधनुष्य, पुष्पलता, कमळ, भ्रमर, शरद्, वसंत, उद्यान, सागर इत्यादि सृष्टींतील भव्यसुंदर वस्तूंचे हृदयंगम दृष्टांत ज्ञानेश्वरींत पदोपदीं आढळतात. सरांश, ज्ञानेश्वरांची प्रतिभा मानससरोवरांतील राजहंसाप्रमाणे सृष्टिसौंदर्यांत सदैव रममाण झालेली आढळते.

श्रीज्ञानेश्वरांप्रमाणेंच मुक्तेश्वर हेंहि सृष्टिसौंदर्याचे उपासक होते. मुक्तेश्वरांच्या आदि व वन या पर्वांत निसर्गांतील विविधदृश्यांची वर्णनें आढळतात. आदिपर्वाच्या पंधराव्या अध्यायांत वनाचें विस्तृत वर्णन आलें आहे. उदाहरणार्थः– "देखे महाप्रचंड गिरी। विशाळ पर्वताचिया दरी। जळें तुंबिली सरितासरी। समुद्रतुल्य अगाध। तेथें आम्र निचोळवेल। कवट कदंब मधुपिंपळ । सरस पलाश विशाळ। न्यग्रोधवृक्ष वाढिन्नले॥ बदरी श्लेष्मातकी आंबळी। शाल्मली करवंदी जांबुळी। चारी भल्लातक गुग्गुळी। शमी बेरुकळी चिंचणिका । ऐसिया वृक्षांची आचाट। झाडें लागलीं घनदाट। माजी निर्झरोदकाचें पाट। सैरावरा धावती॥ मस्तकें उचलोनी दिनकर। छायें रक्षिला अंधकार। माजीं श्वापदगणांचें भार। सुरवाडले सुखवस्ती॥ हरीण करीं सिंह शार्दूल। चित्रे चितळें तरस सरळ। रिश्च रोही

गवें रसाळ। अरण्य सारें माजलें॥ तेथें चंदन पारिजात। देवदार केतकी समुचित। तुळसीवने सुशोभित। दवनेवनें घमघमिती॥ सरिता सरोवरीचीं पै जळें। पद्मगंधे सुशीतळें। रातोत्पळें नीलोत्पळें। सीतोत्पळें कनकाचीं॥ तेथें राजहंस करंडक। चकोर सारस चक्रवाक। करींद्र करिणी करशावक। स्वेच्छा करिती जलक्रीडा॥ मयूर गर्जती किकारे। कोकिळा गर्जती पंचमस्वरें। षटपद। बोलती झुंकारे। आणि कपोतें कूजती। नदी मालिनी पवित्र जीवनीं वाहे जैसी देवतटिनी। तरंगलिंगे सुफेन सुमनी। सुपूजित शोभती॥ पण हें वर्णन विस्तारामुळें थोडे कंटाळवाणे झालें आहे. यापेक्षांहि आदिपर्वाच्या ३६ व्या अध्यायांतील निशा व प्रभात यांची वर्णने चांगली साधली आहेत. रात्रीच्या वेळीं "निशाचरी श्वापदपक्षी। थोर गर्जना करिती कक्षीं। बोळकंबळीं महावृक्षी। आस्वलें आणि वाघुळें॥ दिवाभीताचे घुंगाट। पिंगळियांचे किलकिलाट। भालु भुंकती सैराट। टिटवे थोर टिवटिवती॥ चक्रवाकांचे आर्तस्वरी। कुमुदी भ्रमरांचे झुंकारी। मस्तकमणी तेज विखरी। जीव आहारा शोधती॥ असो हे निशा दाटली काळी। जेवी काळ-पुरुषाची कांबळी। ब्रह्मांडदेवतेवरी सगळी। पांघुरविली आसत्वें॥ या वर्णनांत शेवटच्या ओंवीतील असलेली काळपुरुषाच्या कांबळीची कल्पना भव्योदात्त वाटते. प्रभातवर्णनांतील "गगनसमुद्रीं मुक्ताफळें। अरुणचंचूने कनकमराळे। वेचून घेतां कळाकुशळे। नाहीच केली नक्षत्रे" ही ओंवी हृद्य आहे. वनपर्वांत वर्षाऋतूचें वर्णन आढळतें. मुक्तेश्वरांचीं सृष्टिवर्णने सविस्तर असून तीं कल्पनाविलासानें मंडित आहेत. वनवर्णनांत वृक्षांची सर्व यादी देणे हा तिचा दोष आहे. तथापि प्राचीन कवींत मुक्तेश्वरांचीं सृष्टिवर्णनें हीं सूक्ष्मदर्शित्व व सौंदर्यदृष्टि या गुणांत श्रेष्ठ आहेत यांत मुळींच शंका नाहीं.

सामराजाच्या 'रुक्मिणी हरणांत' सायंकाळ व चंद्रोदय यांचीं वर्णनें आढळतात. चंद्रोदयवर्णन करितांना योजिलेला पुढील श्लोकः—

हिमकरकर जैसे कांतिपूर स्रवेती
हळुच तसतसे ते चंद्रकांत द्रवेती
क्षुधिततर चकोरा पारणें थोर जालें
मुकुलित कुमुदाला जन्मसाफल्य आलें

चित्रमय आहे. वामन पंडितांनीं भागवती काव्यांतून यमुना नदी, शारदीय पौर्णिमा, वृक्षलता इत्यादि दृश्यांचीं वर्णनें केलीं आहेत. पण या सर्वांपेक्षांहि रघुनाथपंडितांच्या 'नलदमयंतीस्वयंवरांत' केलेलें वनाचें व सरोवराचें वर्णन अप्रतिम आहे. उदाहरणार्थः—

लतेतळीं रुंद निरुंद कालवे । गळोनि येथें मकरंद कालवे ।
परागही सांद्र तयांत रंगती । फुलांसवें भृंगतती तरंगती ॥
तया वनीं एक तटाक तोयें । तुडुंबलें तामरसानपायें ।
निरंतरामंदमरंद वाहे । तयांतही यास्तव रिक्त नोहे ॥
पीतां मरंद उदरंभर बंभराचे । जे होय मंदिरहि सुंदर इंदिरेचें ।
जे पद्म तेथिल सहस्रदळां धरीतें । प्रत्यक्ष सूर्यकिरणांस विसाववीतें ॥

याच वर्णनांतील कल्पनांची पुनरुक्ति त्यांच्या 'गजेंद्रमोक्ष' या काव्यांतहि दिसून येते. मोरोपंतांच्या ठिकाणीं निसर्गरति फारशी नसल्यामुळें 'संध्याराग सुरंजित शरदभ्राहूनि फार तो शोभे' अशी एकादी उपमा क्वचितच आढळते. अमृतरायांच्या 'शुक–मेनका' या कटावांत वसंत-शोभेचें सानुप्रास वर्णन आढळतें. नरहरीच्या 'गंगारत्नमाला' या काव्यांतील हिमालयाचें विस्तृत वर्णन उल्लेखनीय आहे. नरहरीनें या काव्यांत हिमालयावरील गगनचुंबित वृक्ष, पोटाशीं मुलांना धरून उड्या मारणारीं वानरें, हत्तींचें कळप, पाझरणारे बर्फ या सर्वांचें चमत्कृतिजनक वर्णन केलें आहे. उदाहरणार्थः—

कडे तूटले एक ठायासि खालीं । मदें मत्तदंती कदंबे निघाली ॥
तशा हस्तिना पाहतां शैलकाया । गमे मेघजाती तळीं काय राया ॥

एकठायिं ते वाहती झरे । कूटतुल्यही बर्फ पाझरे ॥
तूटले कडे श्वापदा नसे । मार्ग पाहतां भीति होतसे ॥
म्लान दिवसा ज्या वनस्पती । अग्निचेपरी रात्रि दीसती ॥
ज्या मणि प्रकाशित वारुळीं । बैसले किती थोर कुंडली ॥
चंदनाचिये वृक्ष वेष्टना । करुनि डोलवी कुंडली फणा ॥
जो कधीं नसे पक्षि पाहिला । नृप विलोकितां स्तब्ध राहिला ॥
खालीं पाहुनी हस्ति केसरी । वरुनि घे उडी मस्तकावरी ॥
वानरें उड्या वृक्षिं मारिती । तनय घेउनी पोटशीं किती ॥

या काव्यांत, कांहीं सांकेतिक वर्णनें ( मणिप्रकाशित वारुळासारखी ), तूटले शीखरावरी अशीं अशुद्ध रूपें आढळतात हें खरें, पण हें काव्य वाचल्यानंतर 'वर्णनाची कला नरहरीला चांगली साधते, ( साहित्यसुवर्ण पृ. ६० ) हें प्रा. लागू यांचें विधान कुणालाहि समर्पक वाटेल. एकंदरींत, प्राचीन काव्यांत एकाद्या दृश्याचें कलात्मक वर्णन न करितां तत्संबंधीं सर्व कांहीं वर्णन करण्याची पद्धति दिसून येते; व त्यांत कविसंकेतांचें परिपालन व रसहानिकारक विस्तार करण्याची प्रवृत्ति दिसून येते. असें जरी असलें तरी दामोदर, ज्ञानेश्वर, मुक्तेश्वर, वामन व रघुनाथपंडित यांच्या काव्यांत निसर्गसौंदर्याची आल्हादक वर्णनें आढळतात.

प्राचीन काव्याप्रमाणेंच अर्वाचीन काव्यांतहि ही विषय लक्षी (objective) सृष्टिवर्णनाची परंपरा बराच काळ चालली होती. कालिदासाच्या ऋतुसंहाराच्या अनुकरणानें कृष्णशास्त्री राजवाडे व पारखीशास्त्री यांनीं 'षड्ऋतुवर्णन' लिहिलें आहे. पण त्यांत पारखीशास्त्री यांचें 'षड्ऋतुवर्णन' हें काव्य अधिक चांगलें आहे. पारखीशास्त्री यांनीं वसंत, ग्रीष्म, वर्षा-शरद्, हेमंत, शिशिर, या सहा ऋतूंचीं संस्कृतप्रचुर भाषेंत वर्णनें केलीं आहेत. वसंतऋतूंतील पुढील वर्णन उल्लेखनीय आहे. कोमल मंजुल किसलय फुटती तरुवर दिसती शेंडे । वाटे मजला पंचशरानें रोवियले

कीं झेंडे ॥ रसाल तरुवर मंजु मंजिऱ्या हालति लटलट साऱ्या । मदननृपाची स्वारी आली म्हणुनिच फिरती चौऱ्या ॥ मंजरि वरि ते सुंदर मधुकर करिती मधुर रवांतें । अनंगराजा आला म्हणुनी वाजविती वाद्यांतें ॥ पल्लवमध्यें कलिका खुलती झुलती वरती भृंग । कामुक जणुं कीं केव्हां होईल नूतन युवतीसग ॥ भृंग अहंकृतिसह तैं करिती झंकृति मज वाटे तें । मनोज हुंकृति विरह्याला कीं टंकृति तध्दनुची ते ॥ मकरंदातें प्राशित खेळत मधुकर करिति विलास । दुजे मजेचे शोकी लोकीं नाहिंत दुसरे खास ॥ कुंजीं मधुकर पुंजी होती, गुंजी शब्द विराजे । वनदेवीच्या मंजीराचें सिंचिंज जणु हे साजे ॥ स्मरदेवीचे मधुकर मांत्रिक जाणुनि जणुं मंत्रातें । परागभस्मा फुंकुनि करिती वश मन्मथविमुखातें ॥ ( अर्वाचीन कविता पृ. ८७ . पारखीशास्त्री यांनीं या काव्यांत विविधवृत्तांची कुशलतेनें योजना केली आहे. पांडित्याच्या अतिरेकामुळें व प्रदीर्घ समासांमुळें या काव्याला क्वचित क्लिष्टता आली आहे. असें जरी असलें तरी षड्ऋतूंचीं वर्णनें केल्यानंतर त्यांनीं रचिलेलें पुढील पद फार सुंदर आहेः " गड्यांनो, तो जगदीश भजा ॥ ध्रृ० ॥ कृपें जयाच्या साहि ऋतूंमधिं आहे बहुत मजा ॥ वसंतशीतल वात फुलांतिल, फिरतो घेत रजा ॥ द्राक्षाम्रादिक मधुरस सुफलें, करितो फार चिजा । सुपीक होण्या करी उष्णता ग्रीष्मीं तो न दुजा ॥ वर्षुनि वर्षा हर्षा देतो, शमवुनि ताप रजा ॥ शरदीं धान्यें सुजलें करितो, शोभा करि जलजा ॥ सुफली पुष्पीं मुदित करीतो, घनमल जाति विजा ॥ हेमंतीं रुचि अन्नजला अति, देतो सुख मनुजा ॥ शिशिरीं नाहीं कमी रंग पण लवकरि तुम्हि उमजा । ऋतु वर्षादिक रूपें त्याचीं, कालचि तो समजा ॥ कृतकर्माचा अहंकृतीचा सोडुनि या गमजा । लक्षीं ठेवा पापापासुनि होइल सौख्य वजा ॥ सर्पापरि हा काल जातसे, पाहुनि त्यास बुजा । भजनसमाजीं प्रभुकीर्तीच्या गजरा संतत जा । विभु दृढ नांवें संसारार्णव

तरण्या शीघ्र धजा ॥ सारांश, पारखीशास्त्रीं यांचें 'षड्ऋतुवर्णन' हें काव्य चांगल्यापैकीं आहे यांत मुळींच शंका नाहीं.

ऋतुवर्णनपर काव्याप्रमाणेंच सरित्‌वर्णनपर काव्येंहि परलक्षी (objective) आहेत. आपल्या सलिलसंपदेनें सर्वांना सुखित करणाऱ्या सरितेविषयीं प्रत्येकाला अनिर्वचनीय आदर वाटतो. अखंड वाहून भूमिभाग सस्यसमृद्ध करणाऱ्या नदीचा प्रशांत प्रवाह पाहून कुणाचें हृदय आनंदित होणार नाही ? त्यांतहि गंगा ही सर्वांत श्रेष्ठ नदी आहे. म्हणून तिच्या स्तवनपर असलेलें जगनाथपंडितांचें श्रुतिमधुर 'गंगालहरी' हें संस्कृत काव्य सर्वांना परिचित आहे. मराठीं भाषेंत बाळासाहेब कुरुंदवाडकर, हंस व चिंतामणी पेटकर यांनी 'गंगावर्णनपर काव्यें' लिहिलीं आहेत. बापूसाहेब कुरुंदवाडकर हे मयूरभक्त असल्यामुळें त्यांचें काव्य आर्यावृत्तांत आहे. गंगास्तुति करितांना ते म्हणतातः-

आर्यादेवी गंगा ह्मणुनि तिचा स्तवहि योग्य आर्यांनीं
आर्यांनींच करावा नच माझ्या सारख्या अनार्यांनीं
शक्त असे रवि परि नच, नाशाया तो गुहागत तमातें
नरहृद्‌गुहातम्, श्रुति सांगति, तूं नाशिसी सतत माते!
हरि रवि तमासि परि खर, शीतल विधु परि हरि तमा न तसें,
शीता तमोहराही पाहुनि तव चरणिं होति जन न तसे.
पर्वतनाश कराया वाटे तो पावला पवि त्रास
नर पापनग विनाशन सुकर असे तव जला पवित्रास.

ही गंगास्तुति कांहीं तरी मनाला पटण्याजोगी आहे. पण शेवटी 'ब्रह्मघ्न गोघ्न, मद्यप, हेमस्तेयी, हरीहि परदार । स्नान जलीं जरि तुझिया, नरकाचें पाहतो न नर दार' ही जी आर्या आली आहे ती कोणत्याहि माणसाला पटण्याजोगी नाहीं. कोणत्याहि गोष्टीची स्तुती करतांना कवि हा अतिरेकाच्या कोणत्या टोकाला जातो हें यावरून दिसून येतें. गंगानदी ही पुण्यप्रद

असली तरी ब्रह्मघ्न, गोघ्न, मद्यपी व हेमस्तेयी अशीं महापातकें करणारा माणूसहि तिच्या स्नानानें मुक्त होईल हें सांगणें हें सर्वस्वीं अनुचित नाहीं काय? याच काव्यांत कुरुंदवाडकरांनीं हिमालयाचेंहि विस्तृत वर्णन केलें आहे. त्यांतील:–

पाहुनि दुरोनि त्यावरी मधुभ्रमें बैसता भ्रमर मरती.

चित्तीं करा निदर्शन योग्य न सहसा कुठेंहि परमरती

बापूसाहेब कुरुंदवाडकर व हंस यांच्या काव्यांपेक्षां चिंतामणी पेटकर यांचें 'गंगावर्णना' हें काव्य अधिक सुंदर आहे. या काव्यामध्यें हिमालय पर्वतांत उगम पावून तेथून थेट समुद्रास मिळेपर्यंत, भागीरथीचें वर्णन केलें आहे म्हणजे तिच्या उगमाचें, ती डोंगरी प्रदेशांतून सपाट भागावर उतरते त्याचें, तिच्या थडींत जे प्राचीन किंवा अर्वाचीन काळीं प्रसिद्ध असे प्रांत लागतात त्यांचें तिच्या कांठीं असणारीं पवित्र क्षेत्रे व जुनाट आणि संपन्न शहरें यांचें व तिच्या मार्गांत जी मनोहर सृष्टिशोभा दृष्टीस पडते तिचें यथामति वर्णन केलें आहे. मध्यें मध्यें कोठें इतिहासांत प्रसिद्ध अशा स्थळाविषयी जे विचार मनांत आले त्यांचेंहि निरूपण केलें आहे." (चिंतामणी पेटकर यांचा मूळ उपोद्घात पृ. २). या काव्याचें अनेक वृत्तात्मक असे ३३२ श्लोक आहेत. या काव्यांतील 'हिमालय पर्वत,' 'गंगोद्गम,' 'पर्वतावरील सृष्टिशोभा', गंगोत्री व सुंदरीवन' हे सारे भाग चेतोहर वाटतात. या काव्याचा शेवट कवींनीं स्रग्धरा या भव्य गंभीर वृत्तांत पुढील प्रमाणें केला आहे.

पत्नीशीं जाहल्यानें प्रियकर पतीची भेट फारा दिसांनीं
दोघींही स्वप्रमोद प्रगटविति जणूं वीचिमालामिषांनीं
किंवा प्रेमातिभारें चपल निजभुजांनींच तीं एकमेकां
आलिंगाया त्वरेनें करिति जणुं असा होतसे भास देखा ॥३३०॥
झाली उत्पन्न गंगा हिमगिरिशिखरीं मूळ; तेथूनि खालीं

नाना प्रांत क्रमून त्वरितगतिबळें तेथपर्यंत आली;
ती आतां वारिधीशीं सकळजननुता ऐक्यता आज भोगी
जैसा जिंकून योगें षडरिसमुदया दिव्य सारुप्य योगी ॥३३१॥
गंगे, देवादिसेव्ये, त्रिपुरहरजटाजूट संचारिभंगे.
गंगे शीताद्रिकन्ये सगरकुलसमुद्धारिके पापभंगे,
गंगे वैकुंठ पादांबुजननिविमले; छिन्नमाया प्रसंगें
गंगे पावो तुला ही प्रणति वितरिली मी विशुद्धांतरंगें ॥३३२॥

या काव्याला समासबाहुल्यामुळें क्वचित क्लिष्टता आली हें खरें; पण या काव्यांत वायफळ वर्णनाचा विस्तार नाहीं, एवढेंच काय पण अगदीं थोडक्या शब्दांत नीटनेटकेपणानें रचनासौष्ठव, अर्थगांभीर्य, मधुरशब्दरचना, वृत्तौचित्य, अनुप्रास उपमारूपकादिअलंकार इत्यादि सर्व गोष्टी सांभाळून हें काव्य कवींनीं लिहिलें आहे. सारांश, चिंतामणी पेटकर यांचें 'गंगा-वर्णना' हें वर्णनात्मक काव्य म्हणजे एक उत्कृष्ट कलाकृति ( Highly wrought piece of art ) आहे असें म्हटल्यास तें चुकीचें ठरणार नाहीं.

चिंतामणी पेटकराप्रमाणें लेंभे यांनीं स्वतंत्र सृष्टिवर्णनात्मक काव्य लिहिलें नाहीं. पण त्यांच्या खंडकाव्यांतून निसर्गांतील दृश्यांचीं विविध वर्णनें आढळतात. सुरतरंगिणी काव्याचा प्रारंभच नर्मदा नदीच्या विस्तृत वर्णनानें झाला आहे. लेंभे यांनीं सुमारें नव्वद ओळींत नर्मदा नदीचें संस्कृतप्रचुर भाषेंत वर्णन केलें आहे. नर्मदा नदी कशी वाहत चालली आहे हें कवीच्या शब्दांतच पाहण्यासारखें आहे. कवि सांगतात:—

स्वच्छंदें अतिरम्य गर्द हिरव्या झाडींतुनी तोषदा
आली फोडित शुभ्र अद्रिशिखरें जी स्तैरिणीं नर्मदा
झाली केवळ दुग्धाब्धिचुल्हरी फेसाळुनि या स्थळीं
स्वर्गांतील यशो समस्त हरनी जाणों असें चालिली.

त्यानंतर लेंभे यांनीं नर्मदेच्या तीरावरील देखाव्याचें वर्णन केलें आहे. या वर्णनांत फारसा कल्पनाविलास नसला तरी त्यांत कवीची सूक्ष्म दृष्टि दिसून येते. व "स्वच्छंदें लहरीवरी फिरुनियां ये गार वारा सखा। लीलें हालवुनी प्रपुल्ल तरुतें दे सौरभाच्या सुखा"– अशा नादमधुर ओळींनीं हें वर्णन गजबजलें आहे. 'सुरतरंगिणीच्या' दुसऱ्या सर्गाच्या प्रारंभीं वसंत‍ऋतूचें असेंच विस्तृत वर्णन आढळतें. संस्कृत साहित्यांतील संकेताचा यथोचित उपयोग करून वर्णन करण्याकडे लेंभे यांची विशेष प्रवृत्ति आहे. या वर्णनांतील पुढील कांहीं ओळी उल्लेखनीय वाटतातः—

एकीकडे रव मनोहर मक्षिकांचे
भोक्त्यांस या बघुनियां मकरंद नाचे
रंगेल माधव फुलांप्रति रंग नाना
दे; तत्सुगंध करि लोल परांगनांना
जो दे पिकां मधुरकूजित मोदकारी
जे ऐकतां मदन बाण शिरे शरीरीं
जो सौरभें सुचवि. होय वसंतभेटी
नांदे असा रुचिर मोहर आम्रवाटीं
जो जो दिसे अरुणता नवपल्लवांची
तों तोचि चंचलमती प्रणयीजनांची
जों जों फुटे नविन अंकुर मोहराचा
तों तों चढे असमबाण विलासिनींचा.

—लेंभे यांची कविता पृ. ८–९.

त्याचप्रमाणें 'सुरतंरगिणी' काव्याच्या चवथ्या सर्गात जोत्स्नाविलसित रजनीचेंहि वर्णन दृष्टोत्पत्तीला येतें. त्यांत 'वृंदारकांही शुभ मंगलातें। मुक्ताफळेंहि भगणेंचि हातें। सानंदचित्तें उधळावयातें। आकाशपात्रीं भरिलीं अहा!–" अशी एकादीच कल्पना आढळते. 'आनंदकंद'

काव्याच्या प्रारंभीचें शरद्वर्णनहि उल्लेखनीय आहे. लेंभे यांच्या निसर्गवर्णनांत कल्पनेचे अभिनवत्व नसलें तरी श्रवणकोमल पदलालित्यामुळें तीं वाचनीय वाटतात.

लेंभे यांच्या सृष्टिवर्णनांपेक्षां चंद्रशेखरांची सृष्टिवर्णनें अधिक रसपूर्ण वाटतात. त्यांनीं 'शरच्चंद्र आणि चंद्रिका', 'शरद्वैभव', 'घनाभिनंदन', 'कुंजकूजन', 'तारतरंग' इत्यादि वर्णनात्मक काव्यें लिहिलीं आहेत. 'वसंतमाधव' या कवितेतील वसंतऋतूचें वर्णन बहारदार साधलें आहे. वसंतऋतूच्या आगमनामुळें जनांत व वनांत कोणतीं रम्य दृश्यें दिसूं लागलीं. यांचें वर्णन पाहा:—

वेली तरू विलसले नव पल्लवांही
हें झोंकदार बहू लोक नवांबरांही
पुष्पेंच भूषण लता वनवासिनीतें
रत्नें सुवर्ण, गजरेहि सुवासिनींतें
आला गुलाब-सुमनांप्रती जो विकास
उल्हास तोच्चि इकडे रमणीमुखास
एकेक त्यांतुनीं जसा निघतो सुगंधी
उद्गार यांतुनि तसा प्रणयानुबंधीं
देती लता भ्रमर हें नयनभ्रमर
रामाकटाक्ष परि हें भवसंभ्रमाला
या संभ्रमांतच्चि अहो पडले बुडाले
ज्ञानी यमी समरसिंह तळास गेले

त्यानंतर कवीला अंतःसृष्टींतहि वसंत विनटलेला दिसतो. 'वसंतमाधव' या काव्यांत चंद्रशेखरांचें वर्णनकौशल्य व वेदांतप्रवणता यांचें सुंदर संमिश्रण झालें आहे. 'काय हो चमत्कार' या काव्यांतील शिशिरऋतूंतील रात्रीचेंहि वर्णन चांगलें साधलें आहे. 'मानसांतील प्रतिबिंबें' या काव्यांतील

मानससरोवराचें वर्णनहि मनोहर वाटते. पण या सर्वांपेक्षांहि त्यांचें ' गोदागौरव ' हें काव्य निरुपमसुंदर आहे. या काव्यांत चंद्रशेखरांनीं गोदावरी नदीचें व तिच्या सान्निध्यांत कंठिलेल्या सुखप्रद दिवसांचें सुंदर वर्णन केलें आहे. माडखोलकरांनीं म्हटल्याप्रमाणें त्यांतील प्रत्येक स्थलाचें, दृश्याचें आणि व्यक्तीचें वर्णन आत्मीयतेच्या जिव्हाळयानें केलेलें असल्या-मुळें, बायरनच्या ' चाइल्डहेरॉल्ड ' या काव्याप्रमाणें, त्याला उत्कृष्ट वैणिकाची माधुरी प्राप्त झाली आहे." ( प्रस्तावना पृ. ९ ) ' गोदावरीचा उगम', ' गंगाद्वारी भजन ', 'नासिक पंचवटी', 'हिरावाडी ', ' पंचवटी व तपोवन,' ' टाकळी आणि ओढे ' हे सारे भाग हृदयंगम वठले आहेत. ' नासिक पंचवटीचा ' प्रारंभच कसा केला आहे पाहा:—

तुज हृदयंगम रवे विहंगम—भाट सकाळीं आळविती
तरु तीरीचे तुजवरि वल्ली पल्लवचामर चाळविती
तुझ्या प्रवाही कुंकुम वाही बालरवि जणुं अरुण करी
जय संजीवनि जननि पयोदे श्री गोदे ! भवताप हरी ॥

या काव्यांत वर्णन व चिंतन याचा मिलाफ झाला असल्यामुळे या काव्याला एक प्रकारचे अनन्यसामान्य वैशिष्टय प्राप्त झाले आहे. कुरुंदवाडकर यांच्या 'गंगावर्णन' या काव्यापेक्षां चंद्रशेखरांचें ' गोदागौरव ' हें काव्य त्यांतील भावनिर्भरतेमुळें अधिक रसपूर्ण वाटते. सारांश, चंद्रशेखरांचीं सृष्टिवर्णनें भावनोत्कट असूनहि मृदुललित पदपंक्तींनीं मंडित असल्यामुळे इतकीं मनोज्ञ वाटतात.

साधुदास यांच्या ' गृहविहार ' व ' वनविहार ' या महाकाव्यांतूनहि ऋतुवर्णनें आढळतात. पण तीं संस्कृत महाकवींचा आदर्श पुढें ठेऊन लिहि-लेलीं असल्यामुळें त्यांत फारसे नाविन्य नाहीं. खरेशास्त्री यांच्या 'यशवंतराय' महाकाव्यांतील वर्णनांत सुबोधता अधिक आहे. अनंततनयांच्या ' शारदादूतिका ' या काव्यांतील 'खंडाळयाच्या घाटांतील' वर्णनांत हंसाचा

उल्लेख हास्यास्पद वाटतो. सारांश, कुरुंदवाडकर, चिंतामणी पेटकर, लेंभे, चंद्रशेखर, साधुदास, खरेशास्त्री व अनंततनय यांचीं वर्णनें सविस्तर व संस्कृतप्रचुर असलीं तरी तीं एक चंद्रशेखर कवि वगळल्यास बव्हंशीं परलक्षी ( objective ) अशीं आढळतात. निसर्गातील दृश्यांचें बाह्यवर्णन करण्याकडे त्यांचा कल असल्यामुळें त्यांत त्यांच्या भावना–कल्पना, विकार–विचार व आशा–आकांक्षा यांचें प्रतिबिंब दृग्गोचर होत नाहीं. सृष्टीशीं कवि पूर्णपणें समरस झाल्याचा वाचकांना त्यांचीं काव्यें वाचतांना केव्हांच प्रत्यय येत नाहीं. एक चंद्रशेखर कवि वगळल्यास इतरांचीं सृष्टिवर्णनें बव्हंशीं सांकेतिक वाटतात. इतकेंच नव्हे तर त्यांत प्रमाणबद्धता ( sense of proportion ) हा गुणहि आढळून येत नाहीं. कोणत्याहि दृश्याचे वर्णन करीत असतां आपणांला माहीत असलेल्या सर्व वस्तूंचा निर्देश करण्याची प्राचीन कवींची पद्धति याहि कवींनीं स्वीकारली होती. यामुळें यांच्या सृष्टिवर्णनांत मर्यादातिरेक हा दोष उत्पन्न झाल्यास त्यांत नवल नाहीं. पण या दोषाबद्दल त्यांना फारसे दूषण देण्यांतहि अर्थ नाहीं. कारण संस्कृत कवींचा आदर्श पुढें ठेऊन व प्राचीन कवीचा कित्ता गिरवून हीं वर्णनें कवींनी केलीं असल्यानें त्यांत विचार-नाविन्य, कल्पनाविलास, भावगांभीर्य यांचा फारसा आढळ होत नाहीं. म्हणून आतांपर्यंत उल्लेखिलेल्या कवींच्या वर्णनांत आत्मपरता आढळत नसल्यामुळें ती भाषेच्या दृष्टीनें सालंकार असलीं तरी भावनेच्या दृष्टीने सजीव वाटत नाहींत. सृष्टीशीं तद्रूप होऊन तिच्यांशीं आत्मीयतेच्या भावनेनें हितगुज करण्याला प्रारंभ केशवसुतांपासून झाला असें म्हणावयास हरकत नाहीं.

केशवसुतांनीं आत्मलक्षी ( subjective ) पद्धतीनें पुष्कळ सृष्टि-वर्णनात्मक गीतें लिहिलीं आहेत. ‘ पुष्पाप्रत ’ ( पृ. ५९ ) या कवितेंत त्यांनीं ‘सर्वांना प्रीतीचें रम्य तत्त्व सांग’ असा फुलाला उपदेश केला आहे.

' पुष्पाप्रत ' ( पृ. ८७ ) या फुलाला उद्देशून लिहिलेल्या दुसऱ्या कवितेंत त्यांनीं आपल्या जीविताची निष्फलता व्यक्त केली आहे. त्याचप्रमाणें त्यांनीं 'वातचक्र', ' संध्याकाळ ', ' पर्जन्याप्रत ' इत्यादि अनेक सृष्टिगीतें लिहिलीं आहेत. निसर्गदृश्यांशीं समरस होऊन त्याचें भावनात्मक वर्णन करण्यापेक्षां त्यांवर सुचलेले विचार प्रगट करण्याकडे त्यांचा कल अधिक होता. व या वर्णनाला अवश्यक असणारें नादमाधुर्य त्यांच्या काव्यांत नसल्यामुळें त्यांचीं सृष्टिगीतें फारशीं सरस वाटत नाहींत. केशवसुतांच्यापेक्षां रे. टिळक यांचीं गीतें श्रुतिमनोहर आहेत. त्यांच्या ' सृष्टीची भाऊबीज ' या काव्यांतील संवादांत जो लाडिकपणा आहे तो निःसंशय मनाला मोहविणारा आहे. त्यांचें ' वनवासी फूल ' हें काव्य तात्त्विक असलें तरी त्यावरून त्यांची निसर्गप्रियता प्रत्ययाला येते. ' सृष्टीची करमणुकीची घटिका ' या गीतांत त्यांनीं वसंतऋतूचें वर्णन केले आहे. पारखी, धूर्जटी, राजवाडे यांनीं केलेलें वसंतवर्णन व रे. टिळकांनीं केलेले वसंतवर्णन यांत महदंतर आहे. कारण या कवितेंत केवळ वसंतऋतूचें बाह्यवर्णन नसून कवि हा सृष्टिदेवाशीं पूर्णपणें समरस झाला आहे असा वाचकांना भास होतो. वसंतऋतूंतील प्रत्येक गोष्टीचा उल्लेख करून त्याला उपमेची किंवा उत्प्रेक्षेची जोड दिली आहे. उदाहरणार्थः—

नवीं फुलें येतीं
वसंतीं नवीं फुलें येतीं
जणुं तारे उतरुनि करमणुकीस्तव धरणीवर येती
यजमान निमंत्रित जनीं जसा वावरे
हा मंद सुगंधित वायु तसा संचरे
इतरांस सौख्य जें तें याचें सुख खरें
भ्रमर मला म्हणती
मुदित हे भ्रमर मला म्हणती
बे वसंत आहे तोवर करुं आपण गुणगुण ती.

टिळकांच्या या काव्यांतील वसंतवर्णनाबरोबरच सौ. सरोजिनी नायडू यांचें पुढील वसंतवर्णनहि वाचण्याजोगें आहे:—

Springtime, O Springtime, what is your essence
The lilt of a bulbul, the laugh of a rose
The dance of the dew on the wings of a moonbeam
The voice of the zephyr that sings as he goes
The hope of a bride or the dream of a maiden
Watching the petals of gladness unclose?
Springtime, O Springtime, what is your secret
The bliss at the core of your magical mirth
That quickens the pulse of the morning to wonder
And hastens the send of all beauty to birth
That captures the heavens and conquers to blossom
The rcots of delight in the heart of the earth ?

सौ. नायडू यांच्या या कवितेंत शब्दलालित्यच अधिक आढळतें. पण टिळक यांच्या काव्यांत शब्दसौन्दर्याबरोबर अर्थगांभीर्यहि विशेष आहे. त्यांच्या ' पर्वतारोहण ' या काव्यांत वाईपासून तो पांचगणीपर्यंतच्या प्रदेशाचें वर्णन केलें आहे. त्यांचें ' वनवासी फूल ' हें काव्य तात्त्विक असलें तरी त्याची सृष्टिगीतांतच गणना केली पाहिजे. या खंडकाव्यांत प्रवृत्तिधर्माचा पोवाडा गाइला असून त्यांतील प्रीति–मीमांसेमुळें या काव्याला इतकी प्रसन्नता लाभली आहे. टिळकांच्या सृष्टिविषयक काव्यांत कल्पकतेचा अभिनव विलास नाहीं हें खरें. पण वर्णनाचा प्रत्येक भाग नीटनेटकेपणानें बसविण्यांत त्यांचें कोरीव कौशल्य दिसून येतें यांत शंका नाहीं.

केशवसुत व रे. टिळक यांच्यापेक्षां बालकवींचीं निसर्गकवनें अधिक रसपूर्ण वाटतात. किंबहुना अर्वाचीन कवींत सृष्टिगीतें लिहिणाऱ्या कवींत त्यांनाच अग्रपूजेचा मान दिला पाहिजे. सृष्टि ही चैतन्यरहित

वस्तु आहे असें त्यांना वाटत नसे. तर ती एक सचेतन व स्फूर्तिदायक चित्शक्ति आहे अशी त्यांची समजूत होती. सृष्टीच्या सजीवत्वाची मूर्तिमंत जाणीव बालकवींच्या काव्यांत दिसून येते. पदार्थमात्रांत, सर्व प्रकृतीत व अखिल विश्वांत एक चित्तत्व भरून राहिलें आहे अशीं सृष्टींतील ललितमोहक दृश्येंच त्यांना विलोभनीय वाटत असत. बालकवींचें ‘ अरुण ’ हें काव्य अतीव मनोहर आहे. या काव्यांत अखिल मानवी जातीला उत्फुल्ल करणाऱ्या उषःकालाचें उज्ज्वलरम्य वर्णन केलें आहे. उषःप्रभेचें सौंदर्य इतकें आकर्षक असतें कीं तिच्याविषयीं ऋग्वेदांतील सूक्तें रचणाऱ्या ऋषींपासून तों आजपर्यंतच्या अनेक सत्कवींनीं वर्णनें केलीं आहेत. बालकवींच्या या काव्यांचें सहा चौक आहेत. पहिल्या चौकांत नभोमंडलावर अरुणोदय झाला असून जिकडे तिकडे आरक्तवर्णाची रुचिर प्रभा पसरली आहे हें सांगितलें आहे. दुसऱ्या चौकांत कवींनीं अरुणाच्या रक्त वर्णावर अनेक उत्प्रेक्षा रचल्या आहेत. अरुणचितारी नभःपटाला रंगवितो आहे किंवा उषासुंदरी दारीं येऊन आपल्या राजसहस्तांनीं रम्य रांगोळी काढत आहे कीं काय असा भास होतो. या चौकांतील पुढील, उत्प्रेक्षा कुणाला हृदयंगम्य वाटणार नाहींतः—

कीं स्वर्गीच्या दिव्यांचें हें फुटलें भांडार,
जणूं वाटतें स्वर्गचि त्यासह खालीं येणार ?
प्रगट जाहलें श्रीरामाचें पुष्पक किंवा हें ?
कीं सोन्याची पुरी द्वारका लखलखते आहे ?

—पृ. २–३

तिसऱ्या चौकांत बालकवींनीं दिशांचा संवाद वर्णिला असून अरुणोदय हा प्रेमकाळ आहे. म्हणून जिकडे तिकडे सोनें उधळून सगळें विश्व मधुस्मितानें भरून टाकूं असें आपापसांत म्हणत आहेत. सूर्य उदयाचलावर आल्यावर पूर्वदिशा अधोवदन झाली व प्रेमाची अद्भुतलहरी वसुधेवर

आली. चवथ्या चौकांत प्रेमाचें महात्म्यवर्णन केलें आहे. पांचव्या चौकांत हा प्रेमाचा लोंढा आकाशांतून खालीं आला असून पर्वत, वनमाला, वनदेवी, मंदानिल यांत सानंद विहार करावयाला कवीनें सांगितलें आहे. अरुणोदय झाल्यामुळें सगळीजण हर्षोत्कट झालें असून चराचराच्या चित्तांत दिव्यगान भरून गेलें आहे असें सहाव्या चौकांत सांगितलें आहे.

दिव्य गायनें दिव्य शांतता दिव्याचे झोत
वसुंधरेच्या अरुण ओतितो नकळत हृदयांत
त्या दिव्यानें स्वर्भूमीचें ऐक्य असें केलें
त्या दिव्यानें मांगल्याचे पाठ सुरू झाले !
मंगलता ती दिव्य कवीला टाकी मोहूनी.
वाग्देवीनें सहज गुंफिली मग त्याचीं गाणीं

—( बाल कवि पृ. ५ )

असें म्हणून अरुणोदयानें जगांत दिव्यशांतता, मांगल्य, भरून गेलें आहे असा या काव्याचा बहारदार शेवट केला आहे. प्रस्तुत कवितेंत बालकवींनीं उषःकालचें वर्णन व भावनेचें आविष्करण यांचें मिश्रण केलें असून त्यांत श्रवणसुखद पदलालित्याची भर पडली आहे. सारांश, बालकवींचें 'अरुण' हें काव्य सृष्टिवर्णनात्मक कवनाचा उत्कृष्ट नमुना आहे यांत शंका नाहीं.

'अरुण' या काव्यांत बालकवींनीं जसें उषःकालचें वर्णन केलें आहे तसेंच 'संध्यारजनी' या गीतांत संध्याकाळचें वर्णन केलें आहे. या काव्यांत सूर्यास्तापासून तों चंद्रोदय होईपर्यंतचा काळ उत्कृष्टपणें चित्रित केला आहे. सूर्यास्त, संधिप्रकाश, तरल तारकांचें नृत्य नक्षत्र-मंडित गगनश्रीचें वैभव, उदयगिरीवर प्रशांत सुधाकराच्या शुभ्रशीतल प्रभेचा उदय, गगनाच्या चौकांत रजनीनाथ आले असतां चंद्रिकेचा व दिव्य यामिनीचा प्रेमसंगम व प्रेमाचा फेर धरलेल्या अहांडाचें डुलणें या सर्व

दृश्यांचें बहारदार वर्णन वाचत असतां वाचकांचें मन हर्षनिर्भर होतें. तारकामंडित आकाशाला उद्देशून कवि ह्मणतात. : —

नव टिकल्यांची चंद्रकळा कीं गगनःश्री नेसे ?
स्वर्गीचें भांडार उघडलें कीं रात्रीसरसें ?
विश्वशिरावर टोप चढविला हिरामाणक्यांचा
मंगल मंगल जिकडे तिकडे जय मांगल्याचा

—[ बाल कवि पृ. १० ]

या काव्यांत कवींनीं प्रारंभापासून तों शेवटपर्यंत प्रेमाचें प्रसन्न वातावरण सारखें खेळत ठेवलेलें असल्यामुळें त्याला इतकी प्रलोभनियता प्राप्त झाली आहे.

'अरुण' व 'संध्यारजनी' या काव्यापेक्षां बालकवींचें निर्झर हें काव्य अधिक तात्त्विक आहे. 'निर्झर' या काव्याचें सहा चौक असून त्यांत निर्झराला पाहून कवीच्या हृदयांत जे विचार उत्पन्न झालें त्याचें वर्णन केलें आहे. प्रारंभीचें हें—

गिरिशिखरें वनमाला ही दरी दरी घुमवित येई
कड्यावरुनि घेऊन उड्या खेळ लतावलयीं फुगड्या
घे लोळण खडकावरती फिर गरगर अंगाभवती
जा हळु हळु वळसे घेत लपत छपत हिरवाळींत
पाचूचीं हिरवीं पानें झुलव गडे झुळझुळ गानें
वसंत मंडप वनराई आंब्याची पुढती येई

—( बाल कवि पृ. ६ )

वर्णन वाचून जणूं कांहीं आपल्या डोळयांपुढून एकादा झराच झुळझुळ वाहात जात आहे कीं काय असा भास होतो. निर्झराच्या गतीच्या या वर्णनावरून बालकवींची चित्रणचातुरी किती प्रशंसनीय होती याची कुणाकाहि कल्पना येईल. दुसऱ्या चौकांत निर्झराच्या जादूनेंच सगळें वन नंदनवन बनलें आहे. व तूं वनांत दिव्य स्फूर्ति भरली आहेस असें

कवीनें म्हटलें आहे. निर्झराला मेघपंक्ति, इंद्रधनु, तारका, चंद्रिका या दिव्य वस्तु भेटावयाला कशा येतात यांचें वर्णन चवथ्या चौकांत केलें आहे. निर्झराच्या गाण्यानें सगळें स्थिरचर गानमय झालें आहे असें पांचव्या चौकांत कवीनें सांगितलें आहे. या काव्याचें शेवटचें दोन चौक तात्त्विक विचारांनीं भरलें आहे. निर्झराला उद्देशून कवि म्हणतो कीं हे निर्झरा ! तूंच खरा कवीश्वर आहेस. कारण—

मी कवितेचा दास मला कवी बोलती जगांतला
परि न झरे माझ्या गानीं दिव्यांची असली श्रेणी !
जडतेला खिळुनी राही हृदयबंद उकलत नाहीं
दिव्य रसीं विरणें जीव जीवित हें याचें नांव
ते जीवित न मिळे मातें मग कुठली असली गीतें—पृ. ७

म्हणून कवी म्हणतातः—

तूंच खरा कविराज गुणी सरस्वतीचा कंठमणी !
अक्षय तव गायन वाहें अक्षयांत नांदत राहे! —पृ. ७.

या काव्यांत निर्झराचें वर्णन करीत असतां बालकवींनीं आपल्या अंतःकरणांतील तळमळ ओतली आहे. आपण कितीहि सुंदर गाणीं गात असलों तरी निर्झरांच्या गाण्यांची मोहिनी नाहीं याबद्दल कवीला विषाद वाटतो. व ती विषण्णता बालकवनींनीं या गीतांत हृदयस्पर्शीरीतीनें व्यक्त केली आहे. सारांश, बालकवींचें 'निर्झर' हें काव्य केवळ वर्णनात्मक नसून तात्त्विक व चिंतनात्मक असल्यामुळें या काव्याची उत्कृष्ट उद्देशिकांत (ode) गणना करावयाला हरकत नाहीं.

बालकवींचें 'फुलराणी' हें काव्यहि हृदयंगम आहे. या काव्यांत सूर्याच्या किरणानें एक कलिका प्रफुल्लित झाली या एका साध्या कल्पनेवर या काव्याची उभारणी झाली आहे. सूर्यकिरण व फुलराणी यांचा मंगल रमणीय विवाहसमारंभ या काव्यांत इतक्या सुंदर रीतीनें वर्णिला आहे

कीं प्रा. ना. के. बेहेरे यांनीं म्हटल्याप्रमाणें "या एका कवितेशिवाय बालकवींनीं दुसरी एक ओळहि लिहिली नसती तरी त्यांचें नांव अजरामर झालें असतें." (काव्यचर्चा पृ. २७९). या काव्यांतील फुलराणीचं वर्णन, संध्यावाताचा विनोद, आकाशांतील प्रणयक्रीडा व फुलराणीचा विवाहसमारंभ हे भाग विशेष उल्लेखनीय आहेत. लग्नसमारंभ झाल्यावर कवि म्हणतात:—

गाऊं लागले मंगलपाठ—सृष्टीचे गाणारे भाट,
वाजवि सनई मारुत राणा—कोकिळ घे तानावर ताना!
नाचुं लागले भारद्वाज—वाजविती निर्झर पखवाज,
नवरदेव सोनेरी रविकर—नवरी ही फुलराणी सुंदर
लग्न लागतें! सावध सारे! सावध पक्षी सावध वारे
दंवमय हा अंतःपट फिटला—भेटे रविकर फुलराणीला!
—(पृ. १३–१४)

सारांश, हें काव्य म्हणजे 'रविकिरण—फुलराणी—स्वयंवराख्यान' आहे असें म्हणतां येईल. या काव्यांत तत्त्वचिंतन, गहन विचार किंवा बुद्धिप्रकर्ष यांपैकीं एकहि गोष्ट नाहीं. केवळ कल्पकतेच्या ललितरम्य विलासामुळें या काव्याला इतकी अलौकिक आल्हादप्रदता लाभली आहे.

येथपर्यंत बालकवींच्या प्रमुख निसर्गगीतांचा उल्लेख केला. त्याशिवाय त्यांनीं 'संध्यातारक' 'तारकांचें गाणें,' 'श्रावणमास' 'फुलपाखरूं—फुलवेली', 'बालविहग', 'तडाग असतों तर', 'शुक्रोदय', 'पांखरास' 'शारदीय सौंदर्य—देवता'—इत्यादि सृष्टिगीतें लिहून मराठी काव्यांतील निसर्ग—काव्याचें दालन संपन्न व संमोहनीय केलें आहे. बालकवींच्या वृत्तींत मार्दव विशेष असल्यामुळें निसर्गांतील प्रसन्न व प्रशांत दृश्यांच्या वर्णनाकडेच त्यांनीं अधिक लक्ष दिलें आहे. सृष्टींतील भीषण, रौद्र व भयानक देखावे यांचीं वर्णनें करणें त्यांना केव्हांहि शक्य नव्हतें. कारण त्यांची वृत्ति—

सुंदरतेच्या सुमनावरचे दव चुंबुनि घ्यावें
चैतन्याच्या गोड कोंवळया उन्हांत हिंडावें
प्रीतिसारिका गीत तियेचें ऐकावें कांनीं
बनवावें मन धुंद रंगुनी काव्यसुधापानीं ! —पृ. २३

अशी सौंदर्यप्रवण व प्रेममय असल्यामुळें त्यांनीं वर्णनाला सुंदर व प्रेमळ असेच विषय निवडले. यामुळें त्यांच्या सृष्टिगीतांत वैचित्र्याचा अभाव असला तरी त्यांतील विमलरम्यतेमुळें आपलें मन मोहून जातें. सारांश, बालकवींनीं निसर्गांतील केवळ कमनीय दृश्यांकडे आपली दृष्टि वळविली असून तिचें भव्यभीषण, रौद्र आणि गहनगंभीर अशा दृश्यांचें वर्णन त्यांच्या काव्यांत आढळत नाहीं. तसेंच ऋतुवर्णनाकडेही त्यांनीं आपली दृष्टि वळविलेली दिसत नाही. यांवरून त्यांच्या सृष्टिवर्णनात्मक प्रतिभेची भरारी मर्यादित होती किंवा त्यांच्या मृदुलतरवृत्तीमुळें त्यांची प्रतिभा निसर्गाच्या रुचिर दृश्यांतच रमून राहिली असें वाटते. शेवटीं,

मधुयामिनि नीललता
हो गगनीं सुमयुता
धवलित करि पवनपथा
कौमुदि मधुमंगला — १
दिव्य शांति चंद्रकरीं
आंदोलत नीलसरीं
गिरिगिरिवरि तरुतरुवरि
पसरी नव भूतिला — २
सुप्रसन्न पुण्यशांत
रामण्यक हरितधौत
या मंगल मोहनांत
विश्वगोल रंगला — ३

(पृ. ८)

ही ' मधुयामिनी ' ही मृदुलमधुर गीतिका (song) उद्धृत करून आपण त्यांच्या सृष्टिवर्णनात्मक काव्याची रजा घेऊं. कारण या चिमुकल्या गीतांत बालकवींच्या रम्योज्ज्वल प्रतिभेचें चारुतर स्वरूप उत्कृष्ट रीतीनें दृष्टोत्पत्तीला येतें.

बालकवींच्या खालोखाल दत्तकवींनीं सुंदर निसर्गगीतें लिहिलीं आहेत. दत्तांना निसर्गांत रममाण होण्यांत निस्सीम आनंद वाटत असे. म्हणून कविवर्य चंद्रशेखर यांनीं म्हटल्याप्रमाणें, " हे कवि निसर्गाचें एकनिष्ठ उपासक असत. फुरसत मिळाली कीं पुरें, कोठेंतरी त्याच्या सानिध्यांत जाऊन सृष्टिसौंदर्याचे निरीक्षण करण्यांत ते दंग व्हावयाचें आणि रंगले कीं लागले गुंगायला." या योगानेंच त्यांच्या काव्यांपैकीं बहुतेक कविता सृष्टिवर्णनपर होऊन त्यांतून नैसर्गिक प्रेम, निरागस अभिरुचि आणि अकृत्रिम मार्दव हे गुण जागोजाग बोलून उठतात (दत्तांची कविता पृ. १२ ) त्यांची 'बाई लतिके' (पृ. १६) 'सख्या वसंतवाता' (पृ. २९ ) ' मुग्धकलिका ' ( पृ. २२ ) ' कुसुमलालन '( पृ. २६ ) ' कोकिलकूजित' ( पृ. ३० ) आणि 'विश्वामित्रीकाठीं' (पृ. ४०) 'प्रभात' ( पृ. १७ ) हीं त्यांचीं उत्कृष्ट निसर्गवर्णनात्मक काव्यें आहेत. बालकवि व दत्त यांच्या काव्यांत एक मोठा फरक दिसतो तो असा कीं बालकवींच्या काव्यांत प्रेममय वातावरण असतें हें खरें. पण दत्तांच्या निसर्गगीतांत मधूनमधून शृंगाराच्या छटा अधिक आढळतात. ' बाई लतिके ' या काव्यांत लतिकेचें ललनेशीं साम्य कल्पून तिचें प्रणयात्मक वर्णन केलें आहे. कवि म्हणतात — हे लतिके !

नवती नव ही रसरसली
दिसेल कां मज नवयुवतीच्या तरुणपणीं असली
तव लुसलुसित पल्लवांना
पाहुनि कामिनि बिम्बाधर त्यजितील खचित माना (पृ. १६)

'सख्या वसंतवाता' या काव्यांतहि ह्याच प्रकार आढळतो. कवि वसंतवाताच्या ठिकाणीं इतकी शीतलता कां असावी याविषयीं त्याला विचारतात :—

अथवा सरिताच्या कटिभागा घट्ट मिठी मारिली
म्हणूनि कां शीतलता लाभली ?
चोरिलीस कां शीतलता ही कमलवनीं जाउनी ?
ठेविते भ्रमर तुला बांधुनी ?
ललितलतांच्या अधरपल्लवा हलुंच काय चुंबिलें ?
वा कुचगुच्छा संमर्दिले ? (पृ. २१)

एकंदरींत दत्तांच्या निसर्गगीतांत प्रणयाच्या छटा आढळून येते असल्यामुळें त्यांना एकप्रकारची रमणीयता प्राप्त झाली. त्यांचें 'विश्वामित्रीच्या कांठीं' हें काव्य मात्र निरागस गीत आहे. या काव्यांतील सरिज्जलांत प्रतिबिंबित झालेल्या जोत्स्नाविलसित व तारकावलयित नभोमंडलाच्या वर्णनांत कल्पनाविलास आढळतो. विशेषत: या काव्यांतील

स्मरण शक्तिके जागृत होई
दर्शनदुर्लभ शोभा पाही
विसरुं नको बघ यांतील कांहीं
वारंवार— कोठुनि हें दिसणार ? (द. क. पृ. ५१)

या ओळी अत्यंत हृदयस्पर्शी वाटतात. दत्तांच्या काव्यावर संस्कृत साहित्याच्या सूक्ष्म परिशीलनाचा प्रबल संस्कार झालेला आहे हें 'कोकिल-कूजित' या काव्यावरून दिसतें. सारांश, दत्तांच्या निसर्गगीतांत— श्रुतिसुखद पदलालित्याबरोबरच कल्पनाविलास, प्रणयोत्कटता व ईशभक्ति हें गुण प्रत्ययाला येतात.

गोविंदाग्रजांचीं निसर्गगीतें फारशीं सरस वाटत नाहींत. त्यांच्या 'अरुण', 'प्रेमपाठ' इत्यादि गीतांत चमत्कृतिजनक उत्प्रेक्षेव्यतिरिक्त वैशिष्ट्य आढळत नाहीं. नाहीं म्हणावयाला त्यांच्या 'पुढील'—

नाचत ना गगनांत नाथा तारांची बरसात ।
आणित होती माणिकमोती वरतुनि राजसरात ।
नाव उलटली माव हरपली चंदेरी दरियांत ।
ती ही वरची देवाघरची दौलत लोक पहात ॥ —वाग्वैजयंती

या कवितेंत जोत्स्नाविलसित व तारकावलयित गगनश्रीचें कल्पनारम्य वर्णन आढळतें. रेंदाळकरांनीं सुमारें पन्नास सृष्टिगीतें लिहिलीं आहेत. 'उद्यान', 'कोकिल', 'यामिनीवल्लभ', 'इंद्रधनुष्य', 'चंद्रास पाहून', 'पुष्पास', 'वसंततारा,' 'मधमाशी' व 'प्रभातकाळ' या काव्यांत निसर्गातील विविध दृश्यांची वर्णनें केलीं आहेत. पण रेंदाळकरांचें सर्वोत्कृष्ट गीत जर कोणते असेल तर तें 'प्रबोधन' हें होय. त्यांच्या काव्यांत संस्कृत भाषेंतील संकेत वापरले असून त्यांत पुनरुक्ति व पाल्हाळ हे दोष प्रामुख्यानें आढळतात. माधवानुजांनींहि विपुल सृष्टिगीतें लिहिलीं असलीं तरी तत्त्वपर्यवसायित्वामुळें त्यांतील सौंदर्य कमी झालें आहे. पण त्यांची 'गंगाशरयूसंगम' व 'सुरेख संगम किती' हीं गीतें चांगलीं आहेत. सावरकरांनीं 'कमला' या काव्याच्या प्रारंभीं फुलबागेचें बहारदार वर्णन केलें असून त्यांच्या 'तारकास पाहून' या उत्प्रेक्षामंडित कवितेत त्यांच्या प्रतिभेचा उज्ज्वलरम्य विलास दृग्गोचर होतो. श्री. न. चिं. केळकर व श्री. कृ. कोल्हटकर यांचें 'पाऊस' हें गीत चमत्कृतिजनक आहे. माधव, बोरकर व कारे यांनीं कोकणांतील सृष्टिसौंदर्याचीं शद्बचित्रें रेखाटली आहेत. तसेच य. न. केळकर यांच्या 'सुखाचें माहेर' 'वक्रविधुकोर', 'बागेंतील सकाळ', 'चांदणी पहाट', 'पाऊस' या गीतांचा येथे उल्लेख करितां येईल. Bee, इंदुकांत, माधवज्यूलियन, यशवंत, गिरीश, प्रभाकर व तांबे यांनींहि सृष्टिवर्णनात्मक गीतांत चांगली भर घातली आहे. इंदुकांत यांच्या 'प्रदोष' व 'वायुलता' या दोन सुश्लिष्ट काव्यांचा प्रामुख्यानें उल्लेख करितां येईल. चिदंबर नारायण कुलकर्णी यांचीं सृष्टिगीतेंहि सुंदर असून त्यांच्या काव्यावर रेंदाळकर व बालकवि

यांच्या काव्यरचनेची छाप पडली आहे. अत्युत्कट भावना व अकृत्रिम निसर्गप्रियता हे त्यांच्या काव्याचे विशेष आहेत.

येथपर्यंत मराठी काव्यांतील निसर्गगीतांचें समालोचन केलें. त्यावरून मराठी काव्यांत निसर्गाची कोणी कशी उपासना केली आहे यांची वाचकांना कल्पना येईल. प्राचीन कवींचीं सृष्टिवर्णनें विषयलक्षी आहेत; व त्यांत सृष्टींतील बाह्य स्वरूपाचेंच वर्णन विशेष आढळतें. सृष्टीला अंतरात्मा असून तो मनुष्याप्रमाणें संवेदनापूर्ण आहे अशी कल्पना त्यांच्या काव्यांत दिसून येत नाहीं. हीच सृष्टिविषयक कल्पना अर्वाचीन काळांतील पारखी-राजवाडेप्रभृति शास्त्री कवींच्या काव्यांतहि आढळते. सृष्टीशीं संपूर्णतया समरस होऊन भावनिर्भर सृष्टिगीतें रे. टिळक, बालकवि व दत्त यांनींच लिहिलीं आहेत. त्यांतहि टिळकांचीं गीतें तात्त्विक, बालकवींचीं निरागस व दत्तांचीं प्रणयरम्य अशीं वाटतात. अर्वाचीन कवींनीं निसर्गातील विविध दृश्यांचा परामर्श घेतला असला तरी समुद्रासारख्या विषयाकडे त्यांनीं दुर्लक्ष केलें आहे. इंग्रजी भाषेंत स्विन्बर्न, शेले, बायरन्, टेनिसन यांनीं जशीं समुद्राच्या विविध रूपांचीं वर्णनें केलीं आहेत तशीं मराठी काव्यांत कोणींहि केलीं नाहींत. नाहीं म्हणावयाला खरेशास्त्री यांचें ‘ समुद्र ’ व कारे यांचें ‘ सागरास ’ हीं दोन समुद्रविषयक काव्यें आढळतात. त्याचप्रमाणें सृष्टीच्या भीषण व भयानक दृश्यांचें वर्णनहि अधुनिक काव्यांत आढळत नाहीं. सृष्टीच्या सर्वांगीण स्वरूपाचें वर्णन करणें हें विशाल प्रतिभेच्या कवीचें ध्येय असलें पाहिजे. सारांश, जोपर्यंत मानवी हृदयांत सौंदर्यपिपासा जागृत आहे तोपर्यंत सृष्टिविषयक काव्यनिर्मितीला खंड पडणार नाहीं. कारण, निर्झराच्या वर्तनांत, अनिलाच्या आंदोलनांत, सुमनाच्या स्मितांत, सागराच्या संगीतांत व कोकिलाच्या कूजनांत काव्यदेवतेचें हास्य व लास्य दृग्गोचर होत नाहीं काय ?

---

# प्रकरण नववें

## मराठी काव्याचें भवितव्य

पूर्व दिव्य ज्यांचें त्यांना रम्य भाविकाल
हाच बोध इतिहासाचा सदा सर्वकाळ
कासया वहावी चिंता मनीं मग जहाल
रात्र सरे तेव्हां उगवे दिनहि पूर्व वाटे

— विनायकाची कविता पृ. ७

गेल्या सात प्रकरणांत प्राचीन व अर्वाचीन मराठी काव्याचें तुलनात्मक समालोचन केलें. मराठी काव्यांत कोणतीं युगें प्रवर्तित झालीं व रस, रीति, रचनाप्रकार यांत कशीं स्थित्यंतरें होत गेलीं याचें विवेचन केलें. डॉ. केतकर यांनीं ज्ञानकोशांत 'आजपर्यंत होऊन गेलेलें मराठी वाङ्मय सर्व जळून गेलें तरी जगाचें काव्यनाश या दृष्टीनें कांहीं-एक नुकसान होणार नाहीं' असे असमंजपणाचे उद्गार काढले आहेत मराठी ज्ञानकोशांत काव्याविषयीं अशा प्रकारचा अभिप्राय नमूद केला जावा यासारखी दुसरी कोणतीच शोचनीय गोष्ट असूं शकणार नाहीं. इंग्रजी, संस्कृत, जर्मन इत्यादि भाषेतील काव्याचें विश्वात्मक साहित्यांत जें महत्त्व तेंच मराठी काव्याचेंहि आहे. प्रत्येक भाषेतील काव्याची प्रकृति भिन्न असली तरी त्यांतील सौंदर्य आदरणीय असतें भक्त्युत्कटता व भव्योदात्तता हीं मराठी काव्याचीं अनन्यसामान्य लक्षणें असल्यामुळें त्याची योग्यता कोणत्याहि दृष्टीनें कमी लेखण्याचें कारण नाहीं. आपल्याजवळ असलेल्या रत्नाला गारगोटी मानणें ही अनुकंपनीय आत्मवंचना आहे. प्राचीन व अर्वाचीन अशा प्रमुख कवींच्या कलाकृतींना जर आंग्लवर्ण लाभेल तर अखिल विश्वांतील अभिजात रसिकांकडून त्यांना गौरवाचा करभार मिळाल्यावांचून राहणार नाहीं असा आम्हांस दृढ विश्वास वाटतो. आतां कांहीं राहिलेल्या

मुद्यांचा उहापोह करून, मराठी कवितेची सद्यःस्थिति व तिचें भवितव्य यांचा उहापोह या प्रकरणांत करावयाचा आहे.

प्रारंभीं आपण मराठी काव्यांतील तत्त्वज्ञानाचें संक्षिप्त विवेचन करूं. मुकुंदराय-ज्ञानेश्वरप्रभृति सर्व प्राचीन कवींनीं श्री शंकराचार्यांच्या अद्वैततत्त्वज्ञानाचा स्वीकार करून तदनुरोधाने आपलें विशदीकरण केलें आहे. 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैवनापरः' हें श्री शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाचें रहस्य आहे. दृष्टिगोचर होणारे जगत् ह्मणजे सृष्टींतील पदार्थांचें नानात्व खरें नसून या सर्वांत एकच शुद्ध व नित्य परब्रह्म भरून राहिलें आहे. आणि त्याच्या मायेनेंच मानवी इंद्रियांस अनेकत्वाचा भास होतो. मनुष्याचा आत्माहि मूलतः परब्रह्मस्वरूपीच असतो. आत्मा व परब्रह्म यांच्या ऐक्याचें पूर्णज्ञान झाल्याखेरीज कोणासहि मोक्ष मिळणे शक्य नाहीं. यालाच शंकराचार्यांचा 'अद्वैतवाद' असे म्हणतात. ज्ञानेश्वरीत श्रीज्ञानेश्वरांनीं 'अद्वयानंद वैभवाचे' प्रगटीकरण केलें आहे. त्यांतील तत्त्वज्ञान गीतेंतील तत्त्वज्ञानाच्या पायावर आधारलेले असल्यामुळें गीतेंतील प्रकृति–पुरुषसंबंध, क्षराक्षरविवेक, क्षेत्रक्षेत्रज्ञविचार यांचें विवेचन ज्ञानेश्वरांनीं केले आहे. ज्ञानेश्वरांनीं अद्वैताला भक्तीची जोड दिली. किंबहुना त्यांची दृष्टि समन्वयात्मक असल्यामुळें कर्म, ज्ञान, भक्ति व योग यांचें सविस्तर विवरण केलें आहे. त्यांनीं ब्रह्मस्वरूपासच चित्सूर्याची उपमा देऊन सोळाव्या अध्यायाच्या प्रारंभीं त्याचे बहारदार वर्णन केलें आहे. ज्ञानेश्वरांनीं तेराव्या अध्यायांत आपली नीति–मीमांसा ग्रथित केली आहे. त्यांचें आत्मसाक्षात्काराचें वर्णनहि अनुपमेय आहे. सारांश, ज्ञानेश्वरांची तत्त्वज्ञानरूपी लक्ष्मी ही कर्म, ज्ञान, भक्ति व योग या चतुर्दलात्मक कमलावर विराजमान झाली आहे. ज्ञानेश्वरांनंतरच्या सत्कवींनीं त्यांच्याच तत्त्वज्ञानाचा स्वीकार करून भागवतधर्माचें मंदिर उभारलें. एकनाथांनीं "जें जें कर्म स्वाभाविक। तें तें ब्रह्मार्पण करि अहेतुक। या

नांव भजन निर्दोख, भागवतधर्म या नांव शुद्ध (ए. भा. २०-४५१)" अशी भागवतधर्माची व्याख्या केली आहे. नामदेव व तुकाराम यांनीं नामभक्तीचें श्रेष्ठत्व प्रस्थापित केलें. वामनपंडितांनीं 'यथार्थदीपिकेंत' ज्ञानयुक्त सगुणभक्तीचा पुरस्कार केला आहे. समर्थांनीं दासबोधांत प्रपंच व परमार्थ यांची सांगड घालून राजकारणाचेंहि विवरण केलें आहे. आधुनिक काव्यांत अशा प्रकारचें सुसंगत अध्यात्मिक तत्त्वज्ञान आढळत नाहीं. तथापि प्रेमाची महति, समता, व्यक्तिस्वातंत्र्य, जातिभेदाचा नायनाट, स्वातंत्र्यप्रीति, दुष्ट रूढींचें निर्दलन—या सामाजिक व राजकीय तत्त्वांचें प्रतिपादन आढळतें. प्राचीन काव्यांत स्त्रीदाक्षिण्याचा अभाव आहे. संत, पंडित व शाहीर यांनीं स्त्रियांची निंदा केली असून त्या परमार्थांत विघ्नकारक आहेत असें म्हटलें आहे. आधुनिक काव्यांत स्त्रीदाक्षिण्य पराकाष्ठेचें आढळतें, सारांश, प्राचीन काव्यांतील तत्त्वज्ञान आध्यात्मिक असून आधुनिक काव्यांतील तत्त्वज्ञान समाजाभिमुख आहे.

आतां आपण मराठी काव्यांतील दोषांचें दिग्दर्शन करूं. प्राचीन काव्यांतील पहिला दोष म्हणजे 'व्याकरणाकडे दुर्लक्ष' हा होय. वामन, नागेश, आनंदतनय, विठ्ठल यांसारख्या संस्कृत भाषेत निष्णात असलेल्या कवींच्या काव्यांत यतिभंग, ऱ्हस्वदीर्घांची ओढाताण, वृत्तांची शिथिलता हे दोष विपुल आढळतात. एका मोरोपंताखेरीज अभिजात युगांतील कवींनीं व्याकरणाकडे दुर्लक्ष केलें आहे. 'संयमाचा अभाव' हा प्राचीन काव्यांतील दुसरा दोष होय. त्यांच्या काव्यांत कोणत्याहि वस्तुचें वर्णन करितांना तें उचित, मित व ललित असें न करितां पाल्हाळिक व पुनरुक्तीपूर्ण असें वर्णन असावयाचें. त्यांतहि मुक्तेश्वरांची वर्णनें पाल्हाळिक असलीं तरी कल्पनारम्यत्वामुळें प्रसन्न वाटतात. यमकासक्ति हा वामनमयुरांच्या संप्रदायांतील कवींचा ठळक दोष आहे याच यमकासक्तीच्या हव्यासाला सामराज, आनंदतनय, विठ्ठल, नागेश, निरंजनमाधव हे कवि बळी.

पडले आहेत. 'कालविपर्यास' हाहि दोष विशेषत मुक्तेश्वरांच्या काव्यांत आढळतो. मुक्तेश्वरी भारतांतील लीलावतीचा उल्लेख, यंत्रांचा उल्लेख—हे कालविपर्यासाचे दोष होत. 'परिस्थिति पराङ्मुखता' हा प्राचीन काव्याचा एक दोष आहे. पौराणिक कथांचीं वर्णनें करण्यास रममाण झाल्यामुळें त्यांच्या काव्यांत हा दोष प्रादुर्भुत झाला आहे. अर्वाचीन काव्यांतील पहिला दोष म्हणजे 'भाषांतरप्रवणता' हा होय. अर्वाचीन काव्यांत संस्कृत, इंग्रजी, व बंगाली या भाषांतील काव्यांचीं जीं भाषांतरें झालीं ती या दोषांमुळेंच होय. भाषांतरित वाङ्मयाची प्रगति म्हणजे स्वतंत्र काव्यनिर्मितीची अधोगति होय. 'त्रुटितपणा' हा एक दोष अर्वाचीन काव्यांत आढळतो. त्रुटितपणाच्या अतिरेकामुळें काव्यांत नीरसता येते. आत्माविर्भावात्मक प्रवृत्तीमुळे केवळ वैयक्तिक भावनांचें आविष्करण करण्याकडे कवींचें लक्ष वेधलें व यामुळें 'विश्वात्मकतेचा अभाव' हा दोष अर्वाचीन काव्यांत निर्माण झाला. प्राचीन व अर्वाचीन काव्यांतील दोषांकडे साऱ्या काव्यरसिकांनीं दुर्लक्ष करितां कामा नये. सारांश, रचनेंतील शैथिल्य संदर्भाभाव, परिस्थितिपराङ्मुखता, भाषांतर प्रवणता, त्रुटितपणाचा अतिरेक, विश्वात्मकतेचा अभाव हें 'पांच मराठी काव्याचें प्रमुख दोष म्हणून सांगतां येतील.

प्रज्ञाप्रेरित, प्रतिभानिर्मित व प्रसादसमन्वित असे काव्याचें तीन प्रकार कल्पितां येतील. कांहीं कवींच्या ठिकाणीं बुद्धिवैभव अमूप असल्यामुळें त्यांच्या काव्यांत भावनिर्भरता कमी आढळते. त्यांची कविता हें ग्रंथावलोकनाचा परिपाक असतो. अशा प्रकारच्या प्रज्ञाप्रेरित काव्याचें स्वरूप शुभ्र संगमरवरी मूर्तिप्रमाणें असतें. तसेंच कांहीं कवींची विद्वत्ता बेताची असली तरी त्यांची प्रतिभा दूरवर असते. अशा कवींच्या काव्याला प्रतिभाप्रेरित काव्य म्हणावयाला हरकत नाहीं. कांहींजणांच्या काव्यांत शब्दार्थाच्या स्फटिकनिर्मलतेमुळें प्रसाद हाच गुण प्रामुख्यानें आढळतो.

या दृष्टीनें मराठी काव्याकडे पाहिल्यास वामन-मोरोपंत-रघुनाथपंडित व भिडे-चिपळूणकर यांची कविता ही प्रज्ञाप्रेरित म्हणतां येईल. मुक्तेश्वर, गोविंदाग्रज, व Bee यांची कविता प्रतिभानिर्मित आहे. मुक्तेश्वरांच्या महाभारतांत, गोविंदाग्रजांच्या वाग्वैजयंतींत व Bee यांच्या काव्यांत उज्ज्वल प्रतिभेचें कलात्मक विलास कमनीय रीतीने प्रगट झाले आहेत. तुकाराम, श्रीधर, रे. टिळक यांची कविता प्रसादसमान्वित आहे. ज्ञानेश्वरींत माल प्रज्ञा, प्रतिभा व प्रसाद यांचें सुंदर संमिश्रण झालें आहे. अर्थात हें वर्गीकरण ' प्राधान्येन व्यपदेशः ' या न्यायानेंच केलें आहे. तात्पर्य, मराठी काव्यांत प्रतिभानिर्मित, प्रज्ञाप्रेरित व प्रसादसमान्वित अशी तीन्ही प्रकारची काव्यरचना विपुलतेने प्रत्ययाला येते.

मोगरे, लेले, गोविंदाग्रज, बालकवि, रे. टिळक व रेंदाळकर या सत्कवींची पिढी सुमारे १९२० च्या सुमारास कालवश झाली. त्यानंतर यशवंत, गिरीश, माधवज्यूलियन, केशवकुमार, मनोहर, विरकूड, दि. गं. केळकर, निशिगंध, ह. स. गोखले, काव्यविहारी, उपाध्ये, आ. रा. देशपांडे यांनीं महाराष्ट्रकवींची परंपरा अव्याहतरीतीनें चालू ठेविली. यांपैकीं रावीकिरण मंडळांतील कवींचा अधिक बोलबाला झाला असला तरी इतर कवींची कामागिरी कमी दर्जाची नाहीं. त्यानंतर काणेकर, य. न. केळकर, के. ना. काळे, भवानीशंकर पंडित, बोरकर, यादव मुकुंद पाठक, प्रा. कोल्ते, वामन नारायण देशपाडे, सौ. विमलबाई देशपांडे, व्यकटेश शंकर वकिल, विरागी, डॉ. श्रीखंडे, द. श्री. केळकर, पळशीकर, ना. ना. हुड, कारेप्रभृति कवींनीं काव्यदेवतेची उपासना केली आहे. चिदंबर नारायण कुलकर्णी यांची कविता भावनोत्कट असून ती पुस्तकरूपानें प्रकाशित होणें अवश्य आहे. त्याचप्रमाणें, भोरचे युवराज पतिपत्नी, प्रा. पाठक, कोरकेल, इंदुकांत, आपटे, अच्युत, पाटणकर, बाबुलनाथ, म. दि. टेकाडे, कृष्णमूर्ति, घाणेकर, शं. गो.

साठे, ना. ग. जोशी, वासुदेवाग्रज, श्री. वा. गाडगीळ, ग. ह. पाटील, ठोकळ, वि. म. कुलकर्णी, गो. म. कुलकर्णी, सौ. जावडेकर, सौ. संजीवनी मराठे, काशीताई नाटेकर, मंगरूळकर, प्रा. शिंदे, कुसुमाग्रज, राजस, पतकी, द. ना. देशपांडे, ना. म. संत, इंदिरा संत, रा. वा. शेवडे, ग. ह. तारळेकर, म. कृ. कुलकर्णी व माडगूळकर या कवींनीं मराठी काव्यसंपदेंत भर घातलेली आहे. त्यांपैकीं भवानीशंकर पंडित, बोरकर, कारे व कुसुमाग्रज, इंदिरा संत, य. न. केळकर, सौ. मराठे व लाड यांची कविता वैशिष्ट्यमंडित आहे. या सर्व कवींची काव्योपासना जरी अभिनंदनीय असली तरी एकंदरींत मराठी काव्य-वाटिकेतील वैभव नाहींसें होऊन त्याला आतां विपन्नावस्था आली आहे, यांत शंका नाहीं. सारांश, मराठी काव्याची सद्यःस्थिति फारशी समाधानकारक नाहीं असा निष्कर्ष काढल्यास तो चुकीचा ठरणार नाहीं.

अशाप्रकारें मराठी काव्याची जी पिछेहाट होत चालली आहे त्याचा विचार करणें क्रमप्राप्त आहे. काव्याच्या परागतीचें पहिलें कारण लोकाभिरुचि हें होय. इ. स. १९२५ नंतर लघुकथा व कादंबरी या लेखन-प्रकाराचा उत्कर्ष होत चालला. त्यांमुळें काव्याकडे दुर्लक्ष होऊन लघुकथा व कादंबरी यांच्या वाचनाकडे लोकांच्या अभिरुचीचा ओघ वळला. त्यामुळें कवींनीं काव्यलेखन सोडून कथात्मक साहित्याकडे आपली दृष्टि वळविली. मोगरे, टिळक, चंद्रशेखर या कवींप्रमाणें सद्यःकालीन कवींची काव्यावर अव्यभिचारी निष्ठा नाहीं. काव्य हेंच एकमेव आराध्यदैवत मानून त्याच्या अखंड उपासनेंत जीवन व्यतित करावें अशी महत्त्वाकांक्षा कवि बाळगत नाहींत. गेल्या पिढींतील बहुतेक प्रमुख कवींनीं काव्याखेरीज इतर कोणत्याहि गोष्टींत आपल्या शक्तीचा व्यय केला नाहीं. म्हणून काव्यावरील निस्सीम निष्ठेचा अभाव हाहि काव्याच्या परागतीला कारणीभूत झाला आहे. काव्यगायनाची वाढती लोकप्रियतां हेंहि एक काव्यहानीचें

कारण आहे. हें म्हणणें सकृद्दर्शनीं कुणाला चमत्कारिक वाटेल. पण तें खरें आहे. काव्यगायनांत जी कविता काव्यगुणांनी श्रेष्ठ आहे त्यापेक्षां जी गायनानुकूल आहे ती लोकप्रिय ठरते. याचा परिणाम असा होतो कीं कवीचे लक्ष संगीताकडे वेधलें जातें. काव्यागायनाचा दुसरा दुष्परिणाम असा कीं, तें बहुजनसमाजांत व्हावयाचे असल्याने समाजाच्या उथळ भावना वर्णन करण्याकडे प्रवृत्ति होते. कारण सूक्ष्म-गहन भावना या बहुजन समाजाला आकलन होऊ शकत नाहीत. याबाबतीत प्रख्यात आंग्लकाव्यमीमांसक एडमंड गॉस (Edmund Gosse) याचे 'Poetry is not a democratic art' हे वचन कवींनीं सदैव डोळ्यांपुढें ठेवलें पाहिजे. काव्य हा बहुजन समाजापेक्षां सहृदय रसिकांचा आस्वाद्य विषय आहे. यामुळे मध्यंतरीं महाराष्ट्रांत काव्यागायनाची प्रथा जी प्रिय झाली होती ती उच्चतम काव्याच्या प्रगतीला विघातक झालेली आहे. तात्पर्य, लोकाभिरुचि, काव्यावरील अव्यभिचारी निष्ठेचा अभाव व काव्यगायनाची प्रथा हीं तीन मराठी काव्याच्या अवनत स्थितीची कारणे म्हणून सांगतां येतील.

याप्रमाणें मराठी काव्याला उतरती कळा लागली असतां कवींनीं जर मुक्तछंदाचा स्वीकार केला तर काव्याचा उत्कर्ष होईल असें कांहीं जणांचें मत आहे. काव्यावरील बंधनें कमी केलीं असतां वाग्धिश्वरांच्या प्रतिभेला स्वैर विहार करण्याला सुलभ जाईल. गण, मात्रा, चरण, यति व यमक ही मराठी छंदाचीं प्रमुख बंधने होत. छंदाला हीं सर्व अवश्यक नाहींत. छंदांत केवळ ताल असला म्हणजे झालें. मग इतर बंधनाची जरूरी नाहीं या विचारानें प्रेरित होऊन वा. ना. देशपांडे, व्यं. शं. वकील, शालीन-दत्त शिदोरे व आ. रा. देशपांडे यांनीं मुक्तछंदाचे प्रयोग करून पाहिले आहेत. श्री. भवानीशंकर पंडित यांनीं मुक्तछंदाचीं पुढील चार लक्षणें सांगितलीं आहेत. (१) मुक्तछंद तालबद्ध हवा. कारण तालाशिवाय छंद संभवत नाहीं. (२) तो लवचीक असावा (३) ताल व रचना यांच्या

सोयीच्या दृष्टीनें त्याचा अंतर्भाव जातींत व्हावा (४) पूर्वापार चालत आलेले व जातीला मूलभूत असलेले षण्मात्रिक व अष्टमात्रिक रचानांचे प्रकार मुक्तछंदाच्या उभारणीला सोयीस्कर आहेत. भवानीशंकर पंडित यांनीं मुक्तछंदांतहि नादमाधुर्य (music) व अनुप्रास व स्वर-यमक यांकडे लक्ष पुरविलें पाहिजे असें मत व्यक्त केलें आहे. श्री. आ. रा. देशपांडे यांनीं 'भग्नमूर्ति' या काव्याच्या प्रस्तावनेंत मुक्तछंदाचें सविस्तर विवेचन केलें आहे. "मराठी काव्याच्या भोंवती ठराविक अक्षर मात्रा, ओळींची संख्या व अंत्य यमक यांची पोलादी चौकट आहे. या पोलादी चौकटीच्या छंदांतून वाहतांना काव्यप्रवाहाला फार अडचण पडते. त्यांनीं आपल्या मुक्तछंदाची उभारणी पांच अक्षरांचा एक व सहा अक्षरांचा एक असे दोन चरणक योजून केली आहे. काव्यास ओहोटी लागली आहे काव्याचें नवयुग सुरूं होत नाहीं. याचें कारण मुक्तछंदाचा स्वीकार केला जात नाहीं. छंदांत ज्यायोगें अंगचें सौंदर्य येतें, तें आंदोलन, ताल, आणि अंतर्गतनादसाम्य हें सर्व गुण मुक्तछंदांत आहेत. कृत्रिम बंधनें त्यास नाहींत. आपल्या साधेपणामुळें नवकाव्याचें वाहन होण्यास मुक्तछंदच योग्य आहे." असा श्री. देशपांडे यांनीं निष्कर्ष काढला आहे. (भग्नमूर्ति प्रस्तावना पृ. ८३-९९ ).

येथपर्यंत मुक्तछंदाचे जे पुरस्कर्ते आहेत त्यांचें म्हणणें सांगितलें. वस्तुतः मुक्तछंद हा इंग्रजी भाषेंतील ( Free-verse ) चें अनुकरण आहे. मराठी काव्याभोंवती जी पोलादी चौकट आहे असें श्री. देशपांडे म्हणतात तें प्रमादास्पद आहे. गण, मात्रा, चरण, यमक व यति हे मराठी काव्याचे पंचप्राण आहेत. अतिरेक न करितां त्यांचें सहाय्य घेतल्यास काव्यसौन्दर्यांत भर पडते. मुक्तछंदांतहि पंचाक्षरी व षडाक्षरी चरणकाचें बंधन मान्य करावें लागतेंच कीं नाहीं ! मुक्तछंदात्मक काव्य हें वैचित्र्याच्या अभावामुळें कंटाळवाणें (monotonous) वाटतें. मुक्तछंदांत मुक्तताही

नाहीं व छंदाचें सौंदर्यहि नाहीं. श्री भवानीशंकर पंडित हे मुक्तछंदांत अनुप्रास-नादमाधुर्य असावें हें कबूल करतात. मग यमक, यति, चरण हे त्यांना त्याज्य कां वाटावें हें समजत नाहीं! मराठींत जी मुक्तछंदात्मक रचना आहे तींत काव्य-प्रवाह सौकर्यानें वाहत आहे असें वाटत नाहीं. इतकेंच नव्हे तर मुक्तछंदात्मक काव्यरचना हेंच कृत्रिम व क्लेश-कारक आहे असें वाटतें. माधुर्य व सौंदर्य यांची हानी करणारा हा छंद स्वीकारण्यापेक्षां आपेल विचार गद्यांतच व्यक्त केलेले काय वाईट? निर्यमक कवितेप्रमाणेंच मुक्तछंदाचाहि प्रयोग अयशस्वी होईल कीं काय अशी साधार भीति वाटते. प्रा. चाफेकर यांच्या एका शद्बप्रयोगाचा अनुवाद करून असें म्हणतां येईल की 'मुक्तछंद' हा 'कवि पतंगाची एक कागदी ढूम' आहे. कारण कविता ही युवतिरूपात्मक असल्यामुळें ती सदैव प्रियमंडनाच राहणार !

येथपर्यंत प्राचीन व अर्वाचीन मराठी काव्याचें सर्वांगीण समालोचन करण्याचा प्रयत्न केला. त्यावरून मराठी कविताकामिनीच्या सौंदर्याची वाचकांना कल्पना येईल असा भरंवसा वाटतो. मराठी, संस्कृत व इंग्रजी या भाषांतील अभिजात काव्याचा दीर्घ अभ्यास साहित्यशास्त्राचें सूक्ष्म अध्ययन व काव्यावर अव्यभिचारी निष्ठा या गुणांची अभिवृद्धि जर महाराष्ट्र कवींत होईल तर मराठी काव्याचा अभ्युदयकाल फार लांब नाहीं. त्याच-प्रमाणें त्यांनीं, सत्य, सौंदर्य, आनंद, जीवित व निसर्ग हे काव्याचे पांच प्रदीप डोळ्यांपुढें ठेवले पाहिजेत. मराठी काव्याची प्रकृति व परंपरा यांचें परिपालन करून 'मधुरालाप निसर्गपंडिता' (कालिदास) अशी काव्यरचना करण्याचें ध्येय आपल्यापुढें ठेवलें पाहिजे. मराठी कविता ही कोणत्याहि दृष्टीनें कमी दर्जाची नसून ती आदरणीय, अभ्यसनीय व आस्वादयोग्य आहे असा दृढविश्वास बाळगला पाहिजे. मराठी कवितेचा भूतकाळ वैभवशाली असल्यामुळें सद्यःस्थिति जरी अवनत असली तरी

भविष्यकाळ आशादायक आहे यांत शंका नाहीं. कारण, श्रीज्ञानेश्वर, मुक्तेश्वर व चंद्रशेखर यांच्या सारख्या अभिजात कवींनीं आपल्या अम्लान मनोहर कलाकृतींनीं जिला अलंकृत केलें तिच्या रम्योज्ज्वल भवितव्याविषयीं निराश होण्याचें मुळींच कारण नाहीं. जोपर्यंत मानवी भावना कायम आहेत, सृष्टिसौंदर्य नवनवोन्मेषशाली आहे व सौंदर्यपिपासा जागृत आहे तोपर्यंत काव्यनिर्मितीला खंड पडणार नाहीं. म्हणून कांहीं काळ भासणारी ही मराठी काव्याची परागति त्याच्या भावी प्रगतीचीच निदर्शक आहे. कारण शेलेने म्हटलेच आहे—

If winter comes can spring be far behind ?

हिमर्तु जरी ये तरी मधु असेल तो दूर कां ?

———

# प्रकरण दहावें

## मराठी काव्य-मीमांसा

आधीं बरवें कवित्व । कवित्वीं रसिकत्व
रसिकत्वीं परतत्त्व । स्पर्शु जैसा ॥

—श्री ज्ञानेश्वर

कवि व काव्य-मीमांसक यांच्या मध्ये अहिनकुलभाव नसून कमल-भृंगाप्रमाणें त्यांचा परपरांशीं निकट संबंध आहे. प्रतिभेचे निर्माणक (Creative) व समीक्षक असे दोन प्रकार आहेत. ज्यांची प्रतिभा निर्माणक असते त्यांच्याकडून काव्यनिर्मिती होते व ज्यांची प्रतिभा समीक्षक असते ते टीकाकार होतात. कवीचे कार्य अव्वल दर्जाचें असून टीकाकाराचें दुय्यम दर्जाचे आहे असा समज प्रचलित आहे. 'Critics are those who have failed in art and literature' कला व वाङ्मय यांत जे अयशस्वी ते टीकाकार होत असे डिझरॅलीने टीकाकाराविषयीं उपरोधानें लिहिलें आहे. पण ही समजूत बरोबर नाहीं. कारण काव्यनिर्मिती व काव्यमीमांसा हे दोन्ही प्रकार सारख्याच कुशलतेनें हाताळणाऱ्या मॅथ्यू-अरनॉल्ड, जगन्नाथ, बा. अ. भिडे अशा कांहीं व्यक्ति आढळतातच कीं नाही ? बेन जॉन्सन ह्मणतो.: "To judge of poets is only the faculty of poets, and not of all the poets but the best" कवीच कवीचा यथार्थ आशय जाणूं शकतो. कालिदासाच्या शाकुंतलाचें रहस्य गटेलाच आकलन करितां आलें तें यामुळेंच होय. कवीची प्रतिभा, सृष्टींतील सौंदर्य पाहून जागृत होते, तर टीकाकाराची प्रतिभा त्या सौंदर्याचें काव्यांतील प्रतिबिंब पाहून जागृत होते. पोपनें म्हटलेंच आहे : "Both must alike from heaven derive the light, those

born to judge, as well as those to write" केवळ काव्यांतील गुणदोषांचे विवेचन करणें हें टीकाकाराचें कार्य नाहीं. तर कोणत्याहि काव्यांतील सौंदर्याचें रहस्योद्ग्राही प्रगटीकरण करून विधायक समीक्षा ( creative critcism ) करणें हें त्याचें ध्येय आहे. काव्यनिार्मिती व काव्यास्वादपात्रता या दोहींचीहि काव्यप्रगतीला सारखीच आवश्यकता आहे. कवि व काव्यमीमांसक हे परस्पर पोषक असतात. म्हणून प्रस्तुत प्रकरणांत मराठी काव्य-मीमांसेचे विहंगमावलोकन करावयाचें योजिलें आहे.

प्रारंभीं, आपण काव्य–मीमांसकाच्या ठिकाणी कोणतें गुण असावें लागतात याचा विचार करूं. अरविंद घोष यांनी म्हटलें आहे:— "The best part of every great work is always inexplicable it is good because it is good and innocensly graceous opening as the green of the earth and falling as he dew of heaven" कोणत्याहि श्रेष्ठ कृतीचें उत्तमांग विवेचन तींत असतें; त्याचा चांगलेंपणा हे त्याच्या चांगलेंपणाचें कारण. त्याचें निरागस सौंदर्य निसर्गांतील हरित शाद्वलाप्रमाणें नयनगोचर होतें व नभोमंडलांतून दंव पडावें तसें भासतें. हें अरविंदांचें म्हणणें बव्हंशीं खरें असलें तरी टीकाकाराचें ध्येय कलाश्रेष्ठ कृतींतील उत्तमांगाचें रहस्योद्ग्राही आविष्करण करणें हेंच असतें यांत शंका नाही. यासाठीं काव्यसमीक्षकाच्या ठिकाणीं सहृदयता हा पहिला गुण असला पाहिजे. सहृदयतेशिवाय कवीच्या कृतीशीं त्याला समरस होतां यावयाचें नाहीं. विद्वत्ता ही त्याच्या ठिकाणी दुसरा गुण असला पाहिजे. काव्यमीमांसकानें काव्यशास्त्र, तत्त्वज्ञान, धर्मनीति, समाज इत्यादि अनेक शास्त्रांशी परिचय करून घेतला पाहिजे. कवीच्या ठिकाणीं पांडित्य नसलें तरी चालेल. पण टीकाकार हे प्रज्ञासंपन्न व पंडित असलाच पाहिजे. रसिकता व चिकित्सिकता या गुणांचीहि त्याला जरूरी आहे. कारण रसिकतेमुळें टीकेंत रम्यता येते तर चिकित्सकतेमुळें ती सूक्ष्मदर्शी होते.

सदाभिरुचि हा टीकाकाराचा पांचवा गुण होय. सदभिरुचीमुळेच टीकेचा दर्जा उच्चतम राखला जातो. सारांश, सहृदयता, विद्वत्ता, रसिकता, चिकित्सकता व सदभिरुचि या सद्गुणांनीं विभूषित असलेल्या काव्य-समीक्षकाकडूनच रसात्मक, विधायक व कलात्मक असे काव्यसमीक्षात्मक साहित्य निमार्ण केलें जातें.

प्राचीन मराठी वाङ्मयांत काव्यसमीक्षात्मक वाङ्मय असें फारसें आढळत नाहीं. नाही म्हणावयाला विठ्ठल व नागेश यांच्या 'रसमंजरीचा' उल्लेख करितां येईल. मोरोपंतांच्या सन्मणिमालेवरून त्यांची गुणग्राही रसिकता प्रत्ययाला येते. काव्यसमीक्षात्मक निंबध लिहिण्याला प्रारंभ विष्णुशास्त्री चिपळूणकरांनींच केला असे म्हणणे योग्य आहे. त्यांच्याहि पूर्वी दादोबा पांडुरंग तर्खडकर यांच्या 'यशोदा पांडुरंगी' या विस्तृत व विद्वत्ताप्रचुर टीकेचा आदरपूर्वक उल्लेख केला पाहिजे. विष्णुशास्त्र्यांच्या मोरोपंतांवरील प्रदीर्घ व प्रभावी प्रबंधाने मयूरदूषकांचें खंडन करून त्यांच्या काव्याविषयी सुशिक्षितांत अभिरुचि निमार्ण केली. या निंबधामुळेंच जनार्दन बाळाजी मोडक, वामन रावजी ओक, केशवराव कानेटकर, बापुसाहेब कुरुंदवाडकर, परब, गणेशशास्त्री लेले वगैरे रसिकांनीं मराठी काव्याचा उहापोह केला. बाळकृष्ण मल्हार हंस यांनीं मोरोपंत, वामन व तुकाराम या कवींवर सुश्लिष्ट निबध लिहिले. हंसांची भाषा प्रगल्भ व टीकापद्धति प्रांजळ असल्यामुळें त्यांचे निंबध आजहि प्रसन्न वाटतात. हंसांनीं मोरो-पंतांच्या दूषकांचा सौम्य शद्बांनी समाचार घेतला असून पंत पंडित नव्हते या मालाकारांच्या विधानाचें सुरेख खंडन केलें आहे. सारांश, दादोबा पांडुरंग, विष्णुशास्त्री चिपळूणकर व हंस यांनीं काव्यसमीक्षात्मक साहित्य-मंदिराचा पाया घातला यांत शंका नाहीं.

प्राचीन काव्यासंबंधीं भावे, भिडे, पांगारकर, राजवाडे व अजगांवकर यांची कामगिरी अत्यंत मौल्यवान आहे. भावे यांनीं 'महाराष्ट्रकवि'

हें मासिक चालविलें व महाराष्ट्र-सारस्वत' हा चिरस्मरणीय ग्रंथ (monumental) लिहिला. 'महाराष्ट्र सारस्वत' या ग्रंथांत प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास मनोवेधकरीतीनें लिहिला आहे. वा. अ. भिडे यांनीं मुक्तेश्वर, वामन व इतर प्राचीन कवींवर विचिकित्सक निबंध लिहिले असून मराठी वाङ्मयाच्या इतिहासाचाहि एक खंड प्रसिद्ध केला आहे. भिडे यांच्या निबंधांत सूक्ष्मता, रसिकता व सहृदयता यांचें संमिश्रण झालें असल्यामुळें तें ग्रंथरूपानें एकत्र प्रकाशित होणें आवश्यक आहे. पांगारकर यांनीं आपली रसाळ वाणी व रमणीय लेखणी यांच्या द्वारें संतवाङ्मयाची स्पृहणीय कामगिरी केली आहे. मोरोपंत व तुकाराम यांची चरित्रें व मराठी वाङ्मयाचे तीन खंड हे त्यांचे ग्रंथ कुणालाहि मननीय वाटतील. त्यांच्या लेखनांत चिकित्सकता कमी असली तरी प्रसादामुळें ते आकर्षक वाटतें. पांगारकरांच्या खालोखाल अजगांवकरांची कामगिरी उल्लेखनीय आहे. त्यांनीं 'कवि-चरित्रांचे' आठ खंड प्रसिद्ध केले असून प्राचीन कवींची माहिती परिश्रमपूर्वक संकलित केली आहे. इतिहासाचार्य राजवाडे यांनीं रामदास, तुकाराम, मुक्तेश्वर यांवर संशोधनात्मक निबंध लिहिले आहेत. इतर कवींवरील त्यांचीं टिपणेंहि महत्त्वाचीं आहेत. सारांश, भावे, भिडे, पांगारकर, अजगांवकर, व राजवाडे या पांच लेखकांनीं प्राचीन मराठी काव्यावर विपुल व विचारप्रवर्तक वाङ्मय निर्माण केलें आहे.

याशिवाय इतर कांहीं लेखकांनींहि प्राचीन काव्यावर निबंध-प्रबंध प्रसिद्ध केले आहेत. ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम व रामदास या संतांच्यावर टीकात्मक व चरित्रात्मक असें वाङ्मय लिहिलें गेलें आहे. ज्ञानेश्वरासंबंधीं भारद्वाज व भिंगारकर यांचे निबंध उल्लेखनीय असून आगाशे यांचा आपल्या ज्ञानेश्वरीला जोडलेला उपसंहार वाचनीय आहे. केशव रामचंद्र छापखाने या वक्तृत्वसंपन्न व वेदांतमर्मज्ञ वकिलांनीं 'स्वाध्याय ज्ञानेश्वरी' हा ग्रंथ लिहिला आहे. त्यांच्या ग्रंथाची रचना विस्कळित

असली तरी त्यांतील कुंडलिनीचें विवेचन अभिनव वाटतें. डॉ. पेंडसे यांनीं ‘ ज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान ’ हा ग्रंथ लिहिला असून ‘ महाराष्ट्रीय संस्कृतीचा इतिहास’ या ग्रंथांत ज्ञानेश्वरप्रभृति चार संतांच्या कामागिरिची चर्चा केली आहे. याचठिकाणी प्रा. आळतेकर यांच्या ‘ ज्ञानेश्वरांच्या ’ चरित्राचा उल्लेख करावयाला हरकत नाहीं. ‘ ज्ञानेश्वर दर्शन ’ या ग्रंथांत ज्ञानेश्वरांच्या वाङ्मयाचें सर्वांगिण विवेचन आढळतें. तुकारामावर सहस्रबुद्धे, के. स. केळकर, केळुसकर, व धुरंधर, हर्षे यांनीं निबंध लिहिले आहेत. रामदासासंबंधीं श्री. देव यांची कामगिरी अ.:पमेय असून आळतेकर व भट यांनीं रामदासचरित्र लिहिलें आहे. य. खु. देशपांडे यांनीं महानुभवी पंथाचा इतिहास लिहिला आहे. इंग्रजींतील ‘ Men of Letters ’ च्या धर्तीवर असलेल्या प्रा. कोलते यांचा ‘भास्करभट्ट बोरीकर’ व प्रा. पंगूंचा ‘ सामराज ’ या दोन उत्कृष्ट प्रबंधांचा उल्लेख केला पाहिजे. श्रीधर विष्णु परांजपे यांनीं मोरोपंतांच्या काव्याचें विवेचन आपल्या केकावलीवरील विस्तृत टीकेंत केलें आहे. प्रा. श्री. ना. बनहट्टी यांचा ‘ मयूरकाव्य विवेचन’ हा ग्रंथ चिकित्सात्मक आहे. श्रीधरावर मात्र स्वतंत्र प्रबंधरचना झालेली आढळत नाहीं. ‘काव्य व काव्योदय’, प्रा. पटवर्धन, ‘महाराष्ट्रीयांचें काव्यपरीक्षण ’ (डॉ. केतकर), काव्यालोचन (द. के. केळकर), ‘अभिनव काव्यप्रकाश, (प्रा. जोग) ‘रसविमर्श’ (डॉ. वाटवे), ‘मराठीचें साहित्यशास्त्र’ (डॉ. देशपांडे), ‘सारस्वत–समीक्षा’ ( प्रा. आगाशे ) या विद्वत्ताप्रचुर ग्रंथांत प्राचीन मराठी काव्याचें उल्लेख आढळतात.

येथपर्यंत प्राचीन काव्यावरील टीकात्मक वाङ्मयाचें अवलोकन केलें. आतां अर्वाचीन काव्यावरील समीक्षात्मक वाङ्मयाकडे वळूं. अधुनिक कविकुलगुरु केशवसुत यांच्यावर प्राचा. राजवाडे, डॉ. गुणे, रहाळकर, ना. म. भिडे, प्रा. लागु, डॉ. मा. त्रि. पटवर्धन, माडखोलकर यांनीं निबंध लिहिलें आहेत. त्यांत प्रा. लागु यांचा निबंध उत्कृष्ट आहे.

माडखोलकरांच्या 'आधुनिक कविपंचकांत' पांच प्रमुख कवींच्या काव्याची छाननी आढळते. डॉ. हर्षे यांच्या 'गोविंदाग्रज' व वि. स. खांडेकर यांच्या 'गडकरी' या पुस्तकांत गडकऱ्यांच्या वाङ्मयांचें विवेचन केलें आहे. 'काव्यचर्चा' या ग्रंथांत आधुनिक प्रमुख तेरा कवींच्यावर टीकात्मक लेख ग्रथित झाले आहेत. त्यांत मोगरे, माधवानुज व चंद्रशेखर यांवरील निबंध चांगले आहेत. प्रा. पराडकर यांनी 'तांबे' या पुस्तकांत कविवर्य तांबे यांच्या काव्याची छाननी केली आहे. प्रा. चिं. नी. जोशी यांचा मराठी वाङ्मयांतील अर्वाचीन कवि, हा ग्रंथहि अभ्यसनीय आहे. श्री. देशपांडे यांचा 'Bee' कवीवरील निबंध वाचनीय आहे. श्री. न. चिं. केळकर यांनीं आपल्या साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणांत अर्वाचीन मराठी काव्याचे समर्पक समर्थन केले आहे. प्रो. लक्ष्मणशास्त्री लेले यांनीं टिळक, तांबे, विनायक, अनंततनय व सुमंत यांच्यावर निबंध लिहिले असून तेहि ग्रंथरूपाने प्रकाशित होणें अवश्यक आहे. श्री. ब्रह्मनाळकर या प्रतिभाशाली काव्यसमीक्षकाचा गौरवपूर्वक उल्लेख केल्याखेरीज हा आढावा पूर्ण होणार नाहीं. त्यांचा विविधज्ञानविस्तारांतील 'टिळक व मोगरे' यांच्यावर लिहिलेला प्रबंध मननीय आहे. ब्रह्मनाळकरांचे टीकात्मक निबंध पुस्तक-रूपानें एकत्र प्रकाशित होणें जरूर आहे. यशिवाय बा. अ. भिडे, प्रा. द. के. केळकर, प्रा. चापेकर, प्रा. जोग, प्रा. वाटवे, खांडेकर, माडखोलकर, दाजी नागेश आपटे, प्रा. गिरीश प्रा. पंगु, प्रा. आंबेकर, प्रा. आळतेकर, प्रा. बनहट्टी, द. ल. कळेकर प्रा. ताटके, ना. म. भिडे, श्री. अत्रे, नी. गो. पंडितराव व रा. ल. महाबळ यांनीं आधुनिक कवी व त्यांचे ग्रंथ यांवर टीकात्मक निबंध लिहिले आहेत.

याच ठिकाणीं प्रस्तावनेतील टीकात्मक वाङ्मयाचा परामर्श घेणें क्रमप्राप्त आहे. प्रस्तावना ही बहुधा गुणग्राही बुद्धीनें लिहिलेली असली तरी त्यांतहि पुष्कळ काव्यकोविदानीं आपले स्वतंत्र विचार ग्रथित

केले आहेत. व त्यामुळें प्रस्तावनांनाहि प्रबंधाची योग्यता प्राप्त होते. कै. अच्युत सीताराम साठे यांनीं 'दयाळनाथांच्या' संग्रहाला लिहिलेली विद्वत्ताप्रचुर प्रस्तावना हा एक सुंदर प्रबंध आहे. हा प्रबंध त्यांच्या समीक्षात्मक प्रतिभेचा उत्कृष्ट निदर्शक आहे. प्रा. शि. म. परांजपे यांनीं आर्याभारतांत लिहिलेल्या प्रदीर्घ व पांडित्यपूर्ण प्रस्तावनेंत मोरोपंतांच्या आर्याभारतांतील काव्यसौंदर्याचें वक्तृत्वपूर्ण विवेचन केले आहे. त्याचप्रमाणें, श्री. न. चिं. केळकर, प्रा. पोतदार, खुपेरकरशास्त्री व सरदेसाई यांच्या प्रस्तावनांहि मननीय आहेत. श्री. केळकर यांनीं रे. टिळक व गोविंदाग्रज यांच्या काव्यसंग्रहांना मितमधुर प्रस्तावना लिहिल्या आहेत. कै. बा. अ. भिडे यांनीं 'काव्यदोहन' या संग्रहाला लिहिलेली प्रस्तावना अर्वाचीन काव्यावरील आक्षेपांचें खंडन करणारी आहे. प्रा. चाफेकर यांनीं हृदयतरंग भा. २ या पुस्तकाला लिहिलेल्या प्रस्तावनेंत काव्याची विद्वत्ताप्रचुर मीमांसा केली आहे. 'स्वनितांजलि' व 'प्रफुल्ल पद्माकर' या ग्रंथांना लिहिलेल्या प्रस्तावनेंत त्यांनीं सुनीत (Sonnet) व गीतक (Lyric) यांची चिकित्सा केली आहे. त्याचप्रमाणें पुष्पांजलि, 'त्रिदल,' 'निर्झरिणी,' 'चांगदेव पासष्टी' या काव्यसंग्रहांनाहि लिहिलेल्या प्रस्तावना पांडित्यपूर्ण आहेत. प्रा. चाफेकर यांच्या प्रस्तावना प्रदीर्घ असल्यातरी त्यांत त्यांची गुणग्राही रसिकता, प्रगाढ पांडित्य व काव्याचा सखोल अभ्यास यांची प्रतीति आल्यावांचून राहत नाहीं. मोगरे यांच्या काव्यसंग्रहाला हरिभाऊ आपटे, अ. सि. साठे व प्रा. लेले-शास्त्री यांनीं वाचनीय प्रस्तावना लिहिलेल्या आहेत. त्यांत हरिभाऊ आपटे यांची तिसऱ्या खंडाला जोडलेली प्रस्तावना समीक्षेचा आदर्श आहे. श्री. माडखोलकर यांनीं 'चंद्रिका,' 'रेंदाळकरांची कविता', 'लेंभे यांची कविता' या पुस्तकांना लिहिलेल्या प्रस्तावना मनोहर आहेत. माधवराव अत्रे यांनीं टेकाडे यांच्या 'आनंदगीताला' लिहिलेल्या प्रस्तावनांचाहि

उल्लेख केला पाहिजे. अत्र्यांची ' फुलांची ओंजळ ' या काव्यसंग्रहाला लिहिलेली प्रस्तावना मननीय वाटते. प्रा. माटे यांनीं बालकवि व माधवानुज यांच्या काव्यसंग्रहांना सुंदर प्रस्तावना लिहिल्या आहेत. प्रा. लागु यांची ' कांहींतरी ' या पुस्तकावरील प्रस्तावना ही त्यांच्या अभिजात रसिकतेचा उत्कृष्ट परिपाक आहे. प्रा. पंगु यांनीं ' वच्छहरण,' कुशलवो-पाख्यान-वनपर्व-सीतास्वयंवर त्या पुस्तकांना विवेचक प्रस्तावना लिहिलेल्या आहेत. प्रियोळकर यांच्या नलदमयंतीस्वयंवराला लिहिलेली प्रस्तावना संशोधनात्मक आहे. प्रा. वा. म. जोशी यांनीं ' निर्झरिणी ' या पुस्तकाला लिहिलेली प्रस्तावना विचारप्रवर्तक असून खांडेकर यांनीं ' जीवनसंगीत ' व ' विशाखा ' या काव्यसंग्रहांना लिहिलेल्या प्रस्तावना विलोभनीय आहेत. सारांश, निरनिराळया ग्रंथांना लिहिलेल्या प्रस्तावनेंतून उद्बोधक काव्यमीमांसा प्रत्ययाला येते.

मराठी काव्याचें प्रकाशन करून-टीपा लिहून-ज्यांनीं काव्योपासना केली त्यांचाहि उल्लेख करणें हें जरूर आहे. ज्ञानचंद्रोदय, सर्वसंग्रह, काव्यसंग्रह या मासिकांतून प्राचीन कविता प्रकाशित झाली. प्राचीन कविता टीपासहित प्रकाशित केल्याबद्दल परशुरामपंत तात्या गोडबोले, ना. चिं. केळकर, जानूकाका, अठल्ये, गजाननराव देव, वामन दाजी ओक, तेंडूलकर, प्रा. भानु, बा. अ. भिडे, आक्टे, यंदे, गुर्जर व पराडकर यांच्या विषयीं आदर व्यक्त केला पाहिजे. तसेंच वा. वि. फडणीस यांनीं 'काव्य-रत्नावाली' हें मासिक स्वार्थत्यागपूर्वक चालवून अर्वाचीन मराठी काव्याचा प्रसार केला म्हणून टीकाकारांप्रमाणेंच संग्राहक व प्रकाशक यांचाहि उल्लेख केल्यास तो कुणालाहि औचित्यपूर्ण वाटेल.

येथपर्यंत मराठी काव्य-मीमांसेचें संक्षिप्त समालोचन केलें. मराठी भाषेत काव्यसमीक्षात्मक वाङ्मय अल्प आहे. प्रो. कोर्टहोप यांनीं आंग्ल-काव्याचा प्रदीर्घ इतिहास जसा लिहिला आहे तसा मराठी काव्यासंबंधींहि

प्रयत्न झाला पाहिजे. वैयक्तिक कवींच्या काव्यावरहि टीकात्मक ग्रंथ लिहिले जाणें हेंहि आवश्यक आहे. काव्य हा विषयच असा आहे कीं त्याचें विश्लेषण तर्ककर्कशपद्धतीनें न करितां काव्यमयरीतीनें झालें पाहिजे. प्रीस्टस्कॉटनें (Priest Scot) आपल्या Poetic mind या ग्रंथांत म्हटल्याप्रमाणें: Thus poetry partakes inevitably of the nature of its subject-the suggestion is clear-which can be treated poetically (Poetic mind p.100) केवळ काव्यांतील गुणदोषविवेचन करणें हें कार्य गौण असून तद्वारां काव्याची तात्त्विक मीमांसा करणें हें टीकाकाराचें ध्येय असलें पाहिजे. इतकेंच नव्हे तर काव्यसमीक्षा करत असतांना प्रा. परांजपे किंवा अरविंद घोष यांच्याप्रमाणें स्वतंत्र काव्य-निर्मितीहि करण्याचें सामर्थ्य त्याच्या प्रतिभेंत असलें पाहिजे. अशाप्रकारची विधात्री समीक्षा (Creative criticism) निर्माण झाल्यास टीकाकार हा हा कवीपेक्षां कमी दर्जाचा आहे ही समजूत नाहींशी होईल व समीक्षण वाङ्मयाला स्वतंत्र काव्यनिष्पत्तीइतकेंच महत्त्व प्राप्त होईल. अशाप्रकारें सुरस काव्यनिर्मिति व सुंदर टीकानिष्पत्ति यांचा सारखाच विकास होवो व मराठी काव्याचा उत्तरोत्तर उज्ज्वल उत्कर्ष होत राहो अशी श्रीशारदा देवतेजवळ मनःपूर्वक प्रार्थना करून प्रस्तुत ग्रंथाची परिसमाप्ति करितों.

ॐ तत्सद्ब्रह्मार्पणमस्तु ।

# सूचि

[ आकडे पृष्ठांचे ]

———o———

# — आमचें प्रकाशन —

| | | | |
|---|---|---|---|
| १ | उमज पडेल तर | ना. ह. आपटे | २-० |
| २ | बाल सुहृद् | गो. रा. चोळकर | ९-१२ |
| ३ | जांवई | गं. ल. देवधर | १-४ |
| ४ | मातृमंदीर | सौ. मालतीबाई दांडेकर | २-८ |
| ५ | पद्यमीमांसा | वि. ज. सहस्रबुद्धे | १-४ |
| ६ | आघाडीवर | व्यं. रा. खंडाळीकर | २-० |
| ७ | धर्मवीर संभाजी | गणपतराव बोडस | १-० |
| ८ | पहिलें पाऊल | कामत | ०-५ |
| ९ | प्रतिमा | सौ. मालतीबाई दांडेकर | २-० |
| १० | इच्छा | श्री. वर्टीकर | २-८ |
| ११ | अग्नियान | कुमारी प्रेमा कंटक | ३-० |
| १२ | माझी जमीन | कै. फाटकशास्त्री | १-८ |
| १३ | विवाहितांचें नंदनवन | राजरत्न वा. वि. जोशी | ३-० |
| १४ | राष्ट्रधर्म | साने गुरुजी | २-० |
| १५ | रमण प्रस्थानत्रयी | ना. वा. गुणाजी | १-४ |
| १६ | आह्वान | पं. जवाहिरलाल नेहरू | १-८ |
| १७ | विद्यार्थ्यांशी हितगूज | महात्मा गांधी | १-० |
| १८ | महागाई कां ? | श्री. रा. पोतनीस | १-८ |
| १९ | तेजस्विनी | सौ. मालतीबाई दांडेकर | ४-० |
| २० | जीवन संस्कृति | काका कालेलकर | १-२ |
| २१ | पाकिस्तानची छाया | आय. सी. शेख | १-८ |
| २२ | तोंडचा घास | शांतिलाल रा. भंडारी | १-१२ |
| २३ | स्त्रियांशीं हितगुज | महात्मा गांधी | २-८ |
| २४ | कला आणि कलावंत भा. १ | माधवराव बागल | ३-० |
| २५ | विद्युत् रेखा | सौ. मालतीबाई दांडेकर | १-१२ |
| २६ | सेवाधर्म | अप्पासाहेब पटवर्धन | २-० |
| २७ | जीवनधर्म | यदुनाथ थत्ते | १-४-० |

**महाराष्ट्र ग्रंथ-भांडार, कोल्हापूर.**